काव्यसंग्रह. ५९.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# स्फुट काव्यें.

वाग्देवीकंठस्थितकविमालागतमहार्हमध्यमणी, ।
ज्याच्या काव्ययशानें भरुनी गेली समस्त ही धरणी, ॥
त्या श्रीमयूर कविच्या कैशी स्मृति मज न होय पायांची ? ।
नव काव्यविरचनीं या सादर मी मूढ तत्कृपा याचीं. ॥

—श्रीपाद नारायण मुझूमदार, बी. ए.

## भाग चवथा.

हा

बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.

यांनीं

अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन व प्रस्तावना आणि परिशिष्ट वगैरे जोडून तयार केला.

तो

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१९०७.

किंमत १। रुपया.

# प्रस्तावना.

१. मोरोपंती स्फुट काव्यांचा काव्यसंग्रहग्रंथमालेंतील चवथा भाग आम्ही महाराष्ट्र काव्यवाचकांस सादर करीत आहों. या भागांत आमच्या जवळ शिल्लक असलेलीं सर्व मोरोपंती स्फुट प्रकरणें समाविष्ट झालीं आहेत. काव्यसंग्रहग्रंथमालेंत आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या एकंदर मोरोपंती स्फुट काव्यांखेरीज अजून बरींच अप्रसिद्ध खंडकाव्यें मोरोपंतांच्या दप्तरांत आहेत असें समजतें. परंतु तीं काव्यें आमच्या हातीं आलेलीं नाहींत, व येण्याचा तूर्त संभव दिसत नाहीं. तेव्हां आजमितीस तरी प्रस्तुतचा भाग हा मोरोपंती स्फुट प्रकरणांचा या ग्रंथमालेंतील शेवटचाच भाग समजणें प्राप्त आहे. मोरोपंतांचें दप्तर रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए., यांच्या पाहण्यांत आलेलें आहे; व त्यांजबरोबर पत्रव्यवहार करितां आम्हांला असें कळलें आहे कीं, पंतांच्या दप्तरांत असलेली व अद्यापपर्यंत कोठेंही प्रसिद्ध न झालेली अशी कविता सुमारें दीड हजार आहे. तिचा ठोकळ तपशील पुढें दिल्याप्रमाणें आहे.—

| | | | |
|---|---|---|---|
| १ | आर्याकेकावली. | गीति | १७४ |
| २ | रामनाम अष्टोत्तरशत रामायण. | ,, | ३० |
| ३ | श्रीरामायण. | श्लोक | ५० |
| ४ | कन्यारत्नरामायण. | ,, | २२ |
| ५ | दंडकरामायण. | ,, | १०० |
| ६ | कथासुधारामायण. | ,, | ४२ |
| ७ | मंत्ररामायण. | ,, | ६४ |
| ८ | स्रग्विणीरामायण. | ,, | ९४ |
| ९ | मंजुरामायण. | ,, | ७१ |
| १० | तन्वीरामायण. | ,, | ८६ |
| ११ | प्रहर्षणरामायण. | ,, | ८५ |
| १२ | छंदोरामायण.[1] | ,, | ५०० |
| १३ | पदें, अभंग, वगैरे. | | ५० |
| | | एकूण ग्रंथसंख्या | १३६८ |

याशिवाय पंतांची जागोजाग मिळालेली फुटकळ कविताही सुमारें दीड हजार होईल, असें कळतें. पंतांनीं ज्योतिष व वैद्यक यांवरही आर्या केलेल्या होत्या, अशी

१. या रामायणाचीं शेवटचीं दोन कांडें मुळींच नाहींत.

आख्यायिका आहे. परंतु या आख्यायिकेची सत्यता सिद्ध करणारीं साधनें अद्याप उपलब्ध झालेलीं नाहींत. आमच्या ओळखीचे एक वयोवृद्ध गृहस्थ आहेत. ते ज्योतिषावरील पांचदहा तुटक आर्या म्हणतात व त्या मोरोपंती आहेत अशी त्यांची समजूत आहे. परंतु त्यांतील भाषापद्धतीच्या शिथिलतेकडे लक्ष्य दिलें असतां, ती कृति पंतांची नसावी, असें निर्धास्त म्हणतां येतें. सर्वसंग्रहांत रुक्मिणीस्वयंवर म्हणून एक गीतिबद्ध स्वतंत्र प्रकरण छापलें आहे व तें रा० हंसांनींही आपल्या पंतांवरील निबंधांत स्वतंत्र प्रकरण म्हणून गणिलें आहे. परंतु वस्तुतः तें प्रकरण बृहद्दशमाच्या ८३ व्या अध्यायांत आहे. तसेंच अंबरीषाख्यान म्हणून एक अकरा गीतींचें प्रकरण सर्वसंग्रहांत आलेलें आहे. परंतु तेंही मंत्रभागवतांत आढळतें. पंत काशींत असतांना दररोज भगवद्गीतेचें एक भाषांतर करून तें ब्राह्मणास दान देत असत, अशी एक दंतकथा आहे. परंतु मोरोपंती स्फुट काव्यांच्या २ ऱ्या भागांत छापलेल्या निर्यमक आर्यागीतेशिवाय पंतांची गीतेवरील कृति मुळींच उपलब्ध नाहीं. गीतार्थबोधिनीनामक ग्रंथांत छापलेल्या गीतेवरील सयमक आर्या मोरोपंती आहेत, असें म्हणण्याला कांहींएक प्रमाण आढळत नाहीं.

२. प्रस्तुत भाग तयार करण्याचे कामीं आम्हांला आमचे मित्र रा० दत्तात्रय केशव ओक (नागपुर) व बाळकृष्ण सीताराम जोशी (मुरूड–जंजिरा) यांनीं जी मदत केली, त्याबद्दल त्यांचें आम्ही मनःपूर्वक आभारी आहों. तसेंच रा० ल० रा० पांगारकर यांनीं आपला बहुमोल वेळ खर्चीं घालून हरिश्चंद्राख्यानांतील पाठांतरें व अशुद्ध स्थळें आमच्या नजरेस आणून आम्हांला ऋणी केलें आहे. रा० पांगारकरांच्या सूचनांचा शक्य तेवढा उपयोग दुसऱ्या परिशिष्टांत करून घेतला आहे.

मुरूड–जंजिरा,
१५ सप्तेंबर १९०७. } काव्यसंग्रहकार.

# मोरोपंती स्फुट प्रकरणें भाग ४ था याची
# विषयानुक्रमणिका.

# मोरोपंतकृत स्फुट प्रकरणें.

## भाग चवथा.

### १. मंत्रमय भागवत.

( गीतिवृत्त. )

नतमोक्षद भवविधिनुत, जगदीश, वरेण्य, वैनतेयरथ ।
वाराया वसुधाभर देह धरी वासवादिगेयकथ. ॥ १
नक्षत्रप प्रमोदे, स्वकुळीं भक्तामरागं वरतेजा ।
वात्सल्यें वसुदेवात्मज होतां, यजिति लोकवर ते ज्या. ॥ २
नरपति परमोग्र भयद कंस उरगसा वधीं रते, अल्प ।
बाल व्यसु करि देवक्युदरज सा यादवादि यमकल्प ॥ ३
नष्टां मोहुनि, भवनीं गवळ्याच्या तेज आपुलें राम ।

---

१. या प्रकरणाला काव्येतिहाससंग्रहांत **'पूर्णमंत्रभागवत'** असें नांव दिलें आहे; परंतु खुद्द पंतांनींच याला **'मंत्रमय भागवत'** असें शेवटच्या गीतींत म्हटलें आहे. याला जरी 'भागवत' म्हटलें आहे, तरी यांत केवळ दशम स्कंधाचीच टीका आहे, सर्व भागवताची नाहीं. याच स्कंधावर पंतांनीं दुसरी एक विस्तृत टीका केलेली आहे, तिला **'कृष्णविजय'** किंवा **'बृहद्दशम'** असें नांव आहे. तेव्हां प्रस्तुत प्रकरणाला **'लघुदशम'** हें अन्य नांव असावें, हें सयुक्तिक आहे. कांहींच्या मतें 'मंत्रभागवतांतील' दशम स्कंधच लघुदशम होय. परंतु हें स्वतंत्र प्रकरणच लघुदशम असणें, अधिक सरळ व संभवनीय आहे. प्रस्तुत प्रकरणांत 'नमो भगवते वासुदेवाय' हा मंत्र प्रत्येक गीतींत साधिला आहे. मंत्राक्षरांवर फुली दिलेली आहे. २. नम्रांस मोक्ष देणारा. ३ शंकर आणि ब्रह्मदेव यांनीं स्तविलेला. ४ श्रेष्ठ. ५ गरुड आहे रथ (=वाहन) ज्याचें असा. ६. पृथ्वीचा भार. ७ इंद्रादिकांनींही ज्याचें चरित्र गाण्यास योग्य आहे असा. ८. चंद्र. ९ हर्षे. १०. आपल्या कुळांत, सोमवंशांत. ११. भक्तांचा कल्पवृक्ष. अग=वृक्ष. १२. मोठा तेजस्वी. १३. लोकपाळ. या गीतीचा अन्वय—ज्या लोकवर यजिति, [तो] भक्तामराग वरतेजा वात्सल्यें स्वकुळीं वसुदेवात्मज होतां, नक्षत्रप प्रमोदे. १४. मोठा भयंकर. १५. सर्पासारखा. १६. प्राणरहित. १७. देवकीपुत्र. १८. सहा. या पुत्रांचीं नांवें—कीर्तिमत्, सुषेण, उदापि, भद्रसेन, ऋभुदास, भद्रदेह. १९. यमासारखा. २०. घरीं.

वाढवि; सुख दे वाढुनि **नंदयशो**दादिकां **घन**श्याम. ॥ ४
न गमो चित्र, भयदतम घनगर्जित वर्ष, तेथ **शेष** वरी, ।
वारिधि तशी सुखें दे वाटहि **य**मुना, न मार्गविघ्न करी. ॥ ५
नष्टायु मोहिता भरि गररस वदनीं, कुबुद्धि तेहि तरे ।
वाखाणितां सुधाधिक वरदेश्वरबाळयश करी हित रे ! ॥ ६
अनं मोडी, भग्न करुनि गतिस, **तृ**णावर्त न परते मागें; ।
वाटेसि सुदेशांच्या लावी, वारून पापचय रागें. ॥ ७
नलिनाक्षमुखीं मोहे पाहुनि नभआदि जगं, वदे 'हा' ते ।
वाहुनि वसु देह, तरिच **वा**ल्मीकिप्रमुख गाति यश गा ! ते. ॥ ८
नवल करी मोठें जन; भव्यप्रद गर्ग नांवें, तेज, कथी; ।
वाचेला सुख दे जें, वागवि जड जेंवि माय, दोष मथी. ॥ ९
नव्यप्रमोदकर, शिशुलीलासुभगांग बहुत, **ब**ळहरि ते ।
बाळ सुरगुरुहि झाले देहिहिता बापमायसे करिते. ॥ १०
नवनीतमोष सोसे **न**च भक्षी अंगज बहु ते माती, ।

---

१. विलक्षण, आश्चर्यकर. २. भयंकर. ३.समुद्र. ४.मार्गांत अडथळा. या गीतीचा अन्वय–[जेथ] भयद तम, घनगर्जित (=मेघगर्जना) व वर्ष (=पावसाच्या सरी), तेथ शेष [कृष्णाच्या मस्तका–]वरी [होता], [व कृष्णाला] वारिधितशी (=समुद्राप्रमाणेंच) यमुना सुखें (=सहज) वाटहि दे [व] मार्गविघ्न न करी, [हें] चित्र न गमो.५.जिचें आयुष्य सरलें आहे, अशी.६.विष.७.दुष्टबुद्धि (पूतना). ८. अमृताहून श्रेष्ठ. ९. वर देणारांत श्रेष्ठ अशा बाळकाची (=कृष्णाची) कीर्ति. १०. गाडा. ११.भग्न करणें=नाश करणें. १२. दैत्यविशेष. हा वाऱ्याच्या रूपानें गोकुळांत आला होता. १३. सुदेशाच्या वाटेस=मोक्षमार्गास.१४. पापाची रास. १५. कमलनेत्राच्या (=कृष्णाच्या) मुखांत. १६. भ्रांत होई, गोंधळे. १७. आकाशादिक पंच महाभूतें. १८. यशोदा. १९. द्रव्य. २०. शरीर. २१. वाल्मीकि इत्यादि. अन्वयः–गा! तरिच (=म्हणूनच,) वसु [व] देह वाहुनि (=अर्पण करून) ते वाल्मीकिप्रमुख यश गाति. २२. कल्याणप्रद. २३. ऋषिविशेष. हा यादवांचा गुरु. २४. अचेतन, अज्ञान. २५. नाशी. या अर्थाचा अन्वय–जें (=नाम) वाचेला सुख दे, जेविं माय [तेवीं] जड वागवी [=अजाणास सांभाळून घेई, (पक्षीं) अचेतन वस्तुमात्राचें अस्तित्व कायम राखी,] [आणि] दोष मथी. २६. नवा नवा आनंद देणारें. २७. बाळलीलेनें शोभत आहेत अंगें ज्यांचीं असे. २८. बळराम व कृष्ण. २९. देवश्रेष्ठ. ३०. प्राण्यांच्या हितास. ३१. लोणी चोरणारा. ३२. पुत्र.

वासवि सुमुख, वदे 'हा' बागुलसें विश्वमाय बाळा ती. ॥ ११
स्तनकाम मोघ होतां, भग्न करुनि मथनपात्र, मग भवते ।
वानर मेळवुनि, सुरस दे वांटुनि, खाय, पातली तंव ते. ॥ १२
न करी क्षमा तमोमति, भर तनुचा, न गति जववती तेणें, ।
वात्सल्यें सुत धरुं दे बांढे यशोदामबंध गणि लेणें. ॥ १३
घनं मोहांतुनि इभसे उद्धरि यमे अगम अवनतेष्टकर; ।
घे रूप वासुराचें देवारि, करी तदीय घात परं. ॥ १४
नगसा मोठा सुभयंकर अजगर, वत्से, तेहि तत्पाळ, ।
वासुनि मुख देवासहि गिळि, होय तया अवा तदा काळ. ॥ १५
नरशिशु मानुनि मोहें भक्षी, गलदग्ध बक हतेच्छ दमे, ।
बाळ हरि असुरदेहा चिरि सहज, नवार्द्र यवसमाचि गमे. ॥ १६

---

१. अन्वयः ती—विश्वमाय बाळा मुख वासवि (=पसरवी) [व] बागुलसें (=बोवाजीसारखें) [भीति घालण्यासाठीं] 'हा' (=हां, खबरदार!) वदे. २. स्तनपानाची इच्छा. ३. व्यर्थ. ४. ताक घुसळण्याचें भांडें, माथणी. ५. भोंवतीं. ६. दहीं. ७. यशोदा. ८. तमोगुणानें व्याप्त जिची बुद्धि अशी, तामसी, संतापलेली. ९. भार. १०. शरीराचा. ११. वेगवती. याचें विशेष्य 'गति'.अन्वयः—तनुचा भर, तेणें (=त्या शरीराच्या स्थूलपणामुळें) गति (=चाल) वेगवती (=जलद) न.१२. उत्तम यश ज्यांत आहे असा दाव्याचा बंध (=गांठ). १३. भूषण. अन्यपाठः— वाढ यशोदाम्रबंध गणि लेणें. १४. हत्तीसारखे. १५. जुळे. १६. वृक्ष. या वृक्षांचें नांव यमलार्जुन होतें. कुबेरपुत्र नलकूबर आणि मणिग्रीव हे नारदशापानें जुळे वृक्ष झाले होते.१७.नम्र झालेल्यांच्या इच्छा पुरविणारा. १८. राक्षस, वत्सासुर. यानें वासराचें रूप घेतलें होतें. १९. त्या दैत्याचा. २०.परंतु. २१.पर्वताएवढा मोठा. पाठभेदः—नग मोठासा. २२.सर्पविशेष. अघासुरानें हें रूप घेतलें होतें. हा पूतना व बक यांचा धाकटा भाऊ. २३. वासरें.२४. त्यांस (=वासरांस) राखणारे, गोपाळ. २५. पाप्यास किंवा अघासुरास. २६. तेव्हां. २७. नाशकर्ता. 'तदा काळ' ऐवजीं अन्यपाठ—तदघकाळ. २८. मनुष्याचीं मुलें. २९. गळा भाजलेला. ३०. बकासुर. हा बगळ्याच्या वेषानें आला होता. ३१ निराश. ३२. बकासुराच्या शरीरास. ३३. ताज्या ओल्या. ३४. गवतासारखा.

नलिनज[1] मोही, होउनि डिंभें[2] अनुगें[3] वत्स तेंहि वर्षभरी, ।
वाढवि सुख, न कळों दे भावा रामाहि विश्वकार्य[4] हरी. ॥ १७
नटतां समोर गर्दभ[6] गर्वें, बळ तेधवांचि त्यास वधी; ।
वानिति सुर देखुनि विभुबाहुप्रति[7], विजय निववि वासवधी[8]. ॥ १८
नटसा[9] प्रभु प्रमोदें भग्न करी फण[10] महागरळ[11] वमते[12], ।
वासुकि[13] शत देते बळ, बालिश[14] कालियतसेचि ते शमते[15]. ॥ १९
वनवन्हि[16] पी रमोत्सवभवन[17], व्रज रक्षि गजवरा[18] तेवी; ।
बा! सुहृदेकगुरु[19] नवा नित्य प्रिय हरिच या जना सेवी. ॥ २०
नगोपसमोरुवपु[20] असुर बलभद्र मर्गे प्रलंब[21] वधि तेजें, ।
वाहति कुसुमें[22] देवी, वानिति यश सत्सभा[23], मना ये जें. ॥ २१
नगजानियमोपासनभद्रमति[24] गवळणी स्वसुरतेहा[25] ।
बाळा सुदती; त्यां दे, वासें[26] चोरूनि, सदय वर ते हीं[27]. ॥ २२
नवसा परमोत्कांच्या[28] पावे प्रभविष्णु[29], गडबडुनि ते त्या ।
वाढिति सुरस पदेच्छुक[30] वाडवदार[31] प्रिय स्वपद[32] देत्यां[33]. ॥ २३

---

१. ब्रह्मदेव. २. गोपाळ, बालक. ३. अनुसरणारे, बरोबरचे. एकदां ब्रह्मदेवानें गोकुळांतील वासरें व गवळ्यांचीं मुलें चोरून नेलीं. तेव्हां कृष्णानें स्वतःच वासरें व गवळी यांचीं अनेक रूपें धारण करून, ब्रह्मदेवाचें कृत्य कोणासही भासूं दिलें नाहीं! हें पाहून ब्रह्मदेवाची कृष्णाच्या प्रभावाविषयीं खातरी झाली व तो अखेर गोवत्स व मुलें यांसह कृष्णास शरण गेला. या कथेवर येथें कवीचें लक्ष्य आहे. ४. आपला भाऊ जो राम त्यास. ५. विश्वरूप. ६. हें रूप धेनुकासुरानें घेतलें होतें. ७. देवाच्या भुजदंडाला. ८. इंद्राची बुद्धि. ९. नाच्या पोऱ्यासारखा. १०. फडा. ११. तीव्र विष. १२. ओकणारे. १३. सर्पविशेष. १४. मूर्ख. १५. नाश पावते. या अर्धाचा अन्वय–[जरि] शत वासुकि बळ देते, [तरि] ते बालिश [वासुकी] कालियतसेचि शमते. १६. दावाग्नि. १७. लक्ष्मीच्या आनंदाचें स्थान. कृष्ण. हा 'पी' या क्रियापदाचा कर्ता. १८. गजेंद्रास. १९. आप्तश्रेष्ठ. २०. मोठ्या पर्वतासारखें आहे प्रचंड शरीर ज्याचें. २१. राक्षसविशेष. हा गोपाळवेषानें आला होता. २२. पुष्पें. २३. साधूंची मंडळी. २४. कात्यायनीव्रताविषयीं ज्यांची शुभमति आहे अशा. २५. आपल्या रतिसुखाचे ठायीं आहे इच्छा ज्यांची अशा. २६. वस्त्रें. २७. कृष्ण. २८. अति उत्कंठितांच्या. २९. प्रभावयुक्त, सामर्थ्यवान्, पराक्रमी, प्रभू. ३०. (प्रभूचें) पद इच्छिणाऱ्या. ३१. ब्राह्मणस्त्रिया. ३२. आपलें स्थान. ३३. देणारास.

दिनें सप्त वृष्टि मोठी करि शक्र, भयार्त गवळि ते हरितें ।
बोहति, नग सप्त दिवस धरि, सुख दे, व्यसन बाढदयें हरि तें.॥ २४

म्हणुनि 'नमोस्तु' भवघ्ना गजवरवाहन नतेष्टदा राहे, ।
वाखाणुनि सुरभि वदे 'गोविंद,' नवात्मपयें अजा वाहे. ॥ २५

वननाथभृत्य मोहें ने व्रजभर्त्या, गमावते गवळी ।
वारिपथें तद्वसु दे, त्या जाउनि वारिनायकाजवळी. ॥ २६

मदनविमोहन वल्लभवेणुस्वरगति वनांत बहु माते. ।
'वामा सुरसें देह न सांवरि, किति वासे?' म्हणति जय गाते. ॥ २७

स्त्रीजनकामोद्दीपनभर गगनीं वर विमान ते रासीं; ।
वाणी सुरस वदे या, वानील समान काय येरासी? ॥ २८

नगजायात्रा मोठी, भक्षी अजगर वनांत ते दोघे; ।
वा! अहि उद्धरि, सुख दे, प्रभु वारुनि ताप शाप, यश तो घे.॥ २९

धनदांच्या मोठा खल भर्तृहितें अनुग बळेंचि तेज हरी, ।

---

१. वर्षाव. २. इंद्र. ३. भयानें पीडलेले. ४. बोलाविती. ५. गोवर्धनपर्वत. ६. अति-दयाळु. ७. निवारी. ८. नमस्कार असो. ९. संसारनाशकास. १०. श्रेष्ठ हत्ती (=ऐरावत) ज्याचें वाहन आहे असा, इंद्र. ११. नम्र झालेल्याची इच्छा पुरविणारास. १२. कामधेनु. १३. आपुलें ताजें दूध. १४. कृष्णास. १५. उदकाचा स्वामी वरुण त्याचा सेवक. १६. गोकुळाच्या स्वामीस, नंदास. १७. जलमार्गानें. १८. त्याचें द्रव्य. १९. वरुणाजवळ. २०. मदनाला मोहविणारी. २१. प्रिय कृष्णाच्या मुरलीच्या सुराची गति. २२. माजे, पसरे, भरे. २३. गवळिणी. या अर्धांत काव्यार्थापत्तिनामक अलंकार आहे. २४. वस्त्र. २५. [कृष्णाचा] जय गाणारे. २६. बायकांच्या अंगीं काम प्रज्वलित करणारा (प्रेमरसाचा) भर ज्यांत आहे असें. हें 'विमान' याचें विशेषण. २७. आकाशांत. २८. अन्वयः—ते रासीं (=त्या रासप्रसंगीं) वर (=वरती) गगनीं विमान [ही] (=विमान सुद्धां) स्त्रीजनकामोद्दीपनभर [झाले]. ती रासक्रीडा पाहून आकाशांत विमानांतून संचार करणाऱ्या देवस्त्रियासुद्धां कामविव्हळ झाल्या, हा या गीत्यर्धाचा भाव. २९. सरस्वती. ३०. अन्यास. ३१. पार्वतीची यात्रा. ३२. सर्पविशेष. अंगिराशापानें सुदर्शन विद्याधर अजगर झाला होता. ३३. सर्प. ३४. कुबेराचा. ३५. भर्त्याचा (स्वामीचा, कृष्णाचा) शत्रू. ३६. सेवक. याचें नांव शंखचूड. ३७. हट्टानें.

वाल तसे ने सुदंती; दे वायस पाय हंसकीर्तिवरी. ॥ ३०
नगगुरु, यमोग्र, वृषभ ध्वनिनें गर्भघ्न, वन्हि तेजानें, ।
वाढे तसाचि, केला व्यसु देवाजयद पीतचेलानें. ॥ ३१
अहिदलन मोरसा करि भवहर खलतुरगवध नतेष्टद, या ।
वानिति सुर वरदेशा, याची श्रितबालकीं यथेष्ट दया. ॥ ३२
वनदासि मोरसा, हरिभक्त गहिंवरोनि पूरितनतेहा ।
वानित, सुभाग्य देखे बाळा माश्रयपदा कृतस्नेहा. ॥ ३३
मन मोहीं गोपींचे भरलें, गडबडति, तेधवां रडती, ।
वाटे असुप्रयाणचि, देश दवानलचि, कायभर पडती. ॥ ३४
नगरीं प्रमोदभर जगदीशा अवलोकिते जन शिवास ।
जाले सुदामकुब्जादिक देही अभिनवाव्ययनिवास. ॥ ३५
गुरु बाणासन मोडुनि, इभ अगसा वधुनि, लेश तेजानें ।
वाढभुज व्यसु केले देवाप्रिय मल्ल, मत्त जे पानें. ॥ ३६
अघनग, परमोग्र, भयद, गरळकटुवचन, न ते स्वजन मानी, ।

---

१. सुंदर गवळणी. २. कावळा. वायस हंसकीर्तिवरी पाय दे=कावळा हंसाच्या यशाला तुच्छ करितो, कावळा हंसावर आपला तोरा मिरवितो. पाठभेदः–वाल नसे ते सुदती दे वायस पाय हंसकीर्तिवरी. ॥ **दृष्टांतालंकार** आहे. ३. पर्वतासारखा मोठा. ४. यमासारखा भयंकर. ५. बैल. अरिष्टासुरानें हें रूप घेतलें होतें. ६. डुरकण्यानें गर्भपात करणारा. ७. अग्नि. ८. जीवरहित. ९. देवांचा पराभव करणारा. १०. पीतांबरधारी कृष्णानें. ११. सर्पनाश. १२. संसारनाशक (कृष्ण). १३. दुष्ट घोड्याचा नाश. केशी दैत्यानें हें रूप घेतलें होतें. १४. वर देणारांत श्रेष्ठ अशास. १५. सेवकरूप बालकांवर. १६. परिपूर्ण. १७. मेघास. १८. अक्रूर. १९. पूर्ण केली आहे नम्र झालेल्यांची इच्छा ज्यानें अशास. २०. लक्ष्मीचें आश्रयस्थान अशा (बाळा). २१. केला आहे (=दाखविला आहे) स्नेह (=प्रेम) ज्यानें अशा (बाळा). २२. प्राणोत्क्रमण. २३. वणवा. २४. शरीररूपी [लांकडांचे] भारे. यांत **उत्प्रेक्षालंकार** आहे. २५. अत्यानंद. २६. पहाणारे. २७. कल्याणास. २८ सुदामा माळी व कुब्जा दासी इत्यादि. २९. मनुष्यें. ३०. नवीन नाशरहित स्थळ. ३१. मोठें धनुष्य. ३२. हत्ती कुवलयापीड. ३३. वृक्षासारखा. ३४. अल्प. ३५. पुष्टबाहु. याचें विशेष्य 'मल्ल'. ३६. देवशत्रु. ३७. चाणूरादिक. ३८. मद्यप्राशनानें. ३९. पापांचा पर्वत. ४०. फार भयंकर. ४१. विषासारखें कडू भाषण ज्याचें असा. ४२. आप्त. ४३. मान देई, आदरी.

खलमघवा व्यसु केला देशोहित कंस वारिनयं मानी. ॥ ३७
करुनि जनक मोदित, कुलभर्ता मग उग्रसेन, यादवं ते ।
स्वनिवाससुस्थित, मुदित देश शिवायनचि निजपदीं लवते; ॥ ३८
मृततनय यमोन्मोचित भव्य गुरुसि, मग कृतानति स्तवं ते ।
द्विषदनिलवासुकि प्रभु देति, शिवालयं सदैव जे सेवते. ॥ ३९
स्वज्ञानं मोहनाशक त्या भक्ता गवळिणींस ते, दास ।
प्रेषुनि, वासुनि मुख, तें देति, न शम ज्याशिवाय खेदास. ॥ ४०
नरपति मागध मोठें भयद गजादिबळ घे; स्वतेज, अरि- ।
वार्ता परिसुनि देशीं, दावाया ये; बुडोनि जाय परी. ॥ ४१
परंजनमोहद भट गजवरसेचि मदांध कोटि ते तीन ।
ज्याचे, वासुकिसा दे दरं, केला बाढे यवन असुहीन. ॥ ४२
नव पुरं परमोत्तम शुभगतिद रचि वनांत तेथ अज राहे, ।
कुळ वाढवि; बहु सुख दे, जसि बाळा माय; कीर्ति अजरा हे. ॥ ४३

---

१. दुष्टांचा इंद्र, अति दुष्ट असा कंस. २. देशाचा शत्रु. ३ पाण्यासारखा अधोगमनशील. ४. अभिमानी, गर्विष्ठ. ५. पिता वसुदेव. ६. वंशाचा पोषणकर्ता. ७. आपल्या स्थानीं स्थिर केलेले. ८. कल्याणस्थानच. अन्वयः–निजपदीं (=लवणारे, नम्र होणारे) देश मुदित शिवायनचि [करुनि]. ९. यमापासून सोडविलेला. १०. सुंदर. ११. गुरुजीस, सांदीपिनीस. १२. केला आहे नमस्कार ज्यांनीं. १३. शत्रुरूप वायूला सर्पाप्रमाणें भक्षिणारे. १४. कल्याणस्थान. १५. स्वतंत्र. १६. आत्मबोध. १७. अज्ञाननाशकर्तें. १८. उद्धव. १९. पाठभेदः–जें. २०. शांति. या गीतीचा अन्वय–ते (=रामकृष्ण) त्या भक्ता गवळणींस, दास प्रेषुनि, मुख वासुनि, ज्याशिवाय खेदास शम न, तें मोहनाशक स्वज्ञान देती. अन्यपाठ–स्वज्ञा**न मो**हनाशक त्या **भ**क्ता **गव**ळणींस **ते वा**स । प्रेषुनि मुखजें **सु**ख जें **दे**ति न समजाशि**वाय** खेदास. ॥ २१. राजा. २२. जरासंध. २३. आपला पराक्रम. २४. पराभव पावला. या गीतीचा अन्वय–मागध नरपति देशीं (=स्वदेशीं) अरिवार्ता परिसुनि मोठें भयद गजादिबळ घे [व] स्वतेज दावाया ये, परी बुडोनि जाय २५. शत्रूंस मूर्च्छा किंवा भय देणारे. २६. योद्धे. २७. मोठ्या हत्तीसारखे. २८. गर्वानें चढून गेलेले. २९. वासुकिसर्पासारखा. ३०. भय. ३१. दृढ. ३२. काळयवन. ३३. प्राणरहित. ३४. नवीन शहर द्वारका. ३५. अति उत्तम. ३६. उत्तम गति देणारा कृष्ण. ३७. उदकांत. ३८. कृष्ण. ३९. वंश. ४०. जीर्ण न झालेली, अक्षय्य.

नरसेचि पळति, मोठें भय दाविति, सागरीं वसति अज तें. ।
वा! सुरभितें न देखति, वाढुनि हृदयांत पाय यां भजते. ॥ ४४
नवरी रेवति मोदें बळभद्रा मग वरी, पदींच रते; ।
जें वारिरुह सुरस दे, वाळुनि त्या काय मधुकरी परते? ॥ ४५
खलजन मोघाश करुनि, भव्या मग वरिलि भीष्मकी मा तें, ।
वाहे सुदेववाडव, पत्र प्रेषूनि म्हणति 'यश गातें.' ॥ ४६
मदन रमोदरज भयें सागरिं शंबर हतेच्छ बुडवि, परी ।
वाढुनि, असुर वधुनि, दे दर्शन; बहु हृष्ट बापमाय करी. ॥ ४७
सुबहु दिन मोहद समर भक्त करुनि संगरोत्सव, सुतेतें ।
वाहे मणि, वसु, देहहि; जें श्री सुख, हेहि बायको घे तें. ॥ ४८
मन मोडुनि, भय पावे; गडबडुनि सुतेसि सूर्यसख अर्पी, ।
वानिति सुरी गदेपरि वास हरिकरीं, यशें जना तर्पी. ॥ ४९

---

१. मनुष्यांसारखे. २. ते रामकृष्ण. ३. कामधेनूस. अन्वयः—वा, [रामकृष्णांचे] पाय हृदयांत वाढुनि यां भजते (=भजणारे लोक) सुरभितें न देखती (=कामधेनूकडे ढुंकून सुद्धां पहात नाहींत). सुरभीपेक्षांही रामकृष्णांचे पायच भक्तांना अधिक प्रिय व काम पुरविणारे होतात, हा या अर्थाचा मतलब. **प्रतीप.** ४. कमळ. ५. टाकून. ६. भ्रमरी. या गीतींत **वस्तुप्रतिवस्तूपमा**लंकार आहे. ७. दुष्ट. ८. निराश. ९. सुंदरी. १०. भीष्मकराजाची मुलगी रुक्मिणी. ११. लक्ष्मी. १२. सुदेव ब्राह्मण. १३. पाठवून. उत्तरार्धाचा अन्वय—(भीष्मकी) सुदेव वाडव वाहे (=बोलावी) [व] पत्र प्रेषून म्हणति (=म्हणते), '[मी तुमचें] यश गातें (=गात आहें). [तरी माझें त्वरित धांवून रक्षण करावें].' पाठभेदः—वाहे सुदेव वाडव······ गा तें. ॥ १४. लक्ष्मीच्या म्हणजे रुक्मिणीच्या पोटीं आलेला मदनाचा अवतार, प्रद्युम्न. १५. दैत्यविशेष. १६. दुष्ट आहे इच्छा ज्याची असा. १७. परंतु. १८. आनंदित. १९. श्रीकृष्ण व रुक्मिणी. २०. युद्ध. २१. भक्त जांबुवंत. २२. युद्धाची आहे आवड ज्यास असा. २३. कन्येस. २४. स्यमंतकमणि. २५. द्रव्य. २६. शरीर. २७. या गीतीचा अन्वय—संगरोत्सव भक्त सुबहु दिन मोहद समर करुनि, सुतेतें, मणि, वसु, देहहि वाहे; जें सुख श्री (=रुक्मिणी) [घे], तें हेहि बायको घे. २८. सत्यभामेस. २९. सत्राजित्. ३०. देवस्त्रिया. ३१. वसति. ३२. कृष्णाच्या हातांत. ३३. तृप्त करी.

न[1] जगे हेमोदयरुचि[2]; भक्त[3] जगन्मत[4] सर्वक्रियेंत[5] रते[6], ।
वाहे मणि, वसु, देवा; यश ये; हें समजती, सुधी[7] नर ते. ॥ ५०
रवितनया[8] परमोत्का[9] भजनें जगदीश्वर[10] स्वयें वरि ते, ।
वास[11] सुकृतें[12] पदीं दे वारिजशय[13] त्यांसि, दास्य[14] जे करिते[15]. ॥ ५१
नवरी प्रभु प्रमोदें पितृभगिनीजाहि[16] मगं वरी, अरि[17] ते ।
बाहुनि सुजविति देशप[18] बाहुज[19] नयनें[20] झटोनि रणें[21] करिते. ॥ ५२
नग्नजितें[22] मोदभरें[23] वृषगर्वहरा[24], वरा[25], नतेष्टकरा[26], ।
वाहिलि सुता[27] सुदेशजवारणहयसह[28], न आवरूनि करा[29]. ॥ ५३
परं[30] न मना ये[31], मोहे, तातभगिन्यंगजा[32] वरी; भ्राते[33] ।
वाहोनि, सुखें देती वाढश्रेयस्करा[34] वरा यां[35] ते. ॥ ५४
मद्रनरपभू[36] मोदें इभगति[37] वरिलि, विसरे न ते कृष्णा; ।
वासवजें[38] सुज्ञें जसि देवी नववारिजनयना[39] कृष्णा[40]. ॥ ५५

---

१. नष्ट झाली. २. द्रव्यप्राप्तीची इच्छा ज्याला आहे असा. ३. उद्धव. ४. जगास मान्य. ५. यज्ञक्रियेंत. ६. रमला. ७. शहाणे. ८. सूर्यकन्या, कालिंदी. ९. फार उत्कंठित. १०. 'जगदीश्वरा'–असा पाठभेद. ११. स्थान. १२. पुण्यानें. १३. कमलाप्रमाणें आहेत हात ज्याचे असा कृष्ण. १४. सेवा. १५. करणारे. अन्वयः–जे दास्य (=सेवा, भक्ति) करिते, त्यांसि वारिजशय (=कृष्ण) सुकृतें (=त्यांच्या पुण्याईमुळें) पदीं वास दे. **अर्थान्तरन्यास.** १६. कृष्णाची आत राजाधिदेवी, तिची कन्या मित्रविंदा. १७. पाठभेदः–अरितें. १८. राजे. १९. क्षत्रिय. २०. नयनें सुजविणें=रडून रडून डोळे सुजवणें, दुःखांत पडणें. २१. युद्ध करणारे. २२. नामविशेष राजानें. २३. अति आनंदानें. २४. बैलांचा गर्व हरण करणाऱ्याला. नग्नजितानें आपल्या जवळच्या उन्मत्त सात बैलांस जो वेसन घालील, त्यास मुलगी देण्याचा पण केला होता. २५. नवरे मुलास किंवा श्रेष्ठास. २६. नम्र झालेल्यांचे हेतु पुरविणारास. २७. हिचें नांव सत्या होतें. २८. उत्तम देशांत जन्मलेले हत्ती व घोडे यांसह. २९. करा न आवरूनि=हात न आटोपून, चिकटपणा न करून, सढळ हातानें. ३०. अन्य. ३१. मनास येणें=आवडणें. ३२. कृष्णाची आत श्रुतकीर्ति, तिची मुलगी भद्रा. ३३. भाऊ संतर्दनादिक. ३४. अत्यंत हितकर्त्यास. ३५. वरा=नवऱ्यास. पाठभेदः–वरायातें. ३६. मद्रदेशचा राजा, बृहत्सेन याची मुलगी लक्ष्मणा. ३७. गजगति, हत्तीसारखी जिची गति आहे अशी. ३८. इंद्रपुत्र अर्जुनानें. ३९. नूतन कमळाप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी. ४०. द्रौपदी.

नरका[1] मोठ्या समरीं भस्म करी, मग वैरी स्त्रिया; तेजें[2] ।
हरि वासवमद,[3] सुरतरु[4] दे मागे इष्ट बायको तें जें. ॥ ५६
नवऱ्या मोदें भव्यीं लग्नीं[5] जगदीश वरुनि, ते सोळा ।
वामा[6] सहस्र, तितुक्यां सुख दे; वाक्कायमन[7] पदीं घोळा.[8] ॥ ५७
नर्म[9] श्रीमोहद[10] करि भवभंजन,[11] गर्व नुरवि लव तेणें; ।
'वाक्यें सुरसें' देवाचार्य[12] म्हणे, 'काय! मी अशीं नेणें;[13] ॥ ५८
रुक्मी[14] नय[15] मोडी, त्यजि भय, खळ कालिंगकादि[16] वळते[17] ज्या ।
वाइटहि असुनि देती, शलभ[18] दवा[19] तेंवि होय बळतेजा.[20] ॥ ५९
बळिनंदन[21] मोठा हरभक्त[22] महागर्व,[23] वरज[24] तेज जया, ।
बाहुसहस्र;[25] सुरोत्तम[26] दे, वारुनि अनय,[27] जीवदान तया. ॥ ६०
वनदसमोदार[28] भला नृग[29] नृपवर तारिला नतेष्टकरें, ।
वारिजनाभें,[30] सुज्ञें, वरदेशें,[31] यादवान्ववायवरें.[32] ॥ ६१
व्रजजन[33] मोदित करि, बळभद्र जगन्नाथ पुरवि वनितेहा,[34] ।
वात्सल्यें सुख दे, कीं ह्मणती बालक वयस्य[35] मनिं ते 'हा'[36]. ॥ ६२
नरपति पौंड्रक[37] मोहें 'ईश' ह्मणे 'जेंवि भणंग[38] मानव ते,' ।

---

१. नरकासुरास. २. पराक्रमानें. ३. इंद्रगर्व. ४. पारिजातक वृक्ष. ५. उत्तम मुहूर्तावर. ६. स्त्रिया. ७. वाणी, शरीर व मन. ८. अर्पा, वाहा. ९. विनोद. १०. लक्ष्मीस (रुक्मिणीस) श्रमविणारें. ११. संसारनाशक, कृष्ण. १२. बृहस्पति. १३. समजत नाहींत, येत नाहींत. या गीतीचा अन्वय—भवभंजन श्रीमोहद नर्म करी, तेणें [श्रीचा] गर्व लव नुरवी; देवाचार्य म्हणे, काय (=किती) सुरसें वाक्यें! मी अशीं [सुरसें वाक्यें] नेणें. १४. रुक्मिणीचा भाऊ. १५. नीति. १६. कालिंग इत्यादि राजे. १७. अधीन, अंकित, अनुकूळ, साह्य. १८. टोळ. १९. वणव्यास. २०. बळरामाच्या पराक्रमास. २१. बळीचा पुत्र, बाणासुर. २२. शिवभक्त. २३. मोठा गर्विष्ठ. २४. [शिवाच्या] वरापासून प्राप्त झालेलें (तेज). २५. ज्याला हजार हात आहेत असा. २६. सुरश्रेष्ठ, कृष्ण. २७. अनीति. २८. मेघासारखा उदार. २९. नामविशेष राजा. हा इक्ष्वाकूचा पुत्र असून ब्राह्मणशापानें सरड झाला होता. ३०. पद्मनाभ जो कृष्ण त्यानें. ३१. वर देणारांचे स्वामीनें. ३२. यादववंशश्रेष्ठानें. ३३. गोकुळांतील लोक. ३४. स्त्रियांची इच्छा, गोपींची इच्छा. ३५. मित्र. ३६. हाय, हाय. ३७. नामविशेष राजा. यानें वासुदेव हें नांव धारण करून कृष्णाचीं चिन्हेंही धारण केलीं होतीं. ३८. भिकारी.

त्या वधुनि वासुदेव न करिता, बा! सुकवि कार्य मानवते? ॥ ६३
[1]वानर मोठा खळ [2]भवविपदगदें [3]रैवतेच्छितक्रीडें ॥
[4]वाम [5]विहतसुर वधिला [6]देशसवापाय [7]हृतधरापीडें. ॥ ६४
नय मोडुनि [8]भवहरजा [9]गजपुरिं करि बद्ध, तेधवां दुष्ट।
[10]बालिश सुयोधन वदे [11]वाईट, ऐकोनि होय बळ रुष्ट. ॥ ६५
[12]नगरें [13]यमोग्र [14]हळें उचटुनि, [15]भगवत्पादज [16]सरितेमाजी।
बुडवित होता, [17]वासुनि मुख 'दे बा! अभय' वदति [18]जनराजी. ॥ ६६
नव [19]मोद [20]प्रतिभवनग [21]गदपूर्वज [22]चित्रें [23]भावें ते दावी,।
वाटे सुख [24]देवमुनिस, वाढवि यश जो अनंत, वेदा [25]वी. ॥ ६७
[26]नरपतिमोचन, [27]भक्तसुगम, [28]मागध वधुनि तेहि, [29]पार्थसख,।
चिंता वारी, सुख दे धर्मा, [30]वागवुनि [31]राजसूयमख. ॥ ६८
नरपति [32]शापविमोहित [33]भगवद्द्वेषींच जो रते [34]चैद्य।
बा! [35]गति सुदर्शनें दे मारुनि त्यातें [36]भवामयसुवैद्य. ॥ ६९
मनं मोहे [37]धर्मभंगें, गमवि [38]वन [39]स्थळें, भुलोनि तेथ पडे,।

---

१. याचें नांव द्विविद व हा नरकासुराचा मित्र होता. २. संसाररूप रोगाला औषधरूप अशा. ३. रैवतपर्वतावर इच्छिली आहे क्रीडा ज्यानें (=बळरामानें). ४. वांकडा, तेढा. ५. मारिले आहेत देव ज्यानें. ६. देशांतील यज्ञांचा नाश करणारा. ७. दूर केली आहे पृथ्वीची पीडा ज्यानें. ८. संसारनाशकाचा (=कृष्णाचा) पुत्र सांब यास. ९. हस्तिनापुरांत. १०. मूर्ख. ११. दुर्वचनें बोले, शिवीगाळ करी. १२. हस्तिनापुर. १३. यमासारख्या भयंकर. १४. नांगरानें. १५. भगवंताच्या पायापासून उत्पन्न झालेल्या. १६. नदींत, गंगेंत. १७. मुख वासणें=याचना करणें, भीक मागणें. १८. लोकसमुदाय. अन्यपाठ—देवा अभय वदलि जनराजी. १९. आनंद. २०. प्रत्येक घरीं जाणारा. २१. कृष्ण. २२. निरनिराळे. २३. (शृंगार) क्रिया. २४. नारदास. २५. प्रसवे. २६. राजांस मुक्तकर्ता. २७. भक्तांस सुलभ. २८. जरासंध. २९. कृष्ण. ३०. चालवून. ३१. राजसूययज्ञ. ३२. शापानें मोह पावलेला. शिशुपाल हा पूर्वजन्मीं श्रीविष्णूचा द्वारपाळ होता. त्यास सनत्कुमारानें शाप दिल्यामुळें हिरण्यकशिपु, रावण व शिशुपाळ असे तीन जन्म पावला. ३३. कृष्णद्वेषांतच. ३४. शिशुपाळ. ३५. मोक्ष. ३६. संसाररूप रोगाचा उत्तम वैद्य. ३७. युधिष्ठिराच्या वैभवानें. ३८. उदक. ३९. जमीन.

बाळ सुयोधन देखे स्वपरिभवा, हास्य मयसभेंत घडे. ॥ ७०
नगरी मोहें रोधी सौभ, गगननयानचर बळी मातें, ।
घनवात सुनाभायुध नादे निववावयासि यश गाते. ॥ ७१
निजजनसंग्रामोद्यम भव्य गमेना, न वळति ते कोणी, ।
'बरवा सुतीर्थदेशीं वास' ह्मणे, जाय बळ, फिरे क्षोणी. ॥ ७२
सज्जन मोदित केले शुभभगतिवरलाभकाम जे होते, ।
करि तत्सवाहित व्यसु; दे, वाडव कथिति अर्थचर्य जे, ते. ॥ ७३
नमुनि प्रमोदवि पृथुक भक्षुनि, गहिंवरुनि तेधवां परते ।
वाडव सखा सुदामा, त्या दे वासार्थ हेममय पुर तें. ॥ ७४
जन रविचा मोठा शुभ उपराग श्रवण करुनि ते आले, ।
सहवास कुरुसुदेशीं बाहुजसमुदाय पावते झाले. ॥ ७५
द्रुपदतनयेसि मोदें भगवत्प्रियदार ते कथिति लग्नें,
बा! ज्या सुरसीं देवीचित्तें बावरुनि हर्षिसीं मग्नें. ॥ ७६
नंदन मोहें भजती, गमति तदा सत्य वत्स ते पितर; ।
बाप वसुदेव वाटे नंदयशोदापुढें जना इतर. ॥ ७७
'गोपी नलिनीच, तमोहर भगवान्' वदति जाणते, अथवा ।

---

१. धर्माचे राजमंदिरांत. हें मयासुरानें बांधलें होतें. २. द्वारका. ३. वेढून टाकी. ४. शाल्व. ५. विमानांत बसून जाणारा. शाल्वास हें विमान शंकरापासून मिळालें होतें. ६. बळवान्. ७. उन्मत्त झाला. ८. सुदर्शनचक्र आहे आयुध ज्याचें असा. या गीतीचा अन्वय—गगनयानचर बळी सौभ माते [व] मोहें नगरी रोधी; यश गाते (=कीर्ति गाणारे भक्त) निववावयासि (तृप्त करण्यास्तव) सुनाभायुध घनवात [मेघ व वारा यांप्रमाणें] नादे (गर्जना करी). ९. आपल्या आप्तांचा युद्धाविषयीं उद्योग. १०. कल्याणकर. ११. चांगलीं तीर्थें आहेत ज्यांत अशा देशांत. १२. राहणें. १३. बळराम. १४. पृथ्वी. १५. मोक्षपदाच्या वरप्राप्तीची इच्छा आहे ज्यांस असे. १६. त्यांच्या यज्ञाचे शत्रु. १७. द्रव्यराशि. १८. पोहे. १९. राहण्यासाठीं. २०. सुवर्णाचें. २१. सूर्यग्रहण. २२. एकत्र वस्ती, संगति. २३. कुरुक्षेत्रांत. २४. क्षत्रियांचे समुदाय. २५. द्रौपदीस. २६. श्रीकृष्णाच्या प्रियपत्न्या. २७. देवस्त्रियांचीं मनें. २८. संतुष्ट, आनंदित, तृप्त. २९. गढून गेलेलीं. ३०. प्रेमानें. ३१. खरे. ३२. पुत्र. ३३. परका. या अर्थात **व्यतिरेकालंकार** आहे. ३४. कमलिनी. ३५. अंधकारनाशक सूर्य. ३६. सुज्ञ.

'सुकल्या वल्ली, देवहि वारिद' यश साधु हो! असें कथवा. ॥ ७८
नयनें मोदाश्रुभरें अंगजें बळ कृष्ण ते भरति तूर्ण; ।
बाळ व्यसु देवकिला दाविति; वानील काय कवि पूर्ण? ॥ ७९
मनें मोह शुभगुणगणें पावे; बळतेज उग्र, परि शिकवी; ।
वासविस सुभद्रा दे; वानितिल उगेचि काय हरिशि कवी? ॥ ८०
अनुदिनें मोदित भजनीं, सदनुगवर, शांतितेजआवास, ।
त्या सुज्ञा श्रुतदेवा भेटे यदुराज भुलुनि भावास. ॥ ८१
नरपति मोठा भक्त स्वगतचि बहुलाश्व भूप तेथ वसे, ।
त्या वासुदेव वाढवि सुयशें; या नत, पित्यास पुत्रतसे. ॥ ८२
चित्तं न मोडी, भक्तीं अनुरागें बहु, स्वदास ते तारी; ।
मुख वासु, देचि वारि, प्रिय घन चातकतृषा स्वयें वारी. ॥ ८३
हरिचि घन, मोर भक्तचि, कीं गर्जति करिति नृत्य सोत्सव ते, ।
वारुनि अघ, सुख देती जीवां प्रभुवर्यपाय हे स्वतें. ॥ ८४
शमनें करुनि मोहाचें, भजकां, जे गति 'वरा' म्हणति कवि, ते ।

---

१. वेली. २. मेघ. या गीतींत **परंपरितरूपक** आहे. ३. नेत्र. ४. आनंदाश्रूंच्या भरानें. ५. पुत्र. ६. मृतपुत्र. ७. अन्वयः—[हरीच्या] शुभगुणगणें मन मोह पावे (=मोहून जातें); [कारण] बळतेज (=बळरामाची संतापी प्रकृति) उग्र, परि (=परंतु) [हरि त्यास] शिकवी (=समजावी) [व] वासविस सुभद्रा दे; [असें न होतें तर] कवि हरिसि उगेचि वानितील काय? ८. शुभगुणांच्या समुदायानें. ९. भयंकर. १०. अर्जुनास. ११. दररोज. १२. सद्भक्तश्रेष्ठ. १३. शांति आणि तेज यांचें स्थान. १४. मिथिला नगरींतल्या श्रुतिदेव नांवाच्या कृष्णभक्त ब्राह्मणाला. १५. यादवश्रेष्ठ कृष्ण. १६. भक्तीस. १७. आत्मस्वरूपीं रमलेला. १८. मिथिला नगरीचा राजा. १९. नम्र झालेले. २०. चित्त न मोडणें=इच्छा पूर्ण करणें. २१. प्रेम. २२. अन्वयः—[चातक] मुख वासू (=चातकानें तोंड मात्र वासावें, म्हणजे), प्रिय घन वारि देचि, [व] स्वयें चातकतृषा वारी. **दृष्टान्त.** २३. उदक. २४. चातकपक्ष्याची तहान. २५. आनंदानें. कार्यांचें कारणासह वर्णन केल्यामुळें या अर्थात **हेतुनामक** अलंकार झाला आहे. २६. भक्त. २७. पातक. २८. प्राण्यास. २९. कृष्णाचे पाय. ३०. स्वतंत्र किंवा स्वतः. ३१. नाश. ३२. अज्ञानाचें. ३३. भक्तांस. ३४. श्रेष्ठ.

सदरिपवनवासुकि दे; वागवितिल काय पर असे अविते. ॥ ८५
नगजेशा मोठा खळ भंजुनि, गळां पडुनि, वर वरुनि परते, ।
बाळे वृकासुर देवा 'हाय!' म्हणवि, अमर कांपले पर ते. ॥ ८६
वचनं अमोघ; न व्हाया भस्म गरग्रीवें लोक ते शर्वे ।
भ्रमतां, वासुनि मुख 'हा!' म्हणती देवादि सभयधी सर्व. ॥ ८७
व्यसनं तसें मोठें, भव गडबडतां, तेहि लोकपति, बाळे ।
भूसुर विष्णु वृका दे वामनसा भेटि सद्भयदकाळ. ॥ ८८
वृकमनं मोहुनि, भगवान् वदला तेव्हां भवाहिता असुरा ।
"दे बा! शिरीं शयें, मृषा हरिहरमायाचि भुलवि, बहु न सुरा."॥ ८९
नवल असें मोठें भवगजहरि करि, वज्रतेज पाणि धरी ।
वासवचि सुनाभकरच्छल, देवारांति होय तो शिखरी. ॥ ९०
नवें मोत्यांचे दाणेसे डिंभ गमावले, न ते हानी ।
लघु, वाडवें सुतशोकीं दे गाळी, यादवांसिनय मानी. ॥ ९१
नर मोठा पणभर घे, 'गवते यादव' ह्मणे, 'शिवा दशमीं ।

१. साधूंच्या शत्रुरूप वाऱ्यास भक्षिणारे सर्प. २. अन्य. ३. पिते नव्हेत ते. या गीतीचा अन्वय—मोहाचें शमन करुनि, सदरिपवनवासुकि, कवि जे गति 'वरा' म्हणति, ते [गति] भजकां दे, पर अविते असे वागवितील काय? ४. शंकरास. ५. मूर्ख. ६. शंकरास. ७. देव. ८. श्रेष्ठ. ९. अचूक. १०. विषकंठ, शिव. ११. शिव. १२. देव इत्यादि. १३. भयभीत झालें आहे मन ज्यांचें असे. या गीतीचा अन्वय—वचन अमोघ [होतें], [तेव्हां] ते लोक भस्म न व्हाया, गरग्रीव शर्व भ्रमतां, देवादि सभयधी सर्व मुख वासुनि 'हा' म्हणति. १४. संकट. १५. शंकर. १६. इंद्रादि लोकपाळ. १७. ब्राह्मण बटूचें रूप धारण करणारा विष्णु. १८. साधूंना भीति देणारांचा नाशकर्ता. १९. शंकराचा शत्रु वृकासुर त्यास. २०. [आपल्याच] डोक्यावर. २१. हात. २२. खोटी. २३. विष्णु व शंकर यांची मायाच. २४. मद्य. या अर्धांत **व्यतिरेकालंकार** आहे. २५. संसाररूप हत्तीचा सिंह. २६. वज्राचा दृढपणा. २७. हात. २८. इंद्रच. २९. विष्णूच्या वेषानें. **मिषापह्नुति.** ३०. देवशत्रु. ३१. पर्वत. **रूपक.** ३२. नऊ. ३३. बालक. ३४. ब्राह्मण. ३५. यादवांचा मोठा अन्याय. ३६. अर्जुन. ३७. प्रतिज्ञेचा भार. ३८. गवतासारखे, अजागळ, कमकुवत. ३९. कल्याणास. ४०. दहाव्या, हें स्तुतीं याचें विशेषण.

स्पष्ट तव सुतीं देउनि; संपादिन वाडवोत्तमा! यश मी. ॥ ९२
अनळीं मोघपण भसित हो; नर गणिती न वपुसि, जे कवि, ते.' ।
वासवि सुज्ञ वदे, करि बाणालय, अबल ज्या पवनसविते. ॥ ९३
तरि न उरे शिशु, मोहे भगवत्सख, तेधवां धवलवाहा ।
कृष्ण ह्मणे, "मी द्विजसुत देतों बा! काय तूं ह्मणसि 'हा! हा!' ९४
नर परमोदार रथीं घे, भगवान् द्रुतें निघे प्रवरतेजा ।
वातसुगति देश क्रमि बा! शिवले काय? न रविकर ते ज्या. ॥ ९५
दावी परमघनतमोहर भगवत्प्रहित चक्रतेज पथा, ।
वासवसुतसह देशा ने वारिजनयन अद्भुता स्वरथा. ॥ ९६
शेषशयन, परमोत्तम, भक्तस्वरगम, अनादि, वरतेजा, ।
बापा सुतसे, देखति वासवियदुराय बद्धकर ते ज्या. ॥ ९७
अज्ञानतमोघ्न ह्मणे, 'भर जगतीचा हरा, वधुनि परे ते, ।
द्रुत या; न्या वाडवसुत मज देवा प्रिय सदा पदा स्मरते ? ॥ ९८
नमुनि घना मोरतसे भगवत्प्रेरित फिरोनि नरहरि ते।

---

१. खरोखर. २. ब्राह्मणश्रेष्ठा. ३. अग्नींत. ४. निष्फळ आहे पण ज्याचा असा. ५. हो=होवो. अन्यपाठ—होइ न गणति. ६. देहास. ७. सुज्ञ. **अर्थान्तरन्यास.** ८. बाणांचें घर. ९. दुर्बळ. १०. वारा व सूर्य. ज्या पवनसविते अबळ=ज्याशीं तुलना केली असतां, वारा व सूर्य हे केवळ दुबळे ठरले; ज्यांत वारा व सूर्यकिरण यांचा शिरकाव होऊं शकला नाहीं. ११. गोंधळे, भांबावे. १२. कृष्णाचा मित्र अर्जुन. १३. अर्जुनास. १४. मोठा उदार. १५. सत्वर. १६. श्रेष्ठ आहे तेज ज्याचें. १७. वाऱ्यासारखा वेगवान्. १८. ओलांडी. १९ सूर्यकिरण. २०. अति दाट अंधकार नाहींसा करणारें. २१. भगवंतानें सोडलेलें. २२. सुदर्शनाचें तेज. २३. मार्गास. २४. अर्जुनासह. २५. कमलनेत्र कृष्ण. २६. अलौकिक अशा. २७. शेष आहे शय्या ज्याची असा विष्णु. २८. भक्तांचा कल्पवृक्ष. २९. ज्यास जन्म नाहीं असा. ३०. श्रेष्ठ तेजाचा. ३१ ज्यांनीं हात जोडिले आहेत असे. ३२. अज्ञानरूप अंधकार नाहींसा करणारा विष्णु. ३३. भार. ३४. पृथ्वीचा. ३५. शत्रु. ३६. ब्राह्मणपुत्र. ३७. स्मरणारे. या गीतीचा अन्वय—अज्ञानतमोघ्न म्हणे जगतीचा भर हरा, ते पर वधुनि द्रुत या, वाडवसुत न्या; सदा पदा स्मरते मज देवा प्रिय. ३८. मोरासारखे. ३९. भगवंतानें पाठविलेले. ४०. अर्जुन व कृष्ण.

येती वाहुनि दश सुत, देति तया, नवनवाभ्युदय करिते. ॥ ९९
सुजनप्रमोदकर मुनि करिती भगवत्त्रयीं विवादा ते, ।
वाडव सुज्ञ भृगु वदे, 'वारिन संशय, तुम्ही निवा दाते.' ॥ १००
कोप अनमनें मोठा भगवद्‌द्रुहिणाच्या मनीं उठे, न उते, ।
धरि वाट सुरमणिशिं, दे न शिवो, बा! यद्गुण श्रितोघ धुते. ॥ १०१
अनलपरमोग्र शूलें भस्म श्रीगर्लें करावया पाहे, ।
तेंव्हां शिवा सुदेवी वारी, दृढ पाय धरुनियां राहे. ॥ १०२
अविनीत मांधामोरीं, भय न धरुनि, रागें करि, पदें हाणी, ।
वरतेजा भृगु वाडव सुज्ञ गदेला नवा अजेय आणी. ॥ १०३
उठुनि, नमी मोक्षदगुरु परि भक्ता, गेजवजोनि ते लत्ता ।
वानी, मानी सुख, 'शुचि देह, शिवालय' ह्मणे 'खरी सत्ता'. ॥ १०४
सत्रीं जन प्रमोदित भृगुनें भगवद्यशेंचि ते केले, ।
वानिति भूसुर देवा यत्स्मरणें ताप पापसह गेले. ॥ १०५
नद्युत्तमा तमोघ्नी भव्यगती गी, तिच्या तटीं वसते ।
वाडव सुज्ञ करिति हा, देवाग्र्या पारखुनि, यशोरस ते. ॥ १०६

---

१. नवीन नवीन ऐश्वर्य. २. करणारे, देणारे. ३. साधुजनांस आनंद देणारे. ४. ब्रह्मदेव, विष्णु, व शंकर या तिघांविषयीं. ५. वादविवादाला, खलातें, भवति न भवतीला, विचारातें. ६. ज्ञाता. ७. ब्राह्मणविशेष. ८. नमस्कार न केल्यानें. ९. पूज्य अशा ब्रह्मदेवाच्या. १०. [परंतु भृगु] उद्धट झाला नाहीं. [त्यानें नम्रतेनें ब्रह्मदेवाचा कोप शांत केला]. ११. गेला. १२. सुरेशाकडे, शंभूजवळ. १३. ज्याचे गुण. १४. आश्रिताचें पातक नाहींसें करणारे. १५. अग्नीसारख्या मोठ्या भयंकर. १६. शंकर. १७. पार्वती. १८. परावृत्त करी. १९. उद्धट. २०. लक्ष्मीपतीच्या उरीं. २१. मोठा तेजस्वी. २२. अपयश. शत्रूची हड्डी नरम करणारी गदा ज्याच्या हातांत वागते, अशा विष्णूचा हाच पहिला अपमान होय, असा त्यानें पूर्वीं कधींही सहन केला नव्हता, हा या गीत्यर्धाचा भाव. २३. मोक्ष देणारांत श्रेष्ठ. २४. परंतु. २५. लाथ. २६. शुद्ध. २७. कल्याणस्थान, मंगलाचें माहेर. २८. [ब्राह्मणांचा] अधिकार. २९. विष्णुकीर्तीनें. ३०. ब्राह्मण. ३१. ज्याच्या स्मरणानें. ३२. पापांसह. ३३. नदींत श्रेष्ठ. ३४. पापनाशक. ३५. कल्याण देणारी आहे चाल जिची अशी. ३६. सरस्वती. ३७. राहणारे. ३८. देवश्रेष्ठास. ३९. ठरवून. ४०. भगवत्कीर्तीचा उत्सव.

संतत नव परमोत्सव[1] भरले नगरींत वसति ते करिती. ।
वाद्यें, सुस्वर गीतें, देवालयें[2]गर्व सर्वही हरिती. ॥ १०७
वनद[3] प्रभुवर, मोरचि भक्तगण[4], वदान्य[5]तेसि पार[6] नसे, ।
वाखाणिति सुखदेश्वरवार्ता[7] कविराय[8]ही अशेष[9] कसे? ॥ १०८

---

उपसंहार.

**मंत्रमयं**[10] रचुनि भावें **भागवता**, नमुनि **दे**वदेवा[11], हे ।
तुलसीच **रामनंदन**, 'सेवा ऐशीच दे' वदे, वाहे[12]. ॥ १०९

---

## २. मदालसोपाख्यान.

( गीतिवृत्त. )

### अध्याय पहिला.

श्री**शं**भुच्या प्रसादें झाली त्रिजगीं **म**दालसा मान्या, ।
बुध हो! या साध्वीतें, सेवुनि सुयश, न वदाल सामान्या. ॥ १
**मा**र्कंडेयपुराणीं या देवीचें चरित्र सन्महित[13], ।
ज्याच्या गानें पानें होतें व्हावेंतसेंचि जन्महित. ॥ २
पूर्वी होता राजा, नाम जया **श**त्रुजित् सदाधारा[14], ।
यत्कीर्तिसुकृति[15] सेव्या, अमृतरसाची जसी सदा धारा. ॥ ३
त्याचा पुत्र **ऋ**तुध्वज वरगुण[16], जैसा जयंत **श**क्राचा; ।
मदहर[17] गजयूथाचा[18] सिंह, तसा जो स्वशत्रुचक्राचा[19]. ॥ ४
ऋषिनृपकुमार[20] भजति प्रेमें त्या सुगुणकेलिसद्मातें[21], ।

---

१. मोठे उत्सव. २. स्वर्गाचा गर्व. **प्रतीप.** ३. मेघ. ४. भक्तसमूह. ५. दातृत्वाला. ६. अंत. ७. सुख देणारांत श्रेष्ठ जो विष्णु त्याचा वृत्तांत, हरिकथा. ८. कविश्रेष्ठ. ९. सर्व. १०. मंत्रानें भरलेलें. ११. देवश्रेष्ठास. १२. अन्वयः—रामनंदन हे तुलसीच वाहे [व]वदे 'ऐशीच सेवा दे.' १३. साधूंस मान्य. उत्तरार्धाचा अन्वय—ज्याच्या (=चरित्राच्या) गानें (व) पानें (जसें) जन्महित व्हावें तसेंचि (=व्हावयास पाहिजे त्याप्रमाणेंच) होतें. १४. साधूंच्या आधाराला. या अर्धाचा अन्वय—पूर्वी राजा होता, जया सदाधारा शत्रुजित् नाम (होतें). १५. ज्याची कीर्ति व करणी. पाठभेदः—यत्कीर्ति सुकृतिसेव्या. १६. ज्याचे गुण उत्तम आहेत असा. १७. गर्व हरण करणारा. १८. हत्तींच्या समुदायाचा. १९. आपल्या शत्रुमंडळाचा. या गीतींत **उपमालंकार** आहे. २०. ऋषि व राजे यांचे मुलगे. २१. उत्तम गुणांच्या क्रीडेचें स्थान अशास; सद्गुणांचें माहेरघर अशास.

द्विज[1]रूप अश्वतर[2]फणिपतिपुत्रहि, मधुप[3] जेंवि पद्मातें. ॥ ५
एका समयीं ऐसें अश्वतर पुसे, 'कुमार हो! असतां, ।
रात्रौ[4] मात्र स्वगृहीं, दिवसा कोठें सुबुद्धि[5] हो! वसतां?' ॥ ६
ते वदले, 'नृप आहे शत्रुजिदाख्य[6] प्रसिद्ध, अन्यातें[7] ।
जो स्वप्नींहि न साहे, त्याच्या मुलखों गुणाढ्य तनयातें[8]. ॥ ७
सुगुणनिधि[9] तसा तोचि, ज्ञाते बहुतचि तयास मानवती[10], ।
जी साधुता तयाची, वांछिति वर्णूनि देवमानव[11] ती[12].' ॥ ८
अश्वतर म्हणे, 'सुत हो! तो धन्य, यदीय[13] सुगुण हे मागें[14] ।
घेतां, मज सुख देतां; वंदावा साधु पुरुष हेमागें[15]. ॥ ९
सत्कार करा प्रेमें, जो तुमचा साधुतर[16] सखा, याचा; ।
मित्रातें न समर्पुनि, तो स्वर्गीचाहि[17] न रसे[17] खायाचा. ॥ १०
तो मृतचि पुरुष, मित्रीं प्रत्युपकृतितें[18] न जो करी यत्नें, ।
स्वसख्यातें सुखवाया द्या मत्सदनांत[19] असति जीं रत्नें.' ॥ ११
ते दोघेहि कुमार प्रांजलि[20] वदती असें, 'अहो ! तात ! ।
साधु गुणज्ञ[21] गुरु[21] जसे, न स्वस्तरुही[22] प्रसन्न होतात. ॥ १२
रत्नें ऋतुध्वजगृहीं; त्या द्याया योग्य नव नसे कांहीं; ।
शशिकांता[23] बालनगा[24] अन्यांहीं तृप्ति न वनसेकांहीं[25]. ॥ १३

---

१. ब्राह्मणरूपधारी. २. अश्वतर नांवाच्या सर्पराजाचे पुत्र. ३. भ्रमर. ४. रात्रीं मात्र. हें 'रात्रि' शब्दाचें संस्कृतांतील सप्तमीचें रूप आहे. ५. चांगली बुद्धि ज्यांस आहे असे. ६. शत्रुजित् नांवाचा. ७. अन्यायास. ८. गुणी पुत्रास. ९. चांगल्या गुणांचा सांठा. 'त्याच्यासारखा गुणनिधि तोचि' असें वर्णन असल्यामुळें **अनन्वयालंकार** आहे. १०. मान देतात. या अर्धांत 'त'ची आवृत्ति झाल्यामुळें **अनुप्रासालंकार** आहे. ११. देव आणि मनुष्य. १२. साधुता. या अर्धांत 'व'ची आवृत्ति असल्यामुळें **अनुप्रासालंकार** आहे. १३. ज्याचे. १४. [त्याच्या=अश्वतरसुताच्या] पाठीमागें, [तो] हजर नसतांही. १५. मेरुपर्वतानें. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. चतुर्थचरण **सुभाषित**रूप असून त्यांत **व्यतिरेकालंकार** आहे. १६. फार चांगला. १७. अमृत. यांत **संबंधातिशयोक्ति** आहे. हें अर्ध **सुभाषित** आहे. १८. उपकाराच्या फेडीतें. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. १९. माझ्या गृहांत. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. २०. हात जोडून. २१. गुण जाणणारे गुरु किंवा वडील. २२. कल्पवृक्ष. या अर्धांत **व्यतिरेकालंकार** आहे. हें अर्ध **सुभाषित** आहे. २३. चंद्रकांताच्या. चंद्रकांत चंद्रकिरण सेवून स्वतःच पाझरतो. २४. लहान पर्वतास. २५. जलसिंचनांनीं. या गीतीच्या पूर्वार्धाचा अन्वय—ऋतुध्वजगृहीं (सर्व) रत्नें (असतीं), त्या द्याया योग्य नव (रत्न) कांहीं नसे. या गीतींत **दृष्टांतालंकार** आहे.

वा[1] दिव्य [2]वाहनासनयानांबरभूषणादि जें कांहीं ।
त्याचें, [3]अस्मत्सदनीं या पाताळांत [4]वस्तु तें नाहीं. ॥ १४
कर्तव्य एक आहे, स्मरतां खिन्न क्षणक्षणीं करितें, ।
**विधिहरिहर** [5]दत्त वरावांचूनि [6]असाध्य सर्वथा परि तें.' ॥ १५
तात म्हणे, 'इच्छितसें ऐकाया मी तथापि तें कार्य; ।
म्हणति, 'असाध्य न कांहीं, [7]कृतनिश्चय जो, तया,' असें आर्य.' ॥ १६
पुत्र म्हणति, 'परिसें, जें निजवृत्त पित्या! **ऋ**तुध्वजें कथित, ।
कथितों, ज्याच्या श्रवणें सर्वांचें हृदय होतसे [9]व्यथित. ॥ १७
ज्या [10]शुद्धतपोनिधितें सानंद सदा [11]**सु**रेशपुर गातें, ।
[12]**गा**लव **श**त्रुजितातें भेटे, आणूनि दिव्य [13]तुरंगातें. ॥ १८
पूजेतें स्वीकारुनि **गा**लव बोले असें, "अगा! राया! ।
आलों तुज कळवाया दुःसह [14]निजताप मी [15]अगारा या. ॥ १९
कोणी दैत्य करितसे नित्य [16]उपद्रव [17]मदाश्रमीं बापा! ।
तापा साहों, न शकें द्याया [18]सुतपःक्षयावहा शापा. ॥ २०
[19]आश्रमपदास माझ्या [20]तापद तो, मोह जेविं विश्वास; ।
म्यां सोडिला, विलोकुनि [21]अंबर, होऊनि खिन्न, निश्वास. ॥ २१
तों [22]दिव्याश्व उतरला [23]व्योमांतुनि, जाहली [24]गगनवाणी, ।
'हा **श**त्रुजितातें दे, तुझिया सुयशा सुखा मग न [25]वाणी. ॥ २२

---

१. किंबहुना, किंवा. २. वाहन+आसन+यान+अंबर+भूषण+आदि=गाड्याघोडीं+मंचकादि बैठकीचीं साधनें+शिबिका, पालखी वगैरे प्रवासाचीं साधनें+वस्त्रें+अलंकार+वगैरे. ३. आमच्या घरीं. ४. हा शब्द संस्कृत भाषेप्रमाणें नपुंसक योजिला आहे. ५. ब्रह्मदेव, विष्णु व शंकर यांनीं दिलेल्या वराशिवाय. ६. अप्राप्त, दुर्लभ, दुर्मिळ. ७. ज्यानें निश्चय केला आहे असा. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. हें अर्ध **सुभाषित** आहे. ८. आपला (=ऋतुध्वजाचा) वृत्तांत. ९. पीडित. १०. शुद्ध तपाच्या सांठ्याला, निर्मळ तपस्व्याला. ११. अमरावती. १२. ऋषिविशेष. १३. तेजस्वी घोड्यास. पूर्वार्धांत **व्यतिरेकालंकार**. १४. आपलें दुःख. १५. या (तुझ्या) गृहास. १६. पीडा. १७. माझ्या आश्रमांत. १८. चांगल्या तपाचा नाश करणाऱ्या शापाला. या अर्धाचा अन्वय–[मी] तापा साहों न शकें (व) सुतपःक्षयावहा शापा द्याया (न शकें). १९. आश्रमस्थानास. २०. पीडा देणारा. २१. आकाश. या अर्धाचा अन्वय–म्यां खिन्न होऊनि, अंबर विलोकुनि (आकाशाकडे करुणापूर्ण दृष्टि फेंकून), [निराशेनें] निश्वास सोडिला. २२. तेजस्वी घोडा. २३. आकाशांतून. २४. आकाशवाणी. २५. तोटा.

[1]पृथ्वीवलयाक्रमणीं अश्व अतिसमर्थ, म्हणुनि हा नांवें ।
'[2]कुवलय' विख्यात यशें होइल, [4]विश्वेंहि यास वानावें. ॥ २३
यावरि बसुनि, ऋतुध्वज होयिल [3]हरिसाचि मान्य विश्वास. ।
[5]कवि 'कुवलयाश्व' म्हणतिल, तूं [6]उष्ण न सोडिसील [6]निश्वास. ॥ २४
[7]अप्रतिहतगति [8]वाजी [9]पर्वतपाताळगगनजळधींत, ।
हा '[10]रविदत्त [11]मद उरीं देयिल न [12]निशाचरादिखळधींत.' ॥ २५
आज्ञा आतांचि करीं, [13]सनया तनया [14]स्वधर्मदक्षा या, ।
चढुनि कुवलयीं तेजें [15]निजविप्रादिप्रजांसि रक्षाया." ॥ २६
राजा म्हणे, 'अवश्य;' [16]स्वसुतासि बसावयासि दे वाजी; ।
सेवा [17]जीविहिता तो [18]वरि, रुचली फार वासुदेवा जी. ॥ २७
'जा, जोडीं यश;' ऐसें नृप तनया, [19]फुल्ल करुनि गाल, वदे.' ।
गाधिज जेविं दशरथा, आशी [20]राजा तसाचि गालव दे. ॥ २८
राजकुमारा पावुनि, न म्हणे गाधिजतसाचि गालव '[21]हाँ'; ।
व्यास मुनि म्हणे, '[22]भवभयशमना सत्कीर्तिचाचि गा [23]लव हा.' ॥ २९

---

## अध्याय दुसरा.

तो कुवलयाश्व जावुनि गालवमुनिसह तदाश्रमीं राहे, ।
तों [24]सूकररूप असुर मुनिचें [25]धर्षण करावया पाहे. ॥ १
तों गालवशिष्यांहीं त्या पाहुनि फार गलबला केला; ।

---

१. पृथ्वीमंडळाची फेरी करण्यांत. २. कु+वलय=पृथ्वीचें कडें. हें घोड्याचें नांव. ३. इंद्रासारखा. ४. जगास. ५. सुज्ञ. ६. दुःखाचा सुस्कारा. अन्वयार्थः—कवि [या तुझ्या ऋतुध्वजास] 'कवलयाश्व' (=कुवलय आहे अश्व ज्याचा असा) म्हणतील; [व] तूं [दुःखानें] उष्ण निश्वास (उसासे, सुस्कारे) न सोडिसील. ७. ज्याची गति अकुंठित असा. ८. घोडा. ९. पर्वत, पाताळ, आकाश आणि समुद्र यांत. १०. सूर्यानें दिलेला [घोडा]. ११. गर्व. १२. राक्षसादिक दुष्टांच्या बुद्धींत. १३. नीतिवानास. १४. आपल्या धर्मांत निपुण अशास. १५. आपल्या ब्राह्मण इत्यादि प्रजांस. १६. आपल्या मुलास. १७. प्राण्यांस हितकारक. १८. वरिता झाला. १९. गाल फुल्ल करुनि=आनंदानें गाल फुगवून. ही **लोकोक्ति**. २०. राजाला, शत्रुजिताला. यज्ञरक्षणासाठीं दशरथानें रामाला विश्वामित्राच्या स्वाधीन केलें, तेव्हां त्या ऋषीनें जसा दशरथाला आशीर्वाद दिला, तसाच ऋतुध्वजाला पाठविल्याबद्दल शत्रुजिताला गालवानें दिला. २१. हाय. २२. संसारभीतीचा नाश करण्यासाठीं. २३. अंश. २४. डुकररूप. २५. उपमर्द, दांडगाई, दंडेली.

तन्मतिस[1] खररवें[2] दे भय, जेविं श्येनगल[3] बलाकेला[4]. ॥ २
अश्वीं चढोनि धांवे नृपसुत होवूनि तप्त कोपानें, ।
त्या सूकरासि ताडी चंद्रार्धाकार तीव्रें रोपानें[5]. ॥ ३
आत्मत्राणार्थ[6] करी आश्रय तो मूढ दैत्य अटवीतें[7], ।
फटवीतें[8] विधिबळ[9] ज्या, रक्षिल कसि पूजिलीहि **सटवी** तें? ॥ ४
लंघुनि महावनाचळ[10] पळतां, गांठावया खळा किटिला[11], ।
दिव्याश्व तयामागें राजकुमारें धनुर्धरें पिटिला. ॥ ५
निबिडांधकारगर्तीं[12] सूकर घाली उडी, तयामागें ।
रागें तो कुवलयही, पक्षीश्वर[13] वंचिला जसा नागें[14]. ॥ ६
नृपसुत मागें लागे, जेंवि वधाया महाहितें[15] विवरें, ।
तत्तेजासि[16] न परि, जरि भंगदें[17] रविच्या महाहि[18] तें विवरें[19]. ॥ ७
गेला पाताळीं, कीं त्याचें द्वारचितसें महाबिळ तें[20], ।
पाहे प्रकाशवर पुर; सर्वत्र श्रेयें[21] साधुला मिळतें. ॥ ८
करुनि प्रवेश, पाहे नृपसुत अतिरम्य शून्य[22] परि पुर तें, ।
स्त्रीतें विलोकुनि पुसे, उत्तर ईक्षणें[23]हि ती न करि पुरतें. ॥ ९
ती स्त्री प्रवेशली ज्या प्रासादीं[24] सत्वरा, तयामाजी ।
निःशंक कुमार शिरे, द्वारीं स्थापूनि तो महावाजी. ॥ १०

---

१. त्यांच्या (शिष्यांच्या) बुद्धीस. २. तीव्र ध्वनीनें, भयंकर स्वरानें. ३. ससाण्याचा गळा. ४. बगळीला. ससाण्याचा भयंकर शब्द जसा बगळीचा थरकांप करितो, तसा त्या राक्षसाच्या आरोळीनें गालवशिष्यांच्या मतीचा थरकांप केला, हा उत्तरार्धाचा इत्यर्थ. पूर्वार्ध आणि उत्तरार्ध यांत कार्यकारणभाव असून, कारणदर्शक शब्द नसल्यामुळें या गीतींत **काव्यलिंगालंकार** आहे. ५. अर्धचंद्रासारख्या आकाराच्या तीक्ष्ण बाणानें. ६. आपल्या रक्षणाकरितां. ७. अरण्यातें. ८. फसवितें. ९. दैवाचें बळ. या गीतींत **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. १०. मोठीं अरण्यें व पर्वत. ११. डुकराला. १२. दाट अंधारानें भरलेल्या बिळांत. १३. गरुड. १४. सर्पानें. १५. मोठ्या सर्पास. १६. त्याच्या (कुवलयाश्वाच्या) वीर्यास. १७. मोड करणारें. १८. तेजालाहि. १९. बीळ. ह्या अर्धाचा अन्वय—जरि तें विवर रविच्या महाहि भंगद, परि तत्तेजासि [भंगद] न. रवितेजापेक्षां कुवलयाश्वाच्या तेजाचें आधिक्य वर्णिल्यामुळें या अर्धांत **व्यतिरेकालंकार** झाला आहे. २०. या अर्धाचा अन्वय—पाताळीं गेला, कीं त्याचें (=पाताळाचें) द्वारचितसें (दाराप्रमाणेंच) तें महाबिळ [होतें]. २१. कल्याण. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. चतुर्थ चरण **सुभाषित** आहे. २२. निर्जन. २३. पहाणें. या अर्धाचा अन्वय—(कुवलयाश्व) स्त्रीतें विलोकुनि पुसे; (परंतु) ती उत्तर (आणि) पुरतें ईक्षणहि (नुसतें नीट पाहणेंसुद्धां) न करी. २४. राजवाड्यांत.

[१]रत्नकनकपर्यंकीं पाहे तो रतिसमा नवी [२]रमणी; ।
अवलोकिला तिणेंही सहसा हा स्मरसमान वीर[३]रमणी. ॥ ११
पर्यंकावरुनि उठे, त्यातें अवलोकितांचि ती मोहे, ।
[४]जळपवनाद्युपचारें स्वस्था तीची सखी म्हणे, 'हो [५]हे.' ॥ १२
होय [६]मुहूर्तें सावध, मधुर पुसे सर्व वृत्त तो तीस, ।
'तूं कोणाची? कां या शून्यपुरीं [७]क्लेशपात्र होतीस?' ॥ १३
वृत्त प्रेमें पुसतां [८]सुदती स्वसखीमुखाकडे पाहे, ।
[९]ती बोले, '[१०]पुरुषवरा! वृत्त [११]क्लेशद इचें असें आहे. ॥ १४
गंधर्वांचा राजा, [१२]विश्वावसु, [१३]जिष्णुचा सखा आहे, ।
त्याची [१४]मदालसाख्या कन्या धन्या, बहु प्रिया, बा! हे. ॥ १५
जो [१५]वज्रकेतुदानव, तत्सुत पाताळकेतु या नावें, ।
या पाताळीं वसतो, [१६]कलिकाळें ज्यासि मित्र मानावें. ॥ १६
[१७]उद्यानगता हे त्या दुष्टें, हरिणी [१८]वृकें, तसी धरिली; ।
मत्प्रियसखी [१९]मदांधें, प्रकटुनि [२०]मांया [२१]तमोमयी, हरिली. ॥ १७
येत्या [२२]त्रयोदशीचा निश्चय केला इला वरायाचा, ।
'शूद्र [२३]श्रुतिस, मज तसा [२४]हा' म्हणुनि इणेंहि बा! मरायाचा. ॥ १८
भेटोनि सुरभि वदली, 'वत्से! धरि तूं [२५]मदुक्तिचें स्मरण, ।
हा [२६]दानवाधम तुला पावेल न, वांछितीस कां मरण? ॥ १९
या [२७]नरलोकगतातें भेदील शरेंकरूनि जो [२८]मर्मीं, ।
तो सत्वर तव भर्ता होवुनि, घालील तुज [२९]महाशर्मीं.' ॥ २०
मी या [३०]मंदिराक्षीची [३१]आली, मत्तात विंध्यवान् जाण, ।

---

१. रत्नें व सुवर्ण यांच्या बनविलेल्या पलंगावर. २. सुंदर स्त्री. ३. वीरश्रेष्ठ. पूर्वार्धांत व उत्तरार्धांत **उपमा** आहे. ४. पाणी व वारा इत्यादि उपचारानें. ५. होवो. ६. दोन घटकांनीं. ७. दुःखाचें स्थान. ८. सुंदरी. ९. सखी. १०. पुरुषश्रेष्ठा. ११. दुःखद. १२. नामविशेष गंधर्वांचा राजा. १३. इंद्राचा. १४. मदालसा नांवाची. १५. वज्रकेतु नांवाचा दैत्य. १६. कलि व काळ यांनीं. चतुर्थ चरणाचा भावार्थ—कलि व काळ यांसारखा तो भयंकर होता. येथें **निदर्शना** आहे. १७. बागेंत गेलेली. १८. लांडग्यानें. १९. गर्वानें अंधळा झालेल्यानें. २०. कपट. २१. मूर्च्छा जींत आहे अशी. २२. ही अधिकरणार्थीं षष्ठी आहे. २३. वेदास. २४. पाताळकेतु. अन्वयः—जसा शूद्र श्रुतिस [अयोग्य], तसा हा मज; म्हणुनि इणेंहि (हिनें सुद्धां) मरायाचा [निश्चय केला]. या गीतींत **तुल्ययोगिता** आहे. २५. माझ्या भाषणाचें. २६. नीच राक्षस. २७. मनुष्यलोकीं गेलेल्या या पाताळकेतूस. २८. हृदयीं. २९. मोठ्या सुखांत. ३०. सुंदरीची. ३१. मैत्रीण.

मत्पति **पु**ष्करमाली, शुंभें[1] केला रणीं गतप्राण[2]. ॥ २१
गत्यर्थ[3] तीर्थयात्रा करितां, फिरतां मनुष्यलोकांत, ।
कळलें, हे ज्या दुष्टें केली मग्ना हरूनि शोकांत, ॥ २२
**पा**ताळकेतु दानव मानवलोकीं वराहतनुधारी[4], ।
मुनिरक्षणार्थ कोणीं केला खरबाणविद्ध[5] अविचारी.' ॥ २३
तच्छोध करुनि सत्वर आलें तें वृत्त ईस कळवाया, ।
पळवाया चिंततें, दुर्जनवदनें[6] समस्त मळवाया. ॥ २४
पुससि इच्या मूर्च्छेचें कारण जें, तेंहि सांगतें, परिस; ।
परि सत्य गमो ईस त्वद्दर्शन[7] बहु, न अमृत यापरिस. ॥ २५
हे प्रीतिमती[8] झाली, दर्शन होतांचि, या तुझ्या रूपीं; ।
कीं **मा**नसींच[9] हंसी रमती, न रमे कदापि ती कूपीं[10]. ॥ २६
जेणें दानव वधिला, त्याची व्हावी **म**दालसा भार्या; ।
कार्याकार्य न जाणे, यास्तव मूर्च्छेसि पावली आर्या! ॥ २७
आलें, आमरण इणें भोगावें दुःख, हें ईच्या[11] भोगा[12], ।
कीं चित्त तुझ्या ठायीं, भर्ता[13] तो अन्य गा! महाभागा! ॥ २८
**सु**रभीचें वचन मृषा[14] होऊंचि नये कधीं असें आहे, ।
बों[15]! हे रूपा भुलली, चित्तीं चिंता सुदुःसहा वाहे. ॥ २९
ईच्या प्रीतिस्तव मी आलें धांवोनि, पावलें खेद, ।
कीं आपल्या[16] सखीच्या देहांत स्वल्पही नसे भेद. ॥ ३०
जरि हे अभिमतें पतितें[17] शुभदैवेंकरुनि[18] पावती धीरा! ।
वीरा! तरि मी करित्यें तप, पावाया भवाब्धिच्या[19] तीरा. ॥ ३१
निजवृत्ति[20] सांग सुमते[21]! येथें आलासि कोणत्या कार्या? ।
तूं कोण? देव किंवा दानव, गंधर्व, नाग कीं, आर्या! ॥ ३२

---

१. दैत्यविशेष त्यानें. २. प्राणरहित. ३. मुक्तीसाठीं. ही व पुढील गीती ह्यांचें युग्मक आहे. ४. डुकराचें शरीर धारण करणारा. ५. तीक्ष्ण बाणांनीं जखमी केलेला. ६. दुष्टांचीं तोंडें. ७. तुझी नजरानजर, तुझी भेट. या अर्थांत **व्यतिरेकालंकार** आहे. ८. प्रीतीनें युक्त. ९. मानस सरोवरांत. १०. विहिरींत. पूर्वार्ध व उत्तरार्ध यांतील वाक्यें स्वतंत्र असून प्रीतिमती होणें व रमणें ह्या दोन्ही क्रियांचा अर्थ एकच आहे म्हणून हा **प्रतिवस्तूपमालंकार** होय. ११. मदालसेच्या. १२. दैवास. १३. पति. १४. खोटें. १५. पाठभेदः—मा. १६. माझ्या (कुंडलेच्या). १७. आवडत्या पतीस. १८. चांगल्या दैवानें. १९. संसारसमुद्राच्या. २०. आपला धंदा, आपली राहटी. २१. हे सुबुद्धि.

मानुषगति[1] पाताळीं नाहीं, रूपहि असें मनुष्याचें, ।
मदनचि[2] गमसी, धारण जरि पुष्पाच्या नसे धनुष्याचें. ॥ ३३
म्यां कथिलें तत्व[3] जसें साधो! तूंही यथार्थ सांग मला, ।
पाताळीं शून्य पुरीं चतुरा! कार्य[4] प्रवेश कां गमला?" ॥ ३४
तो तीस म्हणे, "अमळप्रज्ञे[5]! करुनि स्थिर स्वचित्तातें, ।
श्रवण करीं, पाठविलों मी मुन्यवनार्थ[6] शत्रुजित्तातें[7]. ॥ ३५
मुनिरक्षणार्थ कवची[8], कोदंडी[9] गालवाश्रमीं होतों, ।
जों त्यासि म्हणें, 'बापा! तूं न मनीं गालवा! श्रमी[10] हो'; तों ॥ ३६
आला सहसा दैत्य स्वीकारुनि उग्र[11] रूप कोलाचें[12], ।
म्यां हृदय भेदिलें निज बाणें त्या तापसार्तिलोलाचें[13]. ॥ ३७
होतां विद्ध[14] पळाला[15], त्यामागें धांवलों हयारूढ[16], ।
शिरला गर्ती प्राणत्राणार्थी[17] विप्रशत्रु तो मूढ. ॥ ३८
माझा वाजीश्वरही[18] शिरला गर्तीं तया खळामागें, ।
ज्यातें न मन म्हणे 'श्रम झाला बहु, धांवतां जळा मागें[19].' ॥ ३९
भ्रमलों तमांत[20] बहु मी, मग झालों पाहता प्रकाशातें, ।
तुज पाहुनि पुसिलें, परि न वदुनि आलिस ईच्या[21] सकाशातें. ॥ ४०
तुज अनुलक्षुनि आलों या प्रासादांत कुंडले[22]! सुमते! ।
मी सत्य मनुष्य मधुप[23], देवासुरपन्नगादि[24] जे, सुम[25] ते." ॥ ४१
श्रवण असें होतां, ती हर्षे, लाजे मदालसा कन्या, ।
वदनीं सुस्मित वाहे, पाहे स्वसखीमुखाकडे धन्या. ॥ ४२

---

१. मनुष्याचा प्रवेश. २. या अर्धांत **व्यतिरेकालंकार** आहे. ३. खरें, वास्तविक. ४. करण्यास योग्य. ५. हे शुद्धबुद्धि. ६. ऋषींच्या रक्षणाकरितां. ७. शत्रुजित् पित्यानें. प्रथम व द्वितीय पुरुष वाचक सर्वनामें कर्में असून गद्य भाषेंत कर्मणिप्रयोग होत नाहीं, ते कवितेंतमात्र आढळतात. ८. चिलखत घातलेला. ९. धनुष्य धारण केलेला. १०. दुःखी. गीती ३६ व ३७ यांचें युग्मक आहे. ११. भयंकर. १२.डुकराचें. १३.तपस्व्यांस पीडा देण्याची चट ज्याला आहे अशाचें. १४. क्षतयुक्त. १५. पाठभेदः—पळाया. १६. घोड्यावर बसलेला. १७. प्राणरक्षणाची इच्छा करणारा. १८. उत्तम घोडा. १९. माग. त्या अर्धांचा अन्वय—'धावतां बहु श्रम झाला, जळा मागें,' असें ज्यातें (कुवलयातें)मन न म्हणे. ज्या कुवलयाला कधींही श्रम होत नाहींत व तहानही लागत नाहीं; हा इत्यर्थ. २०. अंधारांत. २१. हिच्याजवळ. २२. नामविशेष स्त्री, मदालसेची सखी. २३. भ्रमर. २४. देव, राक्षस व सर्प इत्यादि. २५. पुष्प. या अर्धांत **रूपकालंकार.** या अर्धांचा अन्वय—मी मनुष्य सत्य मधुप, जे देवासुरपन्नगादि ते सुम (होत).

ती कुंडला म्हणे, 'तूं वीरा! वदलासि सत्य, मन ईचें ।
तरिच तुतें अनुसरलें; वरुनि [1]सरा, [2]वन वसेल न [3]नईचें. ॥ ४३
चंद्रातें पावुनियां [4]तपनद्युति पावती अधिक [5]कान्ती; ।
[6]क्षान्ति श्रेष्ठा, धन्या [7]भूति मिळे, [8]धृति भेटा, कविस शान्ती. ॥ ४४
त्वांचि [10]अधम तो वधिला, कां मिथ्या कामधेनु बोलेल? ।
[11]कन्याकरग्रह करीं, हर्षें गंधर्वराज डोलेल.' ॥ ४५
राजकुमार म्हणे, 'सति! मी आहें [12]नाथवान्, कसें स्वमतें ।
हें कन्यारत्न वरूं? [13]गुरुलंघन यांत मन्मना गमतें.' ॥ ४६
आलि म्हणे, 'न वद असें, होसिल न, इतें वरूनि, अपराधी; ।
देवी हे दुष्प्रापा, म्हणुनि करावी कदापि न [14]परा [15]धी.' ॥ ४७
नृपसुत म्हणे, 'बहु बरें, देवीवचनहि अलंघ्य, सांगाल ।
[16]विहितचि, तें कर्म करिल न [17]गुरुजनाचे प्रफुल्ल कां गाल?' ॥ ४८
या कुवलयाश्ववचनें हर्षें बहु [18]सालि कुंडला भरली, ।
गंधर्वेश्वरकुलगुरु [19]तुंबरुतें तेधवां मनीं स्मरली. ॥ ४९
स्मरतांचि कळे, आणी पाताळीं [20]वत्सलत्व तुंबरुतें; ।
धेनुहि धांवे, न म्हणे, 'करुनि विलंब, [21]स्वतोक [22]ढुंबरे तें.' ॥ ५०
तो तुंबरु संपादी दोघांच्या सुविधिनें विवाहातें, ।

---

१. सरोवरास. २. जल. ३. नदीचें. या गीतीचा अन्वय—ती कुंडला म्हणे, वीरा, तूं सत्य वदसि, तरीच ईचें मन तूतें अनुसरलें, नईचें वन सरा वरुनि न वसेल, [तर तें समुद्राकडेच वाहणार]. चतुर्थ चरण **सुभाषित** आहे. या गीतींत **दृष्टांतालंकार** आहे. ४. सूर्यतेज. ५. सौंदर्य, मनोरमता. चंद्र सूर्याच्या तेजानें प्रकाशतो, हा सिद्धान्त पंतांस माहीत होता. ६. सहनशीलता, तितिक्षा. ७. भरभराट. ८. धैर्य. ९. वीरास. या गीतींत **परिसंख्यालंकार** आहे. १०. नीच. ११. कन्येचें पाणिग्रहण. पाणिग्रहण करणें=विवाह करणें. १२. परतंत्र. १३. वडिलांची अवज्ञा. १४. विपरीत. १५. बुद्धि. १६. योग्य. १७. वडिलांचे, गुरूंचे. या गीतीचा अन्वय—नृपसुत म्हणे, बहु बरें, देवीवचनहि अलंघ्य, (तुम्ही) विहित तेंचि सांगाल; तें (विहित) कर्म गुरुजनाचे गाल [आनंदानें] प्रफुल्ल कां न करिल? १८. सखीसह. १९. गंधर्वराजाचा कुलगुरु जो तुंबरु त्यातें. २०. दयाळुपण. अन्वय—(कुंडला तुंबरुतें) स्मरतांचि, (तें स्मरण) तुंबरुतें कळे (व) वत्सलत्व त्यास पाताळीं आणी. २१. आपलें वासरूं. २२. ढंबरडा फोडो. या गीतींत **प्रतिवस्तूपमा** आहे.

वंदूनि [1]आखुवाहा, [2]हंसवृषभवाहसह [3]विवाहातें. ॥ ५१
तुंबरु गेल्यावरि ती स्वसखीतें कुंडला म्हणे, 'आले ! ।
[4]त्वद्धृदयीं, सद्गुण जे, ते सर्व सुखें वसावया आले. ॥ ५२
तुज न लगे शिकवावें, स्नेहें देतें परंतु आठउनी, ।
[5]पतिभजनीं सुख पावो तव मति, [6]शीतांत जेविं पाठ [7]उनीं. ॥ ५३
पति परमेश्वर याच्या भजनीं अनुकूलबुद्धि हो भावें, ।
लोभावें न [8]तनुसुखीं, त्वां संपादूनि कीर्ति शोभावें.' ॥ ५४
त्या नृपपुत्राहि म्हणे, 'तुज सर्वज्ञासि काय शिकवावें ? ।
स्नेहें [9]वंदतें, स्त्रीसह [10]पुरुषार्थत्रय [11]जपोनि पिकवावें. ॥ ५५
स्त्रीयोगें पुरुषाचे साधति धर्मार्थकाम, सत्या [12]गी ।
हे श्रुतिची सात्विक घे, राजस कीं ईस तामस त्यागी. ॥ ५६
दोघें चिरकाळ तुह्मी सतत सुखें [13]पुत्रपौत्रसह नांदा, ।
तुमच्या यशासि सज्जन सेवूत, [14]चकोर ते जसे चांदा. ॥ ५७
सफळ मनोरथ झाले, स्वस्थ मनें जातसें तप कराया. ।
[15]हेंचि परम मधुर मना माझ्या, अमृतहि गमे [16]सपक राया!' ॥ ५८
स्वसखीतें आलिंगुनि, तत्पतितें नमुनि, कुंडला गेली !
हेलि[17]स्यंदनतुरगीं घेउनि हृष्ट प्रियें प्रिया केली. ॥ ५९
निघतांचि पुराबाहिर, ये दुर्मति [18]तालकेतु [19]सहसेन; ।
गर्जुनि म्हणे, 'वधुनि तुज कां मी, होऊनि [20]मुदित, न हसेन?' ॥ ६०

---

१. उंदीर आहे वाहन ज्याचें त्यास, गणपतीस. २. हंसवाहन ब्रह्मदेव व नंदिवाहन शिव यांसह. ३. गरुड आहे वाहन ज्याचें त्यास, विष्णूस. या गीतीचा अन्वय—तो तुंबरु आखुवाहा (व) हंसवृषभवाहसह विवाहातें वंदूनि, दोघांच्या विवाहातें सुविधिनें संपादी. ४. तुझ्या अंतःकरणांत. यांत **चेतनगुणोक्तिनामक** अलंकार आहे. या अर्धाचा अन्वय—जे सद्गुण, ते सर्व त्वद्धृदयीं सुखें वसावया आले. ५. पतीच्या सेवेंत. ६. हिंवाळ्यांत. ७. उन्हांत. हें अर्ध व पुढील ५४ वी गीति **सुभाषित** आहे. ८. शरीराच्या सुखांत, इंद्रियसुखांत, विषयविलासांत. ९. पाठभेदः—वदलें. १०. धर्म, अर्थ, काम. ११. काळजीनें. १२. वाणी. ही श्रुतीची सत्या गी सात्विक [नर] घे=सत्त्वशील (सदाचारी) मनुष्य या खऱ्या श्रुतिवचनाचा आदरानें स्वीकार करितो. **सुभाषित.** १३. मुलगे व नातू यांसह. १४. पक्षिविशेष. या पक्ष्यांचा आहार चंद्रकिरणांवर चालतो, असा कविसंकेत आहे. १५. पाठभेदः—हे. १६. बेचव, स्वादरहित. यांत **व्यतिरेकालंकार** आहे. 'म'ची आवृत्ति असल्यामुळें **अनुप्रास.** १७. सूर्याच्या रथाच्या घोड्यावर. सूर्यस्यंदनतुरगीं—असाही पाठ आहे. १८. राक्षसविशेष. १९. सैन्यासह. २०. आनंदित.

त्या वीरवरें[2] त्वाष्ट्रें[1] भंगुनि पाताळकेतुच्या अनुजा, ।
विजयश्रीसह नेली गंधर्वक्षोणिजातिची[3] तनुजा. ॥ ६१
समरीं मुहूर्तमात्रें[4] दैत्यचमूच्या[5] करूनि घातातें[6], ।
सस्त्रीक[7] नमुनि, कळवी वीर कुवलयाश्ववृत्त[8] तातातें. ॥ ६२
सुतविजयें भूपाच्या आनंदा त्रिभुवनीं[9] नसे जोडा, ।
थोडा स्वप्राण प्रिय वाटे त्या, त्यावरीलें[10] तो घोडा. ॥ ६३
ताताज्ञेनें बैसुनि दिव्याश्वीं, सर्वदाहि साधु[11] निघे, ।
पूर्वाण्हींच[12] महिवलय[13] मत विश्वासी तदिष्ट[14] साधुनि घे. ॥ ६४
क्षितिपर्यटन[15] करुनि, तो स्वजनीं करि अमृतवर्ष[16] वीरमणी[17], ।
क्रीडुनि रम्योपवनीं[18], मणिभवनीं[19] बहुत हर्षवी रमणी. ॥ ६५
यापरि वर्तत असतां, रम्याश्रम रविसुतातटीं[20] पाहे, ।
ज्यांत महामुनिरूपें मायावी ताळकेतु तो आहे. ॥ ६६
त्यासि न जाणुनि, भेटे शत्रुजिदात्मज[21]; तयासि तो खोटा ।
मोटा गोड कठिण वरि आंत, गुळें घोळिला जसा गोटा[22]. ॥ ६७
राजसुतासि खळ म्हणे, 'तुज कांहीं प्रार्थना असे, परिसें[23], ।

---

१. त्वष्ट्यानें केलेल्या हत्यारानें, चक्रानें किंवा त्रिशूलानें. त्वष्ट्याला संज्ञा नांवाची मुलगी होती व ती सूर्याला दिली होती. तिला सूर्याचें तेज सहन होईना-तेव्हां त्वष्ट्यानें सूर्याला चरकीवर धरून, त्याच्या तेजोमंडळाचा कांहीं भाग किसून काढिला. तेणेंकरून सूर्याचें तेज उणें होऊन, तें संज्ञेला सह्य झालें. सूर्याच्या किसलेल्या अंशाचीं विष्णूचें चक्र, शिवाचा त्रिशूल इत्यादि हत्यारें बनविण्यांत आलीं, अशी कथा आहे. २. या अर्धांत **सहोक्तिनामक** अलंकार आहे. ३.गंधर्वभूमींत जन्म पावलेली, गंधर्वकुळाची. ४.दोन घटकांनींच. ५.राक्षससैन्याच्या. ६.नाशास. ७. स्त्रीसह. ८. वृत्तांत. ९. त्रैलोक्यांत. यांत **असमालंकार**. १०. त्याहून अधिक. प्राणाहून घोड्याचें आधिक्य वर्णिल्यामुळें **व्यतिरेकालंकार**. ११. सज्जन कुवलयाश्व. १२. मध्यान्हापूर्वींच. १३. कुवलय घोडा. १४. त्याची (कुवलयाश्वाची) इच्छा. या गीतीचा अन्वय–[तो] साधु [कुवलयाश्व] सर्वदाहि ताताज्ञेनें दिव्याश्वीं बैसुनि निघे, [व] विश्वासी मत महिवलय तदिष्ट पूर्वाण्हींच साधुनि घे. १५. पृथ्वीवर फिरणें. १६. अमृताचा वर्षाव. १७. वीरश्रेष्ठ. १८. सुंदर बागेंत. १९. रत्नखचित वाड्यांत. २०. यमुनानदीच्या तीरीं. २१. शत्रुजिताचा मुलगा कुवलयाश्व. २२. पाषाण. या गीतीचा अन्वय–शत्रुजिदात्मज त्यासी न जाणुनि भेटे, तयासि (कुवलयाश्वासी), जसा गुळें घोळिला गोटा, (तसा) तो खोटा वरि मोटा गोड पण आंत कठिण [लागे]. उत्तरार्धांत गोड, कठिण या **श्लिष्ट** शब्दांचा संबंध क्रमानें वरि, आंत या शब्दांशीं लागतो म्हणून **यथासंख्यालंकार** आहे. २३. ऐक.

परि भंग तिचा न करीं; तूं दाता, कल्प[१] जो, तयापरिसें[२]. ॥ ६८
बा! धर्मार्थ[३] करावा यज्ञ, असें जाहलें असे चित्त[४], ।
परि शुचि तपमात्र असे, इतर नसे लेश संग्रहीं वित्त. ॥ ६९
साहित्य दक्षिणेचें नसतां, करिती वृथा कवि न यज्ञ, ।
दे हें कंठविभूषण[५], पितृसम दाता, न तूं अविनयज्ञ[६]. ॥ ७०
बापा! महाप्रतापा[७]! विप्रावनपुण्यकर्मदक्षा[८]! या, ।
उदकीं स्तवूनि **वरुणा** येतों, वस आश्रमासि रक्षाया. ॥ ७१
ग्रीवाभूषण[९] देवुनि, नमुनि, म्हणे **कुवलयाश्व**, 'चापातें, ।
सजुनि करीं[१०] बसतों, जें कर्तव्य, करीं विशंक बापा! तें' ॥ ७२
हर्षें कपटमुनि[११] करी मज्जन[१२] **यमुनेंत**, **शत्रुजिन्नगरीं** ।
जाय, तसा[१३] तो[१३] शोकीं[१३] पडुनि, जसा जीव[१४] होय खिन्न गरीं[१५]. ॥ ७३
भेटुनि **शत्रुजितातें**, गंधर्वेश्वरसुतासमक्ष[१६] 'महा ।
झाला घात' म्हणे, 'यश ज्याचें दुग्धाब्धिच्या[१७] सम क्षम[१८] हा! ॥ ७४
त्वत्पुत्र **कुवलयाश्व** ब्राह्मणमुख्यप्रजावनामूळें[१९], ।
बापा! मायाविवरें[२०] दैत्यें हृदयींच भेदिला शूळें. ॥ ७५
प्राणोत्क्रमणीं[२१] मज हें कंठविभूषण दिलें बळें नमुनी, ।
तैशा समयीं घ्याया दान सदय मी न कां वळेन मुनी? ॥ ७६
त्या शूद्रतापसांनीं[२२] अग्नि दिला, जरि धरूनि दे वाजी, ।
रडला तरि, दैत्यानें नेला बंधन करूनि देवाजी[२३]! ॥ ७७
हें म्यां विलोकिलें बा! कारण दुःसहतरोग्र[२४] तापाचें. ।

---

१. कल्पवृक्ष. २. त्यापेक्षां. उत्तरार्धांत **व्यतिरेकालंकार**. ३. धर्मासाठीं. ४. असें चित्त जाहलें असे=असें माझ्या मनांत आहे, असा माझा मनोरथ आहे. ५. गळ्यांतील अलंकार. ६. उद्धट. ७. मोठ्या पराक्रमी वीरा. ८. ब्राह्मणांचें रक्षण व पुण्यकारक कर्म यांत चतुर. येथील विशेषणें हेतुगर्भ असल्यामुळें **परिकरालंकार** आहे. ९. कंठांतील अलंकार. १०. हातांत. ११. कपटानें झालेला ऋषि. १२. स्नान. १३. तो (कपटमुनि, ताळकेतु) दुःखी होऊन, दुःखाची बतावणी करून. १४. प्राणी. १५. विषांत. १६. मदालसेच्या समोर. १७. क्षीरसमुद्राच्या. १८. समर्थ. ७४।७५ या गीतींचें युग्म आहे. १९. ब्राह्मणादि प्रजाजनांच्या रक्षणाच्या योगें. २०. श्रेष्ठ कपट्यानें. २१. मरणसमयीं. २२. हलक्या तपस्व्यांनीं. २३. राजा! या गीतीचा अन्वय—शूद्रतापसांनीं त्या (कुवलयाश्वास) अग्नि दिला, जरि वाजी धरूनि दे, तरि रडला, देवाजी! मग दैत्यांनीं (तो अश्व) बंधन करूनि नेला. २४. सोसण्यास कठीण अशा भयंकर. हें तापाचें विशेषण.

झालें प्राप्त फळ मजहि माझ्या बळि[1]पूर्वजन्मपापाचें! ॥ ७८
[2]उत्तरकार्य करीं बा! [3]सविवेका क्षम न शोक घेराया; ।
मज निस्पृहा कशाला हें भूषण? तूं विलोक, घे राया!' ॥ ७९
ऐसें बोलोनि, पुढें भूषण ठेवुनि, निघोनि तो जाय. ।
राय [4]क्षोणिवरि पडे, प्रियसुतशोकें म्हणोनियां 'हाय.' ॥ ८०
राज्ञीला शोक जसा ताप, तसा पापिया न [5]रौरव दे. ।
[6]अंत:पुरजनचि न तो, 'हा! हा!' ऐसें [7]अशेष [8]पौर वदे! ॥ ८१
[9]प्रियशोकें प्राणातें तत्काळ सती मदालसा सोडी. ।
भूप म्हणे, '[10]शोच्यं नव्हे हा मत्सुत, [11]सुयश [11]सुगतितें [11]जोडी. ॥ ८२
मुनिरक्षणासि जैसा, तैसा न [12]प्राणरक्षणा जपला; ।
खपला [13]अपलायनकर, बहुधा बहुजन्म साधु हा तपला. ॥ ८३
जैसी मदालसेची कोणाचीही असी [14]प्रसू नाहीं, ।
[15]हे पूजिली सुरांहीं, देवी दुर्गा जसी, [16]प्रसूनांहीं.' ॥ ८४
राज्ञीहि उठोनि म्हणे, '[17]श्रितरक्षक विष्णुचक्र वत्सा! जें, ।
तें तुज धन्य म्हणेल, स्वर्गीं [18]त्रिदशांत शक्रवत् [19]साजें. ॥ ८५
जरि गेलासि न पुसतां, तरि वत्सा! मी करीन कां रुसवा? ।
मरुनि रणीं, त्वां माझा केला बा! धन्य या जगीं [20]कुसवा. ॥ ८६
वत्से! मदालसे! हा तुजसह तव कान्त [21]सुचिर नांदावा. ।
चांदा वाटो प्रियसख, यासीं [22]द्विजपाळ करिल कां दावा?' ॥ ८७
सस्त्रीक नृप विवेकें [23]क्षम जाळायास होय देहातें, ।
[24]दाहोत्तर स्नुषेतें, त्या पुत्रातेंहि तोय दे हातें. ॥ ८८

---

१. पूर्वजन्मींच्या बळकट पापाचें. २. मृताचे श्राद्धादि संस्कार. ३. विचारवंतास. या अर्धांत **अर्थांतरन्यासालंकार.** द्वितीय चरण **सुभाषित** आहे. ४. पृथ्वीवर. ५. नरक. या अर्धांत **व्यतिरेकालंकार.** ६. स्त्रियाच. ७. सर्व. ८. नागरिक. ९. प्रियाच्या (पतीच्या) शोकानें. १०. दुःख करण्यास योग्य. ११. अशा तऱ्हेचें निर्मल यश मोक्षपदाला मिळवितें. 'शोच्य नव्हे' व 'सुयश सुगतितें जोडी' या वाक्यांत कार्यकारणभाव असल्यामुळें **काव्यलिंगालंकार.** १२. **परिसंख्यालंकार.** १३. पळून न जाणारा. 'पला' 'बहु' यांची आवृत्ति असल्यामुळें **यमक.** १४. माता. मदालसेच्या मातेसारखी दुसरी कोणी माता नाहीं, असें वर्णन असल्यामुळें **असमालंकार.** १५. मदालसा. १६. पुष्पांनीं. १७. आश्रितांचें रक्षण करणारें. १८. देवांत. १९. शोभ. २०. कूस. हें भाषण वीरमातेस किती योग्य साजत आहे! २१. दीर्घकाळ. २२. चंद्र (पक्षीं कुवलयाश्वासारखाच ब्राह्मणरक्षक). **श्लेषमूलक परिकर.** २३. समर्थ. २४. जाळल्यावर.

यापरि दुःसहशोकीं बुडवुनि महिपतिस[1], महिस[2], मायावी[3], ।
हर्षे फार; दया कां त्या, करितां घात, अहिंसमा[4] यावी? ॥ ८९
तो यमुनेंतूनि निघे असुर, म्हणे, 'कार्य करुनि मी आलों, ।
झालों कृतकृत्य, तुवां केलें साहित्य, बहु सुखें धालों.' ॥ ९०
ऐसें बहु मधुर वदे, दे आज्ञा त्यासि, नमुनि हरिवरि[5] तो ।
बसुनि पुरा ये, ज्यातें स्वप्नीं पाहोनि, भीति अरि वरितो. ॥ ९१

---

## अध्याय तिसरा.

पाहुनि राजसुतातें, बहु आशी[6], बहु करूनि गौरव, दे; ।
विस्मित होवुनि भेटे, 'भद्रं[7], भद्रं,' समस्त पौर[8] वदे. ॥ १
विस्मित होवुनि, वंदुनि, वृत्त पुसे कुवलयाश्व तातातें. ।
कथिति, गळां पडुनि, रडुनि, जें दारुण[9] वृत्त, तातमाता तें. ॥ २
चित्तीं नृपपुत्र म्हणे, 'मजकरितां त्यागिला स्वकाय जिणें, ।
तीच भली! धिक् कठिना मातें! हें श्लाघ्य होय काय जिणें[10]? ३
काय प्रत्युपकार प्राणत्यागें[11] स्त्रियेस ये युक्त? ।
त्या साध्वीच्या न रिणापासुनि होयिन, मरोनिही, मुक्त. ॥ ४
रिपु हर्षतील रडतां, माझा तत्काळ [12]भंग करितील, ।
हरितील राज्यपद; मग बहु माता, तात, ताप [13]वरितील. ॥ ५
जीवितें[14] ताताधीन[15], त्यागावें म्यां कसें पराधीनें[16]!' ।
यापरि विचार करितां, झाला शोकांतही बरा धीनें[17]. ॥ ६
उत्तरकार्य करी मग, नृपसुत [18]डोळे करूनियां ओले; ।
'म्यां स्त्री मदालसान्या न वरावी' निश्चयें असें बोले. ॥ ७
[19]स्त्रीभोग त्यजुनि, असे शोकाग्नीच्या[20] वहात[21] आहेतें[22], ।

---

१. शत्रुजित् राजास. २. पृथ्वीस. ३. कपटी राक्षस. ४. सर्पासारख्यास. या गीतीचा अन्वय–यापरि महिपतिस (व) महिस दुःसह शोकीं बुडवुनि, मायावी फार हर्षे; घात करितां, अहिंसमा त्या (=ताळकेतु राक्षसास) दया कां यावी? ५. घोड्यावर, कुवलयावर. ६. आशीर्वाद. ७. कल्याण, कल्याण. ८. नागरिक. ९. भयंकर. १०. जगणें. ११. आण सोडल्यानें. १२. मोड. १३. पावतील. यांत तची आवृत्ति असल्यामुळें **अनुप्रास.** १४. जीव. १५. बापाच्या ताब्यांत. १६. परतंत्रानें. १७. बुद्धीनें. उत्तरार्धाचा अर्थः–अशा प्रकारें विवेक करून, त्या शोकांतही त्याचें अन्तःकरण शांत झालें. १८. डोळ्यांत आसवें आणून. १९. स्त्रीसंग. २०. शोकरूप अग्नीच्या. २१. सहन करीत. २२. ज्वालेतें.

बा! कार्य करीसा [1]क्षम कोणाचाही न हात आहे तें. ॥ ८  
तो 'उर्वशीहि' म्हणतो 'न लगे, व्हावी **म**दालसा मातें.' ।  
[2]ओसणतो प्रियसख हो! किति [3]कष्टा [3]या [3]वदाल [3]सामातें. ॥ ९  
व्हावी **म**दालसेची प्राप्ति पुन्हा, हेंचि एक तत्कार्य, ।  
सत्कारावा म्हणसी, तरि होयचि तो [4]सुसाधुसत्कार्य. ॥ १०  
कार्य **कु**वलयाश्वाचें दुर्घट **लो**[5]केश्वरांसही बा! हें, ।  
मग कोण समर्थ जगीं त्यासि म्हणाया '[6]अभीष्ट तूं लाहें?" ॥ ११  
**अ**श्वतर म्हणे, "सुत हो! जरि जन [7]जाणुनि अशक्य कर्मातें, ।  
न करितिल [8]अनुद्योगें, पावतिल न [9]कार्यसिद्धिशर्मातें. ॥ १२  
पुरुषें आरंभावें कर्म, न [10]पौरुष कदापि सोडावें; ।  
कर्मफळ, जसें दैवें, स्पष्ट तसें पौरुषेंहि जोडावें. ॥ १३  
यास्तव यत्न तसा मी करिन, जसें सिद्ध होय हें कार्य; ।  
म्हणती, '[11]सर्वार्थांची सिद्धि असे निश्चयीं,' असें आर्य." ॥ १४  
ऐसें बोलुनि **फ**णिवर जें सुयशस्कर, मनांत आणी तें, ।  
[12]**प्ल**क्षावतरणतीर्थीं [13]**तु**हिननगीं जाय शरण [14]**वा**णीतें. ॥ १५  
दुष्कर तप करुनि, करी **अ**श्वतर श्री**स**रस्वतीस्तवन, ।  
जीचा प्रसाद वृद्धि ज्ञाना दे, [15]पावका जसा [16]पवन. ॥ १६

---

१. समर्थ. या गीतीचा अन्वय—स्त्रीभोग त्यजुनि शोकाग्नीच्या आहेतें वहात (सहन करीत) असे (राहता झाला). बा तें कार्य करीसा क्षम कोणाचाहीं हात न आहे. २. स्वप्नांत किंवा भ्रमिष्टपणांत बरळतो. ३. या कष्टा सामातें किती वदाल?=या भयंकर रोग्याचें किती म्हणून वर्णन कराल? साम=स+आम=रोगी. ४. सज्जनांनीं सत्कार करण्याजोगा. या अर्धाचा अन्वय—[तो] सत्कारावा म्हणसी तरी तो सुसाधुसत्कार्य होयचि. अर्थ:—'त्याचा मोठा संमान करावा' असें म्हण-शील तर त्याचा पूर्वींच सर्व सज्जनांनीं मोठा मान केलेला आहे. ५. लोकपाळांस, इंद्रादिकांस. या गीतींत **काव्यार्थापपत्तिनामक** अलंकार आहे. या गीतीचा अन्वय—बा हें कुवलयाश्वाचें कार्य लोकेश्वरांसही दुर्घट (आहे), मग तूं अभीष्ट लाहें (असें) त्यासि म्हणावया जगीं कोण समर्थ (आहे)? ६. इच्छित. ७. मुद्दाम समजून. ८. आळसानें. ९. कार्यसिद्धीच्या सुखाला. ही गीति **सुभाषित** आहे. १०. पराक्रम. ही गीति **सुभाषित** आहे. ११. सर्व पदार्थांची. हें **सुभाषित** आहे. याचा अन्वय—निश्चयीं सर्वार्थांची सिद्धि असे, असें आर्य म्हणती. अर्थसादृश्य:— 'Patience and Perseverence overcome mountains.' या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. १२. प्लक्षावतरण नांवाच्या तीर्थावर. १३. हिमालयपर्वतावर. १४. सरस्वतीस. १५. अग्नीस. १६. वारा.

'[1]प्रणवादिजगन्मूर्ते ! [2]कारुण्यनिवासमानसे! वाणी ! ।
माते ! तुज नत जो, त्या विधिविष्णुशिवासमा नसे [3]वाणी.' ॥ १७
देवी भेटोनि म्हणे, 'झाले जे भक्त [4]शिष्टवर मागें, ।
अश्वतरा! [5]तदधिक तूं, घे देत्यें सर्व इष्ट, वर [6]मागें.' ॥ १८
अश्वतर म्हणे 'माते! भ्राता कंबळ [7]सहाय दे आधीं, ।
दोघांसि [8]गानविद्या [9]अतुला देऊनि, कीर्तिला साधीं.' ॥ १९
[10]श्रीविष्णुप्रभुजिव्हा वाणी 'दिधलें,' असें मुखें वदली, ।
[11]पदलीना बहु निववी ती [12]चित्कर्पूरपूरिता [13]कदली. ॥ २०
श्रीवाणी वर देवुनि जातां, तत्काळ सुवर तो [14]फळला; ।
गानप्रकार निरुपम अश्वतरा कंबळासही [15]फळला. ॥ २१
मग जावुनि कैलासीं, [16]सांबा, [17]तद्भक्तिचें पदें भ्राते, ।
यश गावुनि, आराधिति, जोडाया तत्कृपा [18]अदभ्रा, ते. ॥ २२
[19]मध्यान्हनिशासंध्यासमयीं [20]सप्रेम नित्य यश गाती. ।
[21]चिरकाळें [22]भक्तांची कल्पलता त्यांसि होय [23]वशगा ती. ॥ २३
कुतुकें [24]सर्वार्थास प्रभु जो [25]वीणार [26]वासवाद्यांस, ।
होय प्रसन्न, सेवुनि त्यांच्या [27]वीणारवास वाद्यांस. ॥ २४

---

१. ओंकार ज्याचें मूळ आहे अशा जगाच्या (वाङ्मयाच्या) मूर्ते, वाङ्मय हेंच जिचें स्वरूप आहे अशा! २. दयेचें स्थान जिचें मानस आहे अशा देवी! अत्यंत दयाळू ! ३. न्यूनता. या अर्धाचा अन्वय–माते, तुज जो नत, त्या विधिविष्णुशिवासमा (=ब्रह्मदेव, विष्णु व शिव यांच्यासारख्यास, देवस्वरूपीस) वाणी नसे. याचा भावार्थ–तुला शरण आलेल्यांचे हेतु पूर्ण होऊन, ते ब्रह्मा, विष्णु व शंकर यांसारखेच पूर्णकाम होतात. या अर्धांत सरस्वतीची भक्तांचे हेतु पूर्ण करण्याची शक्ति ब्रह्मदेव, विष्णु व शिव यांच्या शक्तींपेक्षां अधिक वर्णिल्यामुळें **व्यतिरेकालंकार**. ४. सभ्यांत श्रेष्ठ. ५. त्यांहून (=सभ्यांत जे श्रेष्ठ त्यांहून) श्रेष्ठ. ६. माग. ७. सोबती, मदतगार. ८. गायनाची कळा. ९. निरुपम. १०. जी साक्षात् भगवान् विष्णूचीच जिव्हा होती अशी. ११. पायीं नम्र झालेल्यास. १२. चैतन्यरूप कापरानें भरलेली. १३. केळ. १४. फळास आला. १५. प्राप्त झाला. १६. हें 'आराधती' याचें कर्म. १७. त्याच्या (शंकराच्या) भक्तीचें स्थान असे, अत्यंत भक्तिमान्. १८. विपुल. या गीतीचा अन्वय–मग कैलासीं जावुनि, तद्भक्तिंचे पद ते भ्राते, तत्कृपा अदभ्रा जोडाया, यश गावुनि, सांबा आराधिती. १९. मध्यान्हीं, रात्रीं व संध्याकाळीं. २०. प्रेमानें. २१. फार वेळानें. २२. भक्तांचा कल्पवृक्ष, शिव. २३. अधीन, प्रसन्न. या अर्धाचा अन्वय–ती भक्तांची कल्पलता त्यांसि (=अश्वतर व कंबळ यांस) चिरकाळें वशगा होय. या अर्धांत **रूपकातिशयोक्ति** आहे. २४. सर्व वस्तूंस. २५. उत्पन्न करणारा. २६. इंद्रादिकांस. २७. विण्याच्या सुरास. या गीतीचा अन्वय–जो प्रभु वासवाद्यांस सर्वार्थांस कुतुकें वीणार, (तो) त्यांच्या वीणारवास [व इतर] वाद्यांस सेवुनि प्रसन्न होय.

दे[1] दर्शन देव, वदे, ध्या वर, जैसा यशाचिया गानें, ।
होतों प्रसन्न, अहि[2] हो! न च योगानें[3] तसाचि यागानें[4].' ॥ २५
कंबलसह अश्वतर प्रभुतें वंदुनि म्हणे, 'जरि वरातें ।
देतोसि, कुवलयाश्वा द्यावें, स्त्रीरत्न जें, मृत हरा! तें. ॥ २६
वय, रूप, स्मरण, तिचें तेंचि[5] असो व्यक्त; योगिनी धन्या, ।
हे अधिक[6]योगिमाता व्हावी[6] माझी मदालसा कन्या.' ॥ २७
ईश्वर सांगे, 'भक्षीं, श्राद्ध करुनि, पिंड मध्यम[7], व्याळा[8]! ।
होयिल तसीच ती तव मध्यमफणजा[9] मदालसा बाळा.' ॥ २८
प्रभुतें वंदुनि गेले हर्षें पन्नग[10] रसातळीं[11] गेहीं, ।
शिवदर्शनवरलाभें[12] ज्यांच्या रोमांच[13] दाटले[13] देहीं. ॥ २९
अश्वतर श्राद्धान्तीं मध्यम पिण्डासि आदरें भक्षी, ।
तत्काळ मध्यमफणश्वासप्रभवा[14] मदालसा लक्षी[15]. ॥ ३०
अश्वतराला झाला जो, तो आनंद काय सांगावा? ।
प्रभुचा, प्रभुभक्तांचा महिमा आम्हीं सदा न कां गावा? ॥ ३१
कोणासहि न कळों दे, ठेवी अंतःपुरांत बाळेतें[16], ।
जपति स्त्रिया बहु तितें, जेविं स्वर्वृक्षपुष्पमाळेतें[17]. ॥ ३२
मग तो म्हणे सुतांतें, "कां स्वगृहा कुवलयाश्व आणा ना? ।
साधु, सखा, उपकारी, पूज्य[18]; असें कां मनांत जाणा ना? ॥ ३३
निववा याचि सुदिवसीं मित्रांच्या, स्मरण धरुनि, आनयनें[19], ।
प्रांशाया[20] अतितृषितें[21] वाट पहातात, करुनि[22] 'आ'[22] नयनें[23]." ॥ ३४

---

१. यांत दची आवृत्ति असल्यामुळें **अनुप्रास.** २. सर्पांनो! ३. ब्रह्मचिंतनानें. 'योगातें'—असाही पाठ आहे. ४. यज्ञानें. या गीतींत **व्यतिरेकालंकार** आहे. ५. पूर्वींचेंच. ६. ही (स्वतःहून) अधिक योगप्रवीण अशा मुलाची माता व्हावी, हिच्या पोटीं योगिराज पुत्र जन्मावा. ७. मधला. ८. सर्पा! ९. मधल्या फडेपासून उत्पन्न झालेली. १०. सर्प. ११. पाताळीं. १२. शंकराचें दर्शन आणि मदालसेच्या प्राप्तीचा वर यांच्या लाभानें. १३. हर्षानें रोमांच उभे राहिले, फार आनंद झाला. १४. मधल्या फडेच्या श्वासापासून जिचा जन्म अशी. १५. पाही. १६. मदालसेतें. १७. कल्पवृक्षाच्या फुलांच्या माळेस. १८. सत्कार करण्यास योग्य. या अर्धाचा अन्वय—उपकारी, साधु सखा पूज्य (असे), असें मनांत कां जाणाना? १९. मित्राच्या आणण्यानें, मित्राला आणून. २०. पिण्यास, पहायास. २१. अति तान्हेलेलीं, अति उत्सुक झालेलीं. याचें विशेष्य 'नयनें.' २२. 'आ'करणें=तोंड पसरणें. ही **लोकोक्ति.** २३. डोळे. हा शब्द नपुंसक योजिला आहे. या गीतीचा अन्वय—स्मरण धरुनि (ध्यानांत ठेवून,

प्रातःकाळीं भेटुनि, ते आर्धीं सांगती कथा भव्या, ।
मग ‘अस्मदाश्रमातें[1] ये,’ ऐसी गोष्टि काढिती नव्या[2]. ॥ ३५

नृपसुत म्हणे, ‘सखे हो ! या वाक्यें[3] फार वाटतो खेद, ।
तुमचें हें सर्वस्व, प्रिय हो! कां आज कल्पितां भेद[4] ? ॥ ३६

सत्य सखे हो! माझे परम हितें[5] तुह्मी बहिश्चर[6] प्राण, ।
या मज दैवहताच्या झाला हृदयांत भेद हा बाण[7].’ ॥ ३७

ऐसें वदतां, अहिसुत ते ताताज्ञा तयास कळवीती, ।
तो नमुनि म्हणे ‘झालों धन्य; कुशळ गुरुदया सकळ वीती[8]. ॥ ३८

सत्वर चला, सखे हो! ताताज्ञाश्रुति[9] अतिक्रमिल[10] कोण? ।
शोण[11] न होऊं द्यावा तिळमात्रहि तातदृष्टिचा[12] कोण[13].’ ॥ ३९

बोलुनि असें, तयांसह नगरा बाहिर निघोनि, तो पावे ।
द्रुत[14] गौतमीस[15], कीं नच उशिरें ते तातपाद[16] कोपावे. ॥ ४०

त्या गौतमीनदींत व्याळनरेश्वरकुमार[17] ते शिरले, ।
जींत स्नातसकळजनदोष[18], ज्वाळेंत शैलभसे[19], जिरले[20]. ॥ ४१

मानी कुमार चित्तीं तटिनीपारीं[21] स्वमित्रसदनातें[22], ।
नेती नदींत दोघे फणिसुत ते त्या प्रसन्नवदनातें. ॥ ४२

---

मुद्दाम) मित्राच्या आनयनें याचि सुदिवसीं (आजच) [मज] निववा; (कारण) अतितृषितें नयनें [त्यास, त्याच्या रूपास] प्राशाया वाट पाहतात. या गीतींत पूर्वार्धांत व उत्तरार्धांत कार्यकारणभाव वर्णिल्यामुळें **काव्यलिंग.**

१. आमच्या घरीं. २. नवी. ३. भाषणानें. ४. भिन्नता. ५. हितकर्ते. ६. [देहा] बाहेर असणारे. **व्यतिरेक.** ७. **रूपकालंकार.** ८. प्रसवते. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. ‘गुरुदया सकळ कुशळ वीती’ हें **सुभाषित.** ९. बापाची आज्ञा हाच वेद. १०. उल्लंघील. ११. लाल. १२. बापाच्या डोळ्याचा. १३. कोंपरा. वर्णनसादृश्यः—‘हें क्षत्रियधैर्यतसें धैर्य तुझें, स्पष्ट सांग तूं कोण? । शोण न अनृतें व्हावे डोळे सारेहि, हे जसे कोण. ॥’ (मो० शांतिपर्व २।४३.) या गीतींत **अर्थांतरन्यास** असून, उत्तरार्ध **सुभाषित** आहे. बापास राग येऊं देऊं नये, असें न म्हणतां, बापाच्या दृष्टीचा कोंपरा लाल होऊं देऊं नये, असें वर्णिल्यामुळें **पर्यायोक्त.** १४. लवकर. १५. गोदावरीस. १६. बापाचे (अश्वतराचे) पाय. १७. सर्प व मनुष्य यांच्या राजांचे मुलगे. १८. (गोदावरींत) स्नान केलेल्या सगळ्या लोकांचीं पापें. १९. टोळसारखे. २०. विरले, नाहींसे झाले. २१. नदीच्या (=गोदावरीच्या [दुसऱ्या] तीरीं. २२. आपल्या मित्रांच्या गृहातें.

शिखुनि सरितेंत[1], बळें आकर्षुनि सर्पपुत्र मित्रास, ।
नेती पाताळीं ते, परि पावे तो न लेशहि त्रास. ॥ ४३
निजलोकीं निजरूप प्रकटिति मग ते फणींद्रसुत[2] दोघे, ।
पाहुनि हर्षे हांसे, तत्सुगुणांतें[3] गुणज्ञवर[4] तो घे. ॥ ४४
प्रेमीं न चळे, गातां जैसा नारद महातपा[5] ताळीं; ।
अश्वतरप्रासादीं[6] गेला कुतुकें पहात पाताळीं. ॥ ४५
ते त्या कथिती स्वपिता, अश्वतर व्याळपाळ[7] दावूनी; ।
तो कुवलयाश्व वंदी विनयें, चित्तांत तात भावूनी[8]. ॥ ४६
सुतमित्रातें[9] पाहुनि, तो अहि उतरे वरासनावरुनी[10], ।
भेटे, माथा हुंगी, कुरवाळि तया करास[11] नावरुनी[11]. ॥ ४७
तो त्या म्हणे, म्हणावें साक्षात् तातें जसें, 'चिरं[12] जीव[12], ।
गुरुजनमन[13] सुगुणांहीं बहु रंजविसी, असेंचि रंजीव[14]. ॥ ४८
सुगुण तुझे आइकतां या पुत्रांच्या मुखें, हृदय[15] रमलें, ।
आणविलासि पहाया वत्सा! तुज पाहतां, सुदिन[16] गमलें. ॥ ४९
जो पुरुष गुणी, त्याचें जीवितें[17] तें श्लाघ्य[18] होय लोकांत, ।
जीवंतहि मृत अगुणी[19], कीं बुडवी स्वजनचित्त[20] शोकांत. ॥ ५०
गुणवान् सुख वाटवितो साधुमनीं, रिपुमनांत तापातें[21]; ।

---

१. नदींत (गोदावरींत). नदींत ओढून नेत असतांही त्रास झाला नाहीं असें वर्णिल्यामुळें **विशेषोक्ति** अलंकार. २. सर्पराजाचे (अश्वतराचे) मुलगे. ३. सर्पपुत्रांच्या गुणांस. ४. गुण जाणणाऱ्यांत श्रेष्ठ. येथें **परिकर** आहे. ५. मोठा तपस्वी. या गीतीचा अन्वय–जैसा गातां महातपा नारद ताळीं (वीण्याच्या तालांत) न चळे (कोणत्याही प्रसंगीं चुकत नाहीं) [तसा कुवलयाश्व सर्पपुत्रांच्या] प्रेमीं न चळे, [व] पाताळीं कुतुकें पहात अश्वतरप्रासादीं गेला. ६. अश्वतराच्या वाड्यांत. ७. सर्पांचा राजा अश्वतर. या अर्धांचा अन्वय–ते (सर्पपुत्र) त्या (कुवलयाश्वास) अश्वतरव्याळपाळ दावूनी, [हा] स्वपिता [असें] कथिती. ८. मानून. या गीतींत 'त' आणि 'व' यांची आवृत्ति असल्यामुळें **छेकानुप्रास** व 'व्याळपाळ' आणि 'चित्तांत तात' हे **यमक**. ९. मुलांच्या मित्रास. १०. उत्तम आसनावरून, सिंहासनावरून. ११. करास नावरुनी=हात न आवरून, प्रेमानें हात पसरून. १२. पुष्कळ काळ वांच. १३. वडिलांचें मन. १४. रमव. १५. मन. १६. चांगला दिवस. येथें दिन शब्द नपुंसकीं योजिला आहे. १७. जिणें, जगणें. १८. स्तुत्य. १९. गुणहीन. २०. आपल्या आप्तांचें मन. ५०।५१।५२ या गीति **सुभाषित** आहेत. २१. दुःखातें.

पापातेविं अपल्या अगुणा न भजति, नसोचि बापा! तें[2]. ॥ ५१
देव, पितर, विप्र, अतिथि, अर्थी[3], जे विकळ[4], मित्र, जन वा! हे।
गुणिजीवित[5] चिर[6] वांछिति, वाहे हा यांसि भाग, यश लाहे. ॥ ५२
वत्सा! गुरुजनरंजनरतहृदया[7]! भव्यगुणगणावासा[8]! ।
तुझिया ठायीं जोजो, तोतोहि गुणांत गुण गणावासा[9].' ॥ ५३
ऐसें वर्णुनि फणिवर, पुत्रांसि म्हणे, 'उठा सखा न्हाणा, ।
आणा स्वन्न[10] मधु[11], अशन[12] करवा, पूजा बहिश्चरा[13] प्राणा. ॥ ५४
राहो, बोलायाची यासीं आहे कथा पुनरपि हिता[14], ।
हृदयीं रहस्यवार्ता[15] राहों देयिल न हा सुनर पिहिता[16].' ॥ ५५
विनयें न वदे किमपि, प्रेमें परि वाक्य मान्य तो करि तें, ।
त्या पूर्ण करूं पाहे अहि, न असों दे समर्थ[17] तोक[18] रितें. ॥ ५६
स्नानाशनादि[19] करवुनि, करुनि, प्रेमें सभेंत सुतसहित ।
अश्वतर बसे, बसवुनि जवळ नृपतनय, वदावयास हित. ॥ ५७

---

## अध्याय चवथा.

रवि हर्षवूनि लावी सोडाया जेविं कुवलया[20] श्वास[21], ।
करि सुप्रसन्न फणिवर पुण्यकथा कथुनि कुवलयाश्वास. ॥ १

---

१. संततीस, मुलास. २. अगुण अपत्य. या गीतीचा अन्वय–गुणवान् [मनुष्य] साधुमनीं सुख, [व] रिपुमनांत तापातें वाटवितो; [जन] पापातेविं अगुणा अपत्या न भजति, बापा! तें नसोचि (नसावेंच). ३. याचक. ४. दुबळे, व्यंग. ५. गुणवानाचें आयुष्य. ६. दीर्घकाळ. या गीतीचा अन्वय–वा! देव, पितर, विप्र, अतिथि, अर्थी, जे विकळ, मित्र, हे जन गुणिजीवित चिर वांछिति, हा (गुणी) यांसि (वर सांगितलेल्यांस) भाग (=प्राप्तीचा अंश) वाहे (=देतो) [व] यश लाहे. ७. वडिलांच्या रंजनांत रमलें आहे मन ज्याचें अशा! ८. चांगल्या गुणांच्या समुदायाचें स्थान अशा! ९. मोजावा असा. जो जो म्हणून कुवलयाश्वाच्या आंगचा गुण, तो तो त्याच्या सहवासानें चांगल्या गुणांत श्रेष्ठ गणण्यासारखा आहे, असा या गीत्यर्धाचा मतलब. १०. उत्तम अन्न. ११. मध. १२. सेवन. १३. शरीराबाहेर असणाऱ्या. १४. हितकारक. या अर्धाचा अन्वय–[आतां हें इतकेंच] राहो, पुनरपि यासीं हिता कथा [मला] बोलायाची आहे. १५. गुप्त गोष्ट. १६. गुप्त. १७. शक्तिमान्. १८. मूल. अहि त्या पूर्ण करूं पाहे, [कारण] समर्थ (वडील माणूस) तोक रितें न असों दे, असा अन्वय. अर्थान्तरन्यास. १९. स्नान, भोजन इत्यादि. २०. पृथ्वी किंवा कमल यास. २१. आनंदाचा श्वास.

मग राजसुतासि म्हणे, 'वत्सा! निःशंक सांग, तर्पावें[1] ।
कोणें सुपदार्थें तुज? सुखवाया वस्तु काय अर्पावें? ॥ २
आसन, वाहन, अंबर[2], आयुध[3] किंवा सुवर्ण, मणि[4], कांहीं ।
दुर्लभ वस्तु कथावें[5]; द्यावें म्यां, जें दिजे न अणिकांहीं[6].' ॥ ३
नमुनि ऋतुध्वज विनवी, 'पाताळीं तात तूं, महीवरि[7] तो, ।
काय उणें? सर्व सुखें जीं जीवत्पितृक[8] तो महीं वरितो. । ४
रत्नादि सर्व पुष्कळ त्या[9] तातगृहीं, जगीं असेना तें; ।
येथेंहि विपुळ[10], बापा! ध्यावें द्यावें असें असे नातें. ॥ ५
कार्येंहि नाहीं कांहीं यांहीं, बा हीं[11] यथेष्ट आहेत. ।
अर्थी[12] पावति नमनीं, भोगावें भूषणादि[13], हा हेत[14]. ॥ ६
जें दुर्लभ वांछावें, पावाया धरुनि आदरा, जीवें, ।
झालें प्राप्त मज, शिरें स्पर्शुनि तव भव्य[15] पादराजीवें[16].' ॥ ७
प्रेमें फणिवर्य[17] म्हणे 'वत्सा! कनकादि[18] जरि नको, अस्तु[19]; ।
जें तव हृदयास बहु प्रीतिप्रद[20], तेंचि माग तूं वस्तु.' ॥ ८
नृपपुत्र म्हणे, "झालों स्पर्शास तुझ्या मनुष्य मी पात्र, ।
अंतर्बाह्य[21] निवालें, अमृतस्नानें[22] जसें, तसें गात्र[23], ॥ ९

---

१. तृप्त करावें. २. वस्त्र. ३. हत्यार. ४. रत्नें. ५. पाठभेदः—करावें. ६. दुसऱ्या लोकांनीं. या गीतीचा अन्वय—आसन, वाहन, अंबर, आयुध, सुवर्ण किंवा मणि [इत्यादि] कांहीं दुर्लभ वस्तु [त्वां] कथावें, [कारण] जें अणिकांहीं न दिजे (=दिलें जात नाहीं), [तें]म्यां [तुज]द्यावें [असें मनांत आहे]. ७. शत्रुजित्. ८. ज्याचा पिता जीवंत आहे तो. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. सर्व सुख इत्यादि भाग **सुभाषित** आहे. या गीतीचा अन्वय—ऋतुध्वज [अश्वतरास] नमुनि विनवी, पाताळीं तूं तात [आहेस, व] तो महीवरि [आहे, मग मला] उणें काय? [जो] जीवत्पितृक तो, जीं सर्व सुखें, [तीं] महीं (उत्सवानें) वरितो. ९. शत्रुजिताच्या घरीं. १०. पुष्कळ. या गीतीचा अन्वय—[जें] रत्नादि सर्व त्या तातगृहीं पुष्कळ [आहे], तें जगीं असेना; बापा! येथेंहि[तें] विपुळ [आहे],[बाकी] द्यावें ध्यावें असें नातें असे. ११. पुरेशीं. विपुल. **अश्वधाटीयमक.** १२. याचक. १३. अर्थाचा सार्थान्वयः—भूषणादि भोगावें हा हेत अर्थी [केवळ] नमनीं (तुला नमन केल्याबरोबर) पावती (लाभतात, साधतात). १४. हेतु, इच्छा. १५. शुभ, कल्याणकारक. १६. चरणकमलें. या गीतीचा अन्वय—जीवें आदरा धरुनि जें दुर्लभ [वस्तु] पावाया वांछावें, [तें], तव भव्य पादराजीवें शिरें स्पर्शुनि, मज प्राप्त झालें. १७. श्रेष्ठ सर्प, अश्वतर. १८. सुवर्णादि. १९. असो. २०. प्रीति उत्पन्न करणारें, प्रिय, आवडतें. २१. आंत बाहेर. २२. अमृतानें स्नान केल्यानें. २३. शरीर.

'द्यावा अवश्य वर' हें चित्तीं, तरि [1]हेतु [2]सर्वशर्मांचा, ।
हृदयांतूनि न जावा माझ्या संस्कार [3]पुण्यकर्मांचा. ॥ १०
[4]दिव्यांगराग, रत्नें, स्त्री, सुत, संपत्ति, गीत, वाद्य, असें ।
हें सर्व [5]सुकृततरुफळ, जें होणें [6]मुदित [7]विविधभोगरसें." ॥ ११
सर्प म्हणे, 'सत्य वदसि, हें तुज दिधलें, तथापि जें कांहीं ।
दुर्लभ [8]नरलोकीं तें माग, किमपि कठिण बा! मला नाहीं.' ॥ १२
या वचनें बहु [9]कोंडे, आग्रह करितां उगाचि तो राहे; ।
वाहे संकोचाचा [10]भर, मित्रांच्या मुखांकडे पाहे. ॥ १३
फणिसुत म्हणती, 'ताता ! [11]अहितें कथितांचि [12]शोकदा वार्ता, ।
याची [13]दयिता मेली, होवुनि [14]अत्यंतशोकदावार्ता. ॥ १४
[15]गंधर्वेश्वरकन्या ती [16]सुतनु मदालसा, तदन्या या ।
न रुचे; हा [17]तद्विरहें झाला तापा, जसा [18]पद न्याया. ॥ १५
मुक्ति [19]मुमुक्षूस जसी, या तीच स्त्री रुचे, नको कांहीं; ।
श्रम याच्या प्राणांहीं विरहें वरिला, असा न [20]कोकांहीं. ॥ १६
बापा! घडेल तरि, या तीच समर्पूनि तूं पुरीव [21]रती, ।
[22]भोगवती यास नको, [23]अलकाहि, तिच्याहि जी [24]पुरी वरती.' ॥ १७

---

१. कारण. २. सर्व सुखांचा. ३. पुण्यकारक कर्मांचा. ४. उत्तम उटी. ५. पुण्यरूप वृक्षाचें फळ. ६. आनंदित. ७. नानाप्रकारच्या भोगांच्या गोडीनें. या गीतीचा अन्वयः— दिव्यांगराग, रत्नें, स्त्री, सुत, संपत्ति, गीत, वाद्य, असें जें विविधभोगरसें मुदित होणें, हें सर्व सुकृततरुफळ. ही गीति **सुभाषित** आहे. ८. मृत्युलोकीं. ९. संकोचला, घोटाळला, १०. ओझें. ११. शत्रूनें, ताळकेतूनें. १२. दुःख देणारी. १३. प्रियपत्नी. १४. अतिशय शोकरूप वणव्यानें पीडलेली. १५. गंधर्वांचा राजा विश्वावसु त्याची मुलगी. १६. सुंदरी. १७. मदालसेच्या विरहानें. १८. स्थान. या गीतीचा अन्वय–ती गंधर्वेश्वरकन्या मदालसा सुतनु [होती,] तदन्या या न रुचे, जसा हा न्याया (न्यायबुद्धीला, सचोटीला) पद (=स्थान, आश्रय) [झाला आहे, तसा] तद्विरहें तापा (तापाचें) पद झाला. १९. मुक्तीची इच्छा करणाऱ्यास. २०. चक्रवाक पक्ष्यांनीं. कविजनांत दयिताविरहानें होरपळलेल्या स्थितीसंबंधें ज्यांची अत्यंत प्रसिद्धि आहे, अशा चक्रवाकांच्या विरहापेक्षां कुवलयाश्वाच्या विरहदुःखाचें आधिक्य वर्णिल्यामुळें **व्यतिरेकालंकार.** २१. आवड. २२. नागराजाची राजधानी. २३. कुबेराची पुरी. २४. तिच्याहि वरती जी पुरी=अमरावती. मदालसाच पाहिजे, अन्य नको, असें वर्णन केल्यामुळें **परिसंख्यालंकार.**

**अ**श्वतर म्हणे, ‘सुत हो! [1]मृतदर्शन जें सुरांसही जड, तें ।
स्वप्नावांचुनि किंवा [2]मायेवांचुनि कसें मला घडतें? ॥ १८
नृपपुत्र भीड सोडुनि बोले, ‘[3]शोकाभिधा [4]अलातातें ।
विझवाया, दावावी कसितरि ती एकदा मला तातें. ॥ १९
दयिता **म**दालसा ती ताता! [5]मायामयीहि दाखवितां, ।
मजवरि [6]परमानुग्रह, जेविं [7]सुधा [8]ज्वरहतासि चाखवितां.’ ॥ २०
**अ**श्वतर म्हणे ‘माझें [9]विपुळ नसे हृदय या [10]महा [11]माया; ।
[12]अभ्यागत बाळहि गुरु, वांछिसि, तरि तूं सुखें पहा [13]माया.’ ॥ २१
ऐसें बोलुनि, सदनीं निजली होती **म**दालसा [14]दुहिता, ।
ती आणुनि तो दावी, सुतमित्राच्या करी असा [15]सुहितां. ॥ २२
स्मित करुनि पुसे, ‘तव मन जीच्या ठायीं सदा असे [16]लोल, ।
ती हे **म**दालसा, कीं अन्या? वत्सा! पहा, खरें बोल.’ ॥ २३
अवलोकितांचि, लज्जा सोडुनि, सहसा उठे, ‘प्रिये! [17]आली!’ ।
ऐसें म्हणत, तिजकडे आलिंगायास [18]धांव तो घाली. ॥ २४
[19]**ना**गेंद्र [20]विनोदें करी, ‘रे वत्सा! मजकडे पहा, काय ।
भ्रमसी? हे माया, कीं योग्य स्पर्शावया न हा [21]काय. ॥ २५
करितां **स्पर्श**, न राहे माया, दूरूनि मात्र बा! पाहें; ।
आलिंगनें न निववील पळ [22]विद्यारचितगात्र बापा! हें.’ ॥ २६
यापरि वदुनि, निवारण करि जेव्हां [23]पन्नगेंद्र तो हातें, ।
‘हाय’ **कु**वलयाश्व म्हणे, तत्काळ पडे धरूनि [24]मोहातें. ॥ २७
मोहे **अश्वत**राचें, पुत्राच्या जेविं तातमन घातें; ।

---

१. मेलेल्याचें दर्शन. २. माया=जादू, गारुडी विद्या. ३. शोकनांवाच्या. ४. कोलितातें. ५. गारुडी विद्येनें बनविलेली. ६. मोठा प्रसाद. ७. अमृत. ८. तापानें जर्जर झालेल्यास. ९. विस्तृत. १०. आनंदास. ११. मावण्यास. हृदयआधारापेक्षां आनंदरूप आधेयाचें विपुलत्व वर्णिल्यामुळें **अधिका**लंकार. १२. कल्पनासादृश्यः—सकळां अभ्यागतची गुरू । म्हणोनी उचीत आदरू । ऐसा धर्ममार्गींचा विचारू । आलियातें करावें ॥ ७४. (मुक्तेश्वरकृत शुकरंभासंवाद.) १३. जादू, गारूड. **अर्थान्तरन्यास**. १४. कन्या. १५. उत्तम हितास. १६. लुब्ध. १७. सखे! १८. धांव घाली=धांव घेई, उडी घाली. १९. सर्पांचा राजा, अश्वतर. २०. थट्टा. २१. देह. २२. विद्येनें (मायेनें) बनविलेलें शरीर. २३. सर्पांचा राजा. २४. मूर्च्छेस.

सावध करि शीतें [1]वनें, [2]पवनें, पुत्रांसमेत [3]अनघातें. ॥ २८
करुनि विनोद क्षणभरि, तो पन्नग [4]सर्वसाधुराय कवी, ।
अर्पुनि कन्या प्रेमें, वृत्त सकळ तें तयासि आयकवी. ॥ २९
[5]कान्तेतें पावुनि, तो बहु हर्षे **कु**वलयाश्व, करि नमनें, ।
प्रार्थुनि म्हणे, 'फिटाया ऋण, चरणस्मरण, नित्य करिन मनें.' ॥ ३०
मग चिंतितांचि आला **कु**वलय [6]हयवर, चढे तयावरि तो, ।
ये [7]सस्त्रीक स्वपुरा, सुगुण जन पुन्हा [8]महोदया वरितो. ॥ ३१

---

## अध्याय पांचवा.

येवुनि पुरासि, वंदुनि तातातें, सर्व वृत्त तो कळवी, ।
पळवी शोक पळांत, स्वयशें [9]शात्रवजनाननें मळवी. ॥ १
'वाहो देह यशासि, न मोत्यांच्या हा तसा सरा [10]सांसू; ।
[11]चिर असां' म्हणति असें, शिरिं ठेवुनि हात, सासरा, सासू. ॥ २
होय पुरांत [12]महोत्सव, वांटिति जन [13]कनक, शर्करा, [14]जीवां; ।
तो [15]वासर बहु सुखवी त्या पौरां, जेविं [16]अर्क [17]राजीवां. ॥ ३
वर्णिति **अ**श्वतरा किति, **श**त्रुजिता किति, **ऋ**तुध्वजाशि कवी, ।
त्यांतें '[18]**मं**दालसाव्रत, [19]निजभाग्यहि गा' असें प्रजा शिकवी. ॥ ४
**मं**[20]दाकिनींत जैसा जाणे तापा महागज न कांहीं, ।
हा नृप तैसा; वरिलें सुख इतरांच्या [21]महाग [22]जनकांहीं. ॥ ५

---

१. थंड पाण्यानें. २. वाऱ्यानें. ३. अन्+अघातें, निष्पापातें, पवित्रातें. पूर्वार्धांत सुंदर **उपमा** आहे. या गीतीचा अन्वय–जेविं तातमन पुत्राच्या घातें मोहे, तेविं अश्वतराचें मन मोहे, [तो] पुत्रासमेत शीतवनें, पवनें अनघातें सावध करी. ४. सर्व साधूंत श्रेष्ठ. ५. स्त्रीतें. ६. उत्तम घोडा. ७. स्त्रीसह. ८. मोठ्या भरभराटीस. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. चतुर्थचरण **सुभाषित** आहे. ९. शत्रूंचीं तोंडें. यश पांढरें असून, त्यानें शत्रूंचीं तोंडें काळीं केलीं, असें वर्णिलें आहे, म्हणून **विषमालंकार** आहे. १०. सजीव. याचें विशेष्य 'देह'. ११. चिरकाळ. १२. मोठा उत्सव. १३. सुवर्ण. १४. लोकांस. १५. दिवस. १६. सूर्य. १७. कमळांस. १८. मदालसेचें पातिव्रत्य. १९. (स्वतःचें) दैवहि. या गीतीचा अन्वय–किति कवी अश्वतरा, किति शत्रुजिता, (किति) ऋतुध्वजासि वर्णिति; [व] त्यांतें (त्या कवींतें) 'मदालसाव्रत [व] निजभाग्यहि गा' असें प्रजा शिकवी. २०. आकाशगंगेंत. २१. विरल, थोडें. २२. पित्यांहीं.

स्वर्गासि शत्रुजिन्नृप, परिपाळुनि पुत्रवत्[1] प्रजा, गेला; ।
मग कुवलयाश्व राजा, पडुनि[2] गळां, प्रकृतिंनीं[3] बळें केला. ॥ ६
पोटीं मदालसेच्या शुभलग्नीं[4] प्रथम होय सुत राजा[5]; ।
संसृति[6], सतीसहाया[7], नीतिरता[8] सर्वकाळ सुतरा, ज्या. ॥ ७
प्रेमें 'विक्रान्त' असें नाम ऋतुध्वज तया सुता ठेवी, ।
तेव्हां ती हास्य करी ज्ञानामृतनिधि[9] मदालसा देवी. ॥ ८
उल्लापनच्छळें[10] ती ज्ञानाब्धि[11] मदालसा स्वतोकातें[12] ।
बोधी, न सांपडाया इतरांपरि[13] संसृतींत शोकातें. ॥ ९
'ताता! शुद्ध असससि तूं सर्वगत[14], अनादिनिधन[15], निष्काम[16], ।
आतांचि कल्पनेनें केलें विक्रांत[17] हें तुला नाम. ॥ १०
तूं नामरूपवर्जित[18], मायेनें विश्व कल्पनागेह[19], ।
स्नेह नसे विषयांचा, पंचात्मक[20] हा तुला नसे देह. ॥ ११
अन्नें उदकें भूतें[21] वाढति; तुज वृद्धि[22], हानि[23] बा! नाहीं; ।
तूं एक, अविद्येनें[24] दिसती भूतें उगीच नाना हीं.' ॥ १२
स्तन पाजितां, निजवितां, हालवितां, बाळकासि खेळवितां, ।
दे बोध, जो सुदुर्मिळ[25] थोरांसि सहस्र[26] कल्प मेळवितां; ॥ १३

---

१. मुलासारखी. यांत 'प'ची आवृत्ति असल्यामुळें **अनुप्रास.** २. (त्याची इच्छा नसतांही) फार गळ घालून, अत्यंत आग्रह करून. **लोकोक्ति.** ३. प्रजांनीं. या गीतीचा अन्वय—शत्रुजिन्नृप प्रजा पुत्रवत् परिपाळुनि स्वर्गा गेला; मग प्रकृतिंनीं (कुवलयाश्वाच्या) गळां पडुनि, कुवलयाश्व बळें राजा केला. ४. मंगल मुहूर्तावर. ५. राजाला, कुवलयाश्वाला. ६. संसार. ७. पतिव्रता ज्यास सहाय आहे अशास. ८. नीतींत रमलेल्यास. या अर्धाचा अन्वय—ज्या सतीसहाया [व] नीतिरता [राजाला] सर्वकाळ संसृति सुतरा (तरून जाण्यास सोपी) [होती]. ९. ज्ञानरूपी अमृताचा समुद्र. १०. संभाषणाच्या रूपानें, सहज बोलतांना. ११. ज्ञानाचा समुद्र. १२. आपल्या मुलास. १३. दुसऱ्या सामान्य लोकांप्रमाणें. या गीतीचा अन्वय—ती ज्ञानाब्धि मदालसा, इतरांपरि संसृतींत शोकातें [स्वतोक] न सांपडाया, उल्लापनच्छळें स्वतोकातें बोधी. १४. सर्व पदार्थांस व्यापून असलेला. १५. जन्ममरण नाहीं असा. १६. निरिच्छ. १७. येथें विक्रान्त या नांवाचें यथार्थत्व दर्शविल्यामुळें **निरुक्ति**नामक अलंकार झाला आहे. १८. नाम व रूप यांविरहित. १९. विश्व हें मायेमुळें भासणारें कल्पनेचें घर (कल्पित इमारत) आहे. २०. पंचभूतात्मक. २१. प्राणी. २२. वाढ. २३. नाश. २४. मायेनें. २५. प्राप्त होण्यास कठीण. २६. हजारों युगें. पूर्वार्धांत 'ता'ची आवृत्ति असल्यामुळें **यमक.** या गीतीचा अन्वय—बाळकासि स्तन पाजितां, निजवितां, हालवितां, खेळवितां [ती] बोध दे, जो [बोध] सहस्र कल्प मेळवितां (मिळविण्याची खटपट करीत असतां) थोरांसि दुर्लभ [आहे].

जन्मापासुनि बोधुनि केला विक्रांत पुत्र सुज्ञानी, ।
वांछीना [1]गृहधर्म, स्तविला बहु नारदादि सुज्ञांनीं. ॥ १४
त्यावरि 'सुबाहु' ऐसें नाम स्थापी द्वितीय तनयातें; ।
हांसे मदालसा, जरि मानवती आप्त सुज्ञ जन येतें. ॥ १५
त्यासहि [3]बाल्यापासुनि बोध करी ती मदालसा सुसती, ।
[4]अहिता संसारावरि त्याचीही बुद्धि जाहली रुसती. ॥ १६
मग तिसरा सुत होतां, पुर झालें [5]अद्भुतोत्सवा [6]धाम; ।
त्यालाहि 'शत्रुमर्दन' ऐसें ठेवी पिता स्वयें नाम. ॥ १७
त्या नामें जन हर्षे, तेव्हांही बहु मदालसा हांसे, ।
दे [7]आत्मबोध त्यासहि, जो तोडी [8]विषयवासनाफांसे. ॥ १८
नाम चतुर्थ सुताचें जों योजी कुवलयाश्व, तों पाहे, ।
ती [9]हसितमुखी देवी बहु पहिल्याहूनि जाहली आहे. ॥ १९
नृपति पुसे, 'वद कारण हास्याचें, जें मना तुज्या येतें; ।
नाम चतुर्थ सुताला ठेवावें त्वांचि आजि [10]जांये तें. ॥ २०
नामें बरवीं केलीं विक्रांत, सुबाहु, शत्रुमर्दन, हीं ।
राजसुतातें, '[11]उचितें [12]कुशलें घालावया जनास [13]महीं.' ॥ २१
ती साध्वी पतिस म्हणे, '[14]ओख्या आली मनास माज्या जी, ।
ती तुमच्या आज्ञेनें ठेवितसें या सुतासि, राजाजी ! ॥ २२
हा सुत अलर्कनामा या वंशीं, जेविं दीप [15]ओकांत; ।
धर्मज्ञ, साधु, सद्गुण होइल विख्यात सर्व लोकांत.' ॥ २३
हास्य करुनि भूप म्हणे, 'सुज्ञे! दयिते! अलर्क हें नाम ।
गमतें [16]अबद्ध, याचा वद अर्थ; [17]सुगंध धार्य तें [18]दाम.' ॥ २४
राज्ञी म्हणे, "अहो जी ! [19]हे व्यवहारार्थ कल्पना जाणा; ।

---

१. गृहस्थाश्रमधर्म. २. या अर्धांत **विभावनालंकार** आहे. ३. लहानपणापासून. ४. अकल्याणकारक. ५. अलौकिक उत्सवाचें. ६. घर. ७. आत्मज्ञानाचा उपदेश. ८. विषयाच्या इच्छेचे फांस (बंध). ९. हर्षयुक्त आहे तोंड जिचें अशी. १०. स्त्रिये. ११. योग्य. १२. क्षेमानें, कल्याण करून. १३. आनंदांत. या गीतीचा अन्वय–उचितें कुशलें जनास महीं घालावया, विक्रांत, सुबाहु, शत्रुमर्दन हीं राजसुतातें नामें बरवीं केलीं. १४. नांव. १५. गृहांत. १६. असंबद्ध, अयुक्त. अलर्क–पिसाळलेलें कुत्रें. १७. [जें] सुगंध (सुवासिक) [दाम], तें दाम (ती माळा) धार्य (अंगावर वापरण्यास योग्य). १८. माळा. १९. ही नाम ठेवण्याची कल्पना.

युष्मत्कृतनामांची[1] कथितें चित्तीं निरर्थता[2] आणा. ॥ २५
जे प्राज्ञ[3], ते म्हणति जन, '**पु**रुष व्यापक, तया घडे न गती;' ।
केली '**वि**क्रान्त' असी आख्या[4] जी, सार्थका[5] कसी मग ती? ॥ २६
**पु**रुष अमूर्त[6], तयातें काय म्हणावें '**सु**बाहु'? पंडित हो ! ।
या सुविचारें दुसरें नाम सुताचें कसें न खंडित[7] हो? ॥ २७
तिसरेंहि '**श**त्रुमर्दन' हें नाम व्यर्थ, सर्व देहांत ।
एकचि **पु**रुष बहु दिसे, जैसा आदर्शजडित गेहांत[8]. ॥ २८
अरि कोण ? मित्र कोण? स्वामी ! सुविचार करुनि, सांगावें; ।
सुतनाम **श**त्रुमर्दन हें मग 'सार्थक' म्हणोनि कां गावें? ॥ २९
भूतांहीं भूतांचें मर्दन[9] तत्वज्ञ जाणतात असें, ।
**पु**रुष अमूर्त[10] तयाचें मर्दन, बोला, बरें घडेल कसें? ॥ ३०
सद्व्यवहार[11] घडावा, म्हणुनि असन्नाम[12] कल्पिलें जातें; ।
ऐसें असतां, म्हणतां कां 'व्यर्थ,' **अ**लर्क नाम जें या, तें?" ॥ ३१
त्या तथ्यवादिनीचें[13] श्रवण करुनि वचन मानवेश[14] तदा, ।
वाक्या **स**रस्वतीच्या **च**तुरानन[15], तेविं मानवे[16] शतदा. ॥ ३२
जेविं तिघे सुत धाले, चवथाहि तसा **अ**लर्क तो धाया, ।
बोधाया ती लागे, तदविद्यामलिनहृदय[17] शोधाया[18]. ॥ ३३
क्रुद्ध **कु**वलयाश्व म्हणे, जीतें स्तविती समस्त संत, तितें; ।
'मूढे! हें काय करिसि, माझ्या बुडवावयासि संततितें[19]? ॥ ३४
मत्प्रिय[20] करणें हें जरि तुझिया चित्तीं असेल, हा तनय ।
योजीं प्रवृत्तिमार्गीं[21], नच होवू हतधर्म[22], हतनय[23]. ॥ ३५

---

१. तुम्हीं ठेविलेल्या नांवांची. २. निष्फलता. ३. शहाणे. या गीतीचा अन्वय—जे प्राज्ञ जन, ते म्हणती, 'पुरुष व्यापक, तया गती न घडे,' मग विक्रान्त असी जी आख्या केली, ती सार्थका कसी? ४. नांव. ५. अर्थयुक्त. ६. मूर्तिमंत नव्हे असा, आकृतिहीन. ७. अयुक्त, अनुचित. ८. आरसे लाविलेल्या घरांत, आरसेमहालांत. ९. मारणें. १०. या अर्धाचा अन्वय—पुरुष अमूर्त, तयाचें मर्दन कसें बरें घडेल ? बोला (सांगा). ११. चांगलें वर्तन. १२. वाईट नांव. १३. खरें भाषण करणारीचें. १४. राजा, ऋतुध्वज. १५. ब्रह्मदेव. १६. कबूल होई, मान्य करी. १७. त्याचें अज्ञानानें मलिन झालेलें अंतःकरण. १८. शुद्ध करण्यास. १९. मुलांस. या गीतींत **विषम** आहे. २०. माझें प्रिय. २१. संसाराच्या मार्गांत. २२. ज्यानें धर्म टाकिला आहे असा, धर्मभ्रष्ट. २३. ज्यानें न्याय टाकिला आहे असा, नीतिभ्रष्ट.

आतां, राज्य करावें म्यां; जो करितो अलर्क, तो [१]अनुज.' ॥ ४
तें कार्य [२]यशस्कर कां अभिमानी काशिराज [३]परिसेना ? ।
शरणागत राज्यपदीं स्थापाया, शीघ्र सिद्ध करि सेना. ॥ ५
'दे राज्य [४]अग्रजातें,' ऐसें सांगोनि पाठवी दूत; ।
तो [५]अरिशासन [६]मानी [७]मानी न अलर्क [७]मनुजपुरुहूत. ॥ ६
'भेटोनि अग्रजानें मजला, स्वमुखेंचि राज्य मागावें; ।
लागावें न [८]परमतिस, म्यांही [९]अरिशासनीं न वागावें.' ॥ ७
तोहि सुबाहु म्हणे, "मी क्षत्रिय, कां 'दे' असें म्हणेन मुखें? ।
[१०]सामें देत नसे तरि, देयिल [११]दंडेंचि सर्व राज्य [१२]सुखें." ॥ ८
[१३]योगिवर सुबाहु [१४]बळें युद्धार्थ [१५]विरोध वाढवी, राजा ।
जागें करावया त्या, प्राप्त अहंकार [१६]वाढ वीरा ज्या. ॥ ९
[१७]चतुरंग सैन्य पुष्कळ मिळवुनि, [१८]काशीश विजय [१९]भावुनि घे; ।
भासे वाया परिभव, [२०]परि [२१]भव [२२]वारावयासि, [२३]भावु निघे. ॥ १०
[२४]सामाद्युपाय योजुनि वश करि [२५]सामंत काशिपति सर्व, ।
[२६]आक्रमुनि राष्ट्र, पुरही, नुरवी [२७]लेशहि [२८]अलर्कनृपगर्व. ॥ ११
प्रतिदिन [२९]वीरजनक्षय होय, [३०]धनक्षय, अलर्क [३१]असहाय ।
[३२]आंत गडबडे, बाहिरमात्र म्हणों दे न [३३]वीररस 'हाय'. ॥ १२

---

१. धाकटा भाऊ. या गीतीचा अन्वय–राया ! मी सुबाहुनामा [आहें], मला मदालसातनुज जाण; म्यां राज्य करावें [कारण] आतां जो अलर्क राज्य करितो, तो [माझा] अनुज [आहे]. २. यश देणारें. ३. ऐकेना. ४. वडील भावातें. ५. शत्रूची आज्ञा. ६. अभिमानी. ७. जुमानी, लक्ष्यांत घेई. ७. मनुजेन्द्र, नरश्रेष्ठ. या अर्धांचा अन्वय–तो मनुजपुरुहूत मानी अलर्क अरिशासन न मानी. ८. शत्रूच्या बुद्धीस, दुष्मानाच्या शिकवणीस. ९. शत्रूच्या कह्यांत वागावें. ह्या गीतींत अलर्कानें उलट धाडलेला निरोप आहे. १०. सामोपचारानें. ११. शिक्षेनेंच. १२. सहज. १३. श्रेष्ठ योगी. १४. मुद्दाम. १५. वैर. १६. पुष्कळ, मोठा. या गीतीचा अन्वय–ज्या वीरा वाढ अहंकार प्राप्त [झाला], त्या राजा जागें करावया, योगिवर सुबाहु बळें युद्धार्थ विरोध वाढवी. १७. गजदळ, रथदळ, घोडदळ व पायदळ असें चार प्रकारचें. १८. काशिराजा. १९. मानुनि. २०. परंतु. २१. संसार. २२. सोडवावयास. २३. भाऊ. तृतीय व चतुर्थ चरणांत **दामयमक.** या अर्धांत **विरोधाभासालंकार.** २४. साम, दान, दंड व भेद हे उपाय. २५. मांडलिक राजे. २६. घेऊन, जिंकून. २७. थोडाही. २८. अलर्क राजाचा गर्व. २९. वीरलोकांचा नाश. ३०. द्रव्याचा नाश. ३१. एकटा. ३२. मनांत. ३३. क्षत्रियाचा अभिमान.

त्या परमसंकटीं तो स्मरता झाला मदालसामुद्रा,[1] ।
क्षुद्रा[2] उपमा अन्या; त्या ती,[3] गंगा जसी हिता[4] रुद्रा. ॥ १३
पूजी निजमातेची ती मुद्रारूपिणी[5] दया साची,[6] ।
याची[7] अभयवरातें, रोमांचितदेह[8] होय, तो वाची. ॥ १४
'संग[9] त्यागावा, जरि न त्यजवे, साधुसीं तरि करावा; ।
कीं संगाचें ओखद संत, मनीं बोध हा हित[10] धरावा. ॥ १५
काम[11] त्यागावा, जरि न त्यजवे सर्वथा, तदीयजया[12] ।
तरि तोचि मुमुक्षेप्रति[13] करिजे, कीं तीच होय ओखद या.' ॥ १६
हा ज्यांत अर्थ, ऐसें श्लोकद्वय[14] अंगुलीयकीं[15] पाहे, ।
जाणे स्पष्ट मुमुक्षायोगेंचि[16] श्रेय[17] या भवीं[18] आहे. ॥ १७
सत्संगेंचि मुमुक्षाप्राप्ति जना होय, हें मनीं आणी; ।
खाणी[19] तच्चिंताविषवल्लीतें[20] ती मदालसावाणी.[21] ॥ १८
'ज्याच्या संगें होय प्राप्त मुमुक्षा, जिणें भवा अंत, ।
पंत[22] ज्ञानप्रद[23] या समयीं मज कोण भेटतो संत?' ॥ १९
ऐसें चिंती[24] जों, तों श्रीदत्तात्रेय संत ये ध्यानीं, ।
ज्ञानींद्रा[25] त्या जाय क्षिप्र[26] शरण तो तयाचिया स्थानीं. ॥ २०
जी अज्ञानतमोघ्नी[27] प्रभुदृष्टि[28] पडे नता नृपावरि ती, ।
शरणागता[29] तयातें तत्काळचि जाहली कृपा वरिती. ॥ २१
वंदुनि म्हणे, 'प्रभो! मी शरणागत, मुख्य तूं शरण्यांत;[30] ।
रक्षीं, दुःखीं पडलों, मृग जेविं दवाकुळा[31] अरण्यांत.' ॥ २२

---

१. मदालसेची आंगठी. २. हलकट, कमदर्ज्याची, नीच. ३. मुद्रा. ४. हितकारक. ५. मुद्रारूपी. ६. खरी. ७. मागे. ८. पुलकितशरीर, ज्याच्या देहावर कांटा उभारला आहे असा. ९. संगति. १५।१६ गीती **सुभाषित** आहेत. १०. हितकारक. ११. इच्छा. १२. त्या कामास जिंकण्यासाठीं. १३. मुक्त होण्याच्या इच्छेसंबंधें. १४. दोन श्लोक. १५. आंगठींत. १६. मुक्त होण्याच्या इच्छेनें. १७. कल्याण. १८. संसारीं. १९. खणून काढी, निर्मूळ करी. २०. त्याच्या चिंतारूपी विषाच्या वेलीस. २१. मदालसेचें वचन. २२. पंतोजी, पंडित, गुरु. २३. ज्ञान देणारा. या गीतीचा अन्वय—जिणें भवा अंत [होय अशी] मुमुक्षा ज्याच्या संगें प्राप्त होय, [असा] ज्ञानप्रद पंत संत या समयीं मज कोण भेटतो? २४. विचार करी. २५. ज्ञात्यांत श्रेष्ठ. २६. सत्वर. २७. अज्ञानरूप अंधाराचा नाश करणारी. २८. प्रभुदत्तात्रेयाचे नेत्र. २९. या अर्धाचा अन्वय—तयातें शरणागता कृपा तत्काळचि वरती झाली. ३०. रक्षण करणाऱ्यांत. ३१. दावाग्नीनें व्याप्त अशा.

श्रीदत्तात्रेय म्हणे “बा! वद, तूं कोण? दुःख तें काय? ।
घाय[१] दिसे ना देहीं, हो सावध, ऊठ, म्हणसि कां ‘हाय?’” ॥ २३
ऐसें विश्वगुरु[२] पुसे, चित्तांत अलर्क जों विचार करी, ।
जाणे, ‘मी सच्चित्सुख[३] एक, इतर कोण मित्र? कोण अरी? ॥ २४
देहादि[४] इतर सकळें विकळें[५], एणें[६] न मी सकळ विकळ[६], ।
देहाभिमान[७] नसतां, ताप[८] उठुनही बुधा[९] न कळवि कळ[१०].’ ॥ २५
तो श्रीदत्तासि म्हणे, ‘मज दुःख बरें[११] विचारितां नाहीं, ।
जीव[१२] असम्यग्दर्शी[१३] संसारीं सुख न पावती कांहीं. ॥ २६
पुरुषाच्या चित्ताचें जेथें जेथें महत्त्व[१४] बा! होतें, ।
तेथुनि तेथुनि दुःखें आणुनि देतें समर्थबाहो[१५]! तें[१६]. ॥ २७
गृहकुकुटासि[१७] खातां मार्जारें[१८], जेविं दुःख होय जना, ।
तेविं न ममताशून्या[१९] चटका[२०] कीं मूषका[२१], स्वभक्तधना[२२]! ॥ २८
म्हणुनि न दुःखी, न सुखी, कीं प्रकृतीहून[२३], पाहतां[२४], परे[२५] मी; ।
कळलें असें, विचारीं[२६] या आतां क्षणहि राहतां परमीं[२६].’ ॥ २९
त्यातें श्रीदत्त म्हणे “जें तूं वदलासि, सत्य तें बा! गा! ।
दुःखाचें कारण ‘मम[२७]’, ‘न मम[२८]’ सुखाचें, नृपा! महाभागा! ॥ ३०
हें ज्ञान मत्प्रसादें[२९] झालें तुज, साधुवृंद या गातें; ।

---

१. व्रण. कारण नसून, कार्य झालें असें वर्णिल्यामुळें **विभावनालंकार.** २. विश्वाचा आदि. ३. सत्, चित् (ज्ञान) व आनंद, ब्रह्मरूप. ४. शरीर इत्यादि. ५. कळाहीन, निःसार. ६. अन्वय–एणें (या देहादिकानें) सकळ (सच्चिदानंदमय) [असा] मी विकळ न. अर्थः—माझें निर्विकार ब्रह्मस्वरूप देहादि निःसार गोष्टींनीं वास्तविक बदलूं शकत नाहीं. ७. देहबुद्धि, देहाचा गर्व. ८. दुःख. ९. शहाण्यास. १०. वेदना. ११. नीट विचार केला असतां. १२. प्राणी. १३. चांगलें न पाहणारे. उत्तरार्ध **सुभाषित** आहे. १४. मोठेपण. १५. समर्थ (बळवान्) आहेत बाहू ज्याचे अशा दत्ता! ‘समर्थ वाहा तें’ असा पाठभेद. १६. पुरुषाचें चित्त. ही गीति **सुभाषित.** १७. घरच्या कोंबड्यास. १८. मांजरानें. १९. प्रीतिशून्या अशा. २०. चिमणीस. २१. उंदरास. २२. आपले भक्त हें धन ज्याचें अशा! २३. मायेपासून. २४. विचार केला असतां. २५. निराळा. २६. श्रेष्ठ विचारांत, थोर विवेकांत. २७. ममता, माझें. २८. ममताहीनत्व, माझें नव्हे ही बुद्धि. हें अर्ध **सुभाषित** आहे. याचा अन्वय–महाभागा नृपा, दुःखाचें कारण मम, [व] सुखाचें [कारण] न मम [होय]. २९. माझ्या कृपेनें.

'मम' हा, [1]प्रत्ययशाल्मलितूळ उडविला सुदूर ज्या [2]वातें. ॥ ३१
[3]सत्संगशाणनिशितें [4]विद्याशस्त्रेंकरूनियां ज्यांहीं ।
[5]ममताद्रु तोडिला, बा! नाहीं भय या [6]भवीं तयां कांहीं. ॥ ३२
[7]अमता ममता त्यजितां [8]आत्मसुख प्राप्त होय, गा! राजा! ।
लाजति, [9]विरति, [10]निपट सुख द्याया नेणोनि [11]सोय, गारा ज्या. ॥ ३३
राजा! [12]भूतेंद्रियमय हें [13]स्थूळ न तूं, न मीहि, बा! समज. ॥
[14]क्षेत्रज्ञ [15]क्षेत्राहुनि [16]परं कथितों, बहु [17]अभीष्ट [18]दास मज. ॥ ३४
[19]झषजळ, [20]मशकोदुंबर, या एकत्वीं जसा [21]पृथग्भाव, ।
ऐसा [22]क्षेत्रात्म्याचा जाण, **अलर्का**! धरीं बरा [23]भाव." ॥ ३५
इत्यादि **दत्त** बोधी, [24]शोधी मन, कथुनि साधु योगातें; ।
शरणागतासि तारी, [25]कविवृंद उगेंचि काय हो! गातें? ॥ ३६
श्री**दत्त**ात्रेयातें नमुनि म्हणे तो **अलर्क** [26]राजवर, ।
'गुरुजी! मी उद्धरिलों, नरकीं होतों [27]निमग्न आजवर. ॥ ३७
झाला बरा पराभव, [28]कोशबळांच्या [29]क्षयें [30]परित्रास; ।
आला हा शरण तुज [31]त्रिजगत्पावनमहाचरित्रास. ॥ ३८

---

१. सत्यज्ञानरूपी सावरीचा कापूस. २. वाऱ्यानें. अन्वयः—प्रत्ययशाल्मलितूळ ज्या वातें सुदूर उडविला, [तो] हा मम (=ममता, देहादिकांचा अभिमान). ३. सत्संगतिरूप निसण्यावर घासलेल्यानें. ४. विद्यारूपी हत्यारानें. ५. ममतारूपी वृक्ष. ६. संसारांत. या गीतींत **रूपकालंकार** आहे. ही गीति **सुभाषित** आहे. ७. निंद्य, अमान्य. ८. आत्म्याचें सुख. या अर्धांत 'ता'ची आवृत्ति असल्यामुळें **यमक.** ९. विरघळतात. १०. अत्यंत. ११. जागा, अवसर. या अर्धांचा अन्वय—[लोकांस] निपट सुख द्याया [आत्मसुखापुढें] सोय नेणोनि, ज्या गारा, [त्या] [आत्मसुखास] लाजति [व] निपट विरति. आत्मसुखास गारा लाजून विरून जातात असें वर्णिल्यामुळें **उत्प्रेक्षा व प्रतीपालंकार.** १२. पंचभूतें व इंद्रियें यांचें बनलेलें. १३. देहादि दृश्य व जड वस्तू. १४ क्षेत्र जाणणारा, आत्मा. १५. शरीराहून. १६. श्रेष्ठ. यांत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. १७. आवडते, मान्य. १८. भक्त. १९. मासा व पाणी. २०. उंबराचें फळ व त्यांतील कीटक. २१. निराळेपणा. २२. क्षेत्र व आत्मा यांचा. २३. निष्ठा. २४. पवित्र करी. २५. संतांचा समुदाय. २६. राजांत श्रेष्ठ. २७. बुडालेला. २८. खजिना व सैन्य यांच्या. २९. नाशानें. ३०. अति दुःख. या अर्धांचा अन्वय—बरा पराभव झाला [व] कोशबळांच्या क्षयें बरा परित्रास [झाला]. पराभव चांगला नसून चांगला मानल्यामुळें **लेशालंकार.** प्रथम व द्वितीयचरणांत कार्यकारणभाव असल्यामुळें **काव्यलिंग.** ३१. तिन्ही लोकांस पवित्र करणारें श्रेष्ठ चरित्र ज्याचें त्यास.

उपकारी **का**शीश्वर, [1]अग्रज माझा **सु**बाहुही मोटा, ।
खोटा गमला [2]जाड्यें, त्वत्संगचि [3]लाभ, राज्य तो तोटा. ॥ ३९

[4]व्यसन बहु बरें तें, कीं आलों या [5]ज्ञानदा [6]पदापाशीं, ।
सांपडतों **का**ळाच्या, भोगाया [7]आपदा सदा, [8]पाशीं. ॥ ४०

स्वामी! [9]भवत्प्रसादज्वलनें अज्ञान सर्वही जळलें, ।
कळलें स्वहित, [10]नुमजतें, कीं मन बहु [11]विषयसेवनें मळलें. ॥ ४१

आतां बा! निजराज्य [12]प्रोज्ज्यश्रमतापकारण त्यजिन; ।
अजि न [13]व्यसनप्रद, तें हित सेविन; धन्य धरिन मी '[14]अजिन.' ॥ ४२

**द**त्त म्हणे, '[15]भव्य तुझें नित्य असो, योजिलें बरें बा! हें, ।
जा, राजा! हो [16]निर्मम, [17]निरहंकार, प्रसन्न मी आहें.' ॥ ४३

झालें ज्ञान [18]घडींतचि, लावुनि चरणांबुजां[19] शिरा ज्याच्या, ।
त्या गुरुसि नमुनि, गेला सत्वर [20]शिबिराशि **का**शिराजाच्या. ॥ ४४

भेटुनि [21]बंधुसमक्षचि **का**शिपतिस [22]विहितसंगकुत्स वदे, ।
'घे राज्य नृपा! हें, कीं अर्पुनि मम अग्रजासि [23]उत्सव दे.' ॥ ४५

**का**शिपति म्हणे, '[24]सहसा त्वां निजराज्य न उगेंचि सोडावें, ।
मोडावें न [25]क्षत्रियवृत्त, सुयश रण करूनि जोडावें.' ॥ ४६

स्मित करुनि **अ**लर्क म्हणे 'पूर्वीं माझें असेंचि मन होतें, ।
[26]सांप्रत [27]विरक्त झालें, [28]भरलें तें जेविं [29]रिचवलें पोतें. ॥ ४७

कारण **का**शिपते! मी कथितों, तें श्रवण तूं करीं साचें, ।
जो [30]प्राणिग्राम असे, एक [31]गुणत्रयचि मूळ हें याचें. ॥ ४८

---

१. वडील भाऊ. २. अज्ञानानें, मंदपणानें. ३. अन्यपाठः—लाग. यांत **परिसंख्यालंकार** आहे. ४. संकट. ५. ज्ञान देणाऱ्या. ६. पायापाशीं. व्यसनास बरें मानल्यामुळें या अर्थात **लेशालंकार.** ७. विपत्ति. ८. फासांत. ९. आपल्या कृपारूप अग्नीनें. १०. समजलें नसतें. ११. विषयांच्या उपभोगानें. १२. मोठा श्रम व दुःख यांचें कारण. १३. संकटांत घालणारें. १४. हरिणाजिन, मृगचर्म. १५. कल्याण. १६. ममताशून्य. १७. गर्वरहित. १८. घटकेंतच. १९. चरणकमलास. २०. सैन्याच्या तळावर. २१. भावासमोरच. २२. केली आहे संगाची (=जडवस्तूंसंबंधीं आसक्तीची) निंदा ज्यानें असा. २३. हर्ष. २४. एकाएकीं. २५. क्षत्रियाचें व्रत, रणशूराचा बाणा. २६. आतां. २७. वैराग्ययुक्त. २८. नव भरलेलें. २९. रिकामें झालें. यांत **उपमा** आहे. ३०. प्राण्यांचा समुदाय. ३१. तीन गुणच; सत्व, रज व तम हे तीन गुण.

स्वामी[1], मित्र, द्वेषी, भृत्य[2], असें तेधवां पहायाचें ।
कारण कांहींच नसे, केवळ अज्ञींच हें रहायाचें. ॥ ४९
तुजपासुनि मज झालें भय काशीशा! महोग्र[3] भेदानें, ।
शरण श्रीदत्तातें गेलों, होऊनि विकळ खेदानें. ॥ ५०
त्याच्या पदप्रसादें[4] गेलें अज्ञान सकळ विलयातें, ।
आत्मस्वरूप[5] कैसा तो ज्ञानादर्श[6] न कळविल यातें ? ॥ ५१
राजा! त्वच्छत्रु[7] न मी, मच्छत्रु न तूं, भयभ्रमा[8] झाला; ।
एक व्यापक आत्मा सर्वत्र प्रत्यया[9] असा आला.' ॥ ५२
ऐसें अलर्क वदतां, बहुतचि हर्षे सुबाहु तो आर्य; ।
उठुनि म्हणे, 'काशिपते! माझें सिद्धीस पावलें कार्य. ॥ ५३
झालों कृतार्थ, आतां जातों, हो तूं सदा सुखी, राया !
जाया आज्ञा दे; बहु हर्ष दिला, कार्य करुनियां, बा! या.' ॥ ५४
काशिपति म्हणे, "बापा ! सांग, मजकडे कशास आलास ? ।
निष्पन्न[10] अर्थ कोण? स्पष्ट वद, कसा कृतार्थ झालास ? ॥ ५५
वदलासि, 'मला साधुनि दे भोगितसे अलर्क मद्राज्या[11].' ।
तें जिंकूनि दिलें, घे, वांछित होतासि नित्य भद्रा[12] ज्या." ॥ ५६
ब्रह्मज्ञ सुबाहु म्हणे, 'राजा! माझा अलर्क हा भ्राता, ।
ख्याता[13] ज्ञानसुधेची[14] तटिनी[15] देवी मदालसा माता. ॥ ५७
त्या ग्राम्यभोगसक्ता[16] ब्रह्मज्ञानें घडावया मुक्ति, ।
वैराग्यार्थ[17] करविली, तुज योजुनि, हे पराभवा युक्ति. ॥ ५८
मातेनें कर्णीत ज्ञान दिलें, आननीं[18] जसें स्तन्य[19]; ।
धन्य तिघे सुत झालों, हा अज्ञचि राहिला जसा अन्य. ॥ ५९
राहुनि मदालसेच्या गर्भी, प्राशूनिही[20] तिचें दुग्ध, ।
न रहावा संसारीं साक्षात्[21] भ्राता अलर्क हा मुग्ध[22]. ॥ ६०

---

१. धनी. २.चाकर. या गीतीचा अन्वय—तेधवां (=तेव्हां, म्हणून) स्वामी [किंवा] भृत्य, मित्र [किंवा] द्वेषी असें पहावयाचें कांहींच कारण नसे; केवळ अज्ञींच हें रहावयाचें [आहे]. ३. फार भयंकर. ४. पायांच्या कृपेनें. ५. आत्म्याचें रूप. ६. ज्ञानरूपी आरसा. ७. तुझा शत्रु. ८. भीतीनें उपजणारा भ्रान्तिविकार. ९. अनुभवास. १०. प्राप्त. ११. माझ्या राज्यास. १२. कल्याणास. १३.प्रसिद्ध. १४.ज्ञानरूप अमृताची. १५.नदी. १६. हलक्या भोगांच्या ठिकाणीं गढून गेलेल्यास. १७. या अर्धाचा अन्वय—वैराग्यार्थ, तुज योजुनि पराभवा (=पराभवासाठीं) हे युक्ति करविली. १८. मुखांत. १९. अंगावरचें दूध. २०. पिऊन. २१. सख्खा, प्रत्यक्ष. २२. अज्ञान.

यास्तव उद्योग असा करवुनि, हें साधिलें [1]महाकार्य, ।
हे [2]पात्र ज्ञानातें गावूत तुझ्याहि कीर्तितें आर्य.' ॥ ६१
काशिपति म्हणे, 'घडत्ये ज्या ज्ञानें गति [3]परा, सुबाहो तें ! ।
सांग मजहि, अमृत उठवि [4]सत्वातें, [5]जें [6]परासु बा ! होतें. ॥ ६२
तूं साधु, [7]प्रणतजनीं सर्वींही त्वां दया करावि खरी; ।
तो उगवला [8]अमृतकर, सर्वत्रहि तो [9]दयाकरा [10]विखरी.' ॥ ६३
तो [11]ज्ञानी त्यासि म्हणे, "विश्वासें '[12]मम', '[13]अहं,' असा राया ! ।
त्वां प्रत्यय न करावा; [14]यांवरि सोडूनि दे [15]असारा यां. ॥ ६४
[16]वृत्तिरहित अभ्यासें हो; 'न स्वामी दुजा, न दास मज, ।
आपण एक विशुद्ध ब्रह्म' असें निश्चयें सदा समज." ॥ ६५
ऐसा उपदेश करुनि, हरुनि [17]भवभ्रम, सुबाहु साधु निघे, ।
[18]काशिप, अलर्कहि सुता दे राज्य, स्वपद, भव्य साधुनि घे. ॥ ६६
तो आपणासि पाहे [19]सावध, सर्वां जगा प्रमत्तातें, ।
प्रमुदित अलर्क होय [20]ब्रह्मानुभवें भजोनि दत्तातें. ॥ ६७
'हा ! हा ! केलें राज्य, [21]क्लेशद विषयांत सर्वदा रमलों; ।
श्रमलों व्यर्थ, 'परम सुख योगचि' हें [22]नुमजलों, बहु भ्रमलों. ॥ ६८
[23]करुणासुधासमुद्रा ! श्रीदत्ता ! [24]ब्रह्मवित्सभानाथा ! ।
माथा पदीं वहातां उद्धरिसि,' अलर्क [25]गाये हे [26]गाथा. ॥ ६९
राज्य सुतातें देवुनि गेला, ठेला [27]तपोनिधी रानीं, ।

---

१. मोठें काम. २. अन्वयः—हे ज्ञानातें पात्र (=ज्ञाननिधि) आर्य (=मान्य जन) तुझ्याहि कीर्तितें गावूत. ३. श्रेष्ठ. ४. प्राण्यातें. ५. जें सत्त्व, जो प्राणी. ६. मृत. या गीतींत **दृष्टान्तालंकार** आहे. अन्वय—बा, जें परासु होतें [त्या] सत्वातें अमृत उठवि (=जीवंत करी). ७. नम्रलोकीं, दासांवर. ८. चंद्र. ९. दयारूप किरणास. यांत **रूपकालंकार** आहे. १०. पसरी. ११. सुबाहु. १२. माझें. १३. मी. १४. यापुढें. १५. निःसत्वास. या ममकारास व अहंकारास. १६. निर्विकार, निवृत्तिपर. या गीतीचा अन्वय—अभ्यासें वृत्तिरहित हो [व] मज दुजा स्वामी न, [किंवा] दास न; आपण एक विशुद्ध ब्रह्म, असें निश्चयें सदा समज. १७. संसाराची भ्रांति. १८. काशिराजा. या आर्येचा अन्वय—काशिप [व] अलर्कहि [प्रत्येक आपापल्या] सुता राज्य दे [आणि] भव्य स्वपद (कल्याणकारक असें मुक्तिपद) साधुनि घे. १९. मोहरहित. २०. ब्रह्माच्या अनुभवानें. २१. दुःख देणाऱ्या विषयांत. २२. न समजलों. २३. कृपारूप अमृताच्या समुद्रा. २४. ब्रह्मज्ञाच्या सभेच्या स्वामी! ब्रह्मश्रेष्ठा! २५. गातो. २६. गीत. २७. तपाचा साठा, महान् तपस्वी.

पावे गति ते, वरिली जी [1]श्रुतिगीता तपोनि [2]धीरांनीं. ॥ ७०
पावे [3]सुबाहुबोधित, संग त्यागूनि, काशिराज गती; ।
झांकी विरक्ति, न तसी ज्याच्या [4]बहुभोगदा शिरा [5]जगती. ॥ ७१
श्रीम[6]द्गुरुपुत्रांहीं आज्ञा केली, निरोप पाठवुनी; ।
श्रीरामसुत मयूरें लिहिलें श्रीहरिह[7]रांघ्रि आठवुनी. ॥ ७२
श्रीहरिहरकीर्तितसी न [8]मुखमनांतुनि मदालसा जावी; ।
'साधुसभेंत' रसिक हो! प्रेमें ऐकुनि वदाल, '[9]सांजावी.' ॥ ७३
मूर्तिमती श्रीशंकरकरुणाचि मदालसा, असी अन्या ।
धन्या कोणालाही झाली नाहीं [10]महासती कन्या. ॥ ७४
हें [11]सच्चरित्र भावें गावें निःशेष ही [12]अघ सराया, ।
[13]उच्चपदीं [14]वेंघाया, तेथुनि [15]कल्पक्षयीं न घसराया. ॥ ७५

---

१. वेदांनीं वर्णिलेली. २. सज्जनांनीं. ३. सुबाहूनें गुरूपदेश केलेला. ४. भोग देणारी. ५. पृथ्वी. अन्वयः–विरक्ति त्याच्या शिरा झांकी, तसी बहु भोगदा जगती न [झांकी]. शिरा झांकणें=पुष्ट करणें. ६. सदाशिव व यज्ञेश्वर. मोरोपंत पन्हाळगडीं पाध्यांकडे विद्यार्जनार्थ सुमारें २३ वर्षांचे होईपर्यंत होते. पाध्यांचे चिरंजीव सदाशिव व यज्ञेश्वर यांच्या सांगण्यावरून प्रस्तुतचें काव्य पंतांनीं लिहिलें आहे. ब्रह्मोत्तरखंडही पंतांनीं सदाशिवाच्याच विनंतीवरून लिहिलें. ह्या गुरुपुत्रांचा पंतांनीं गंगावकिलींत असा उल्लेख केला आहेः– मद्गुरुपुत्र सदाशिव, यज्ञेश्वर, यांसि भेट, दे यश तें, । जें शुचि; निवविसि गंगे! तूंचि स्वजना अदेयदेयशतें. ॥ ७८ ॥ पन्हाळगडकर पाध्यांचा या संबंधापुरता दोन तीन पिढ्यांचा वंशवेल असा आहेः—




७. श्रीविष्णु व शंकर यांचे पाय. ८. तोंड व मन यांतून. ९. शोभावी. १०. मोठी पतिव्रता. ११. साधूंची कथा. १२. पाप. १३. मोक्षस्थानीं. १४. चढाया. १५. प्रलयकाळीं.

## ३. हरिश्चंद्राख्यान[1].

(गीतिवृत्त.)

### अध्याय पहिला.

श्रीमान गुणरत्नाकर[2] भूप हरिश्चंद्र भानुच्या[3] वंशीं, ।
ज्याची कीर्ति सुरनदीहुनि[4] एकींही[5] उणी[6] नसे अंशीं. ॥ १
तो सम्राट्[7] शूर वनीं गेला कुतुकें करावया मृगया, ।
दैवें[8] व्यसनभरीं मन भरतां, वोढूनि दूर ने मृग या. ॥ २
ऐके 'त्रायस्व'[9] असा करुण स्त्रीशब्द तो अरण्यांत, ।
हरिणातें त्यजुनि, म्हणे 'मा भैः'[10], प्रख्यात जो शरण्यांत[11]. ॥ ३
तोंचि 'त्रायस्व' अशा विद्यांच्या[12] ऐकतांचि हाकेला, ।
धांवे विघ्नेशें[13], म्हणे, 'हा! गाधिसुतें[14] अनर्थ हा केला. ॥ ४
सुरदुर्लभ[15] विद्यांतें झटतो स्वतपोबळेंचि साधाया; ।
कैसें काय करावें? मी तों असमर्थ यास बांधाया[16]. ॥ ५
याचि हरिश्चंद्राच्या म्यां हृदयाब्जीं शिरोनि, हा आर्य[17] ।
क्षुब्ध करावा, कोपें हें[18] नच पावेल सिद्धिला कार्य.' ॥ ६
ऐसें योजुनि शिरला विघ्नेश्वर नृपतिच्या हृदयभवनीं, ।
जें शुद्ध, सदय, सादर, सर्वार्तांच्या[19] सदैवही अवनीं[20]. ॥ ७
भूप म्हणे, 'स्त्रीपीडक माझ्या राज्यांत खळ असा कोण? ।
निबिडतमाचा[21] आश्रय[22], शून्यांतर्वास्तुचा[23] जसा कोण[24]. ॥ ८
सजला[25] शरीररक्तें मांसें गृध्रादिकांसि अर्पाया, ।

---

१. हें प्रकरण पंतांनीं मार्कंडेय पुराणांतील (अध्याय ७-८) हरिश्चंद्राख्यानाचे आधारें रचिलें आहे. २. सद्गुणांचा सागर. ३. सूर्याच्या. ४. गंगेहून. ५. एका रेसानें सुद्धां, लवमात्रही. ६. कमी, हलक्या दर्जाची. ७. सार्वभौम. ८. दैवानें संकटांत मन घालितां, दैवानें त्यावर कठिण प्रसंग आणण्याचा संकल्प करितांच. ९. रक्षण कर. १०. भिऊं नकोस. ११. रक्षण करणाऱ्यांत. १२. चौदा विद्या या गणपतीच्या पत्नी मानिल्या आहेत. १३. गणपती. १४. विश्वामित्रानें. १५. देवांनाही संपादण्याला कठिण, देवांनाही दुर्मिळ. १६. पीडा देण्याला. १७. हा साधुश्रेष्ठ विश्वामित्र. १८. विद्या संपादण्याचें कार्य. १९. सर्व दुःखितांच्या. २०. रक्षणांत; रक्षण करण्याच्या कामीं. २१. गर्द अंधाराचा, (पक्षीं) अत्यंत अज्ञानाचा. **श्लेष.** २२. ठाव, घर. २३. ज्यांत मनुष्याची वस्ती नाहीं अशा घराचा. २४. कोंपरा. २५. तयार झाला.

तर्पाया [1]स्वप्राणानिलदानें [2]क्षुधितमदिषुसर्पा या.' ॥ ९
नृपवचनें मुनि कोपे, तों विद्या त्यजुनि [3]वशिवरा गेल्या, ।
[4]संगें तशाचाही ज्या शुद्धा मानूनि अशिव रागेल्या. ॥ १०
[5]प्राकृत [6]भावुनि, धांवुनि जावुनि, नृप आश्रमांत जों पाहे, ।
तों आपणावरि श्रीगाधिज मुनिराज कोपला आहे. ॥ ११
पाहुनि [7]रक्त [8]मुनिनयनयुग, जेविं [9]द्रवविलें [10]शुचि [11]स्वर्ण, ।
नरपतिचें वपु कांपे, [12]अश्वत्थाचें जसें नवें पर्ण. ॥ १२
नमितां, '[13]तिष्ठ, [14]दुरात्मन्! तिष्ठ,' असें तो म्हणे, [15]दटावी, ती ।
वाणी न, गमे वीजचि '[16]मुनितनुकल्पांतघनघटा [17]वीती. ॥ १३
श्रीविश्वामित्रातें विनवी, जोडोनि कर, असें राजा, ।
'स्वामी! अपराध नव्हे, [18]वेदगुरुप्रोक्त धर्म हा [19]माजा. ॥ १४
द्यावें, युद्ध करावें, रक्षावें क्षत्रियें [20]महामहिम्या, ।
भगवंता! या तुमच्या तेजें कशि रक्षिली, पहा, [21]महि म्यां.' ॥ १५
विश्वामित्र म्हणे, 'रे! द्यावें कोणासि? कोण रक्षावें? ।
वद, जरि अधर्मभय तुज, कोण तुवां संगरांत लक्षावे?' ॥ १६
भूप म्हणे, 'जे ब्राह्मण, अन्यहि [22]क्लेशवृत्ति जे, तयां द्यावें, ।
भीत सकळ रक्षावे, [23]सदरातींशीं न संगरीं भ्यावें.' ॥ १७

---

१. आपल्या प्राणवायूचें दान देऊन. २. भुकेनें खवखवलेल्या माझ्या बाणरूपी सापाला. **परंपरितरूपक.** साप वायूवर निर्वाह करितात, या समजुतीवर येथें कविकटाक्ष आहे. सबंध गीतींत कारण प्रस्तुत असतां, कार्याच्या वर्णनानें तें केवळ सुचविलें आहे, म्हणून **अप्रस्तुतप्रशंसा.** ३. यतिश्रेष्ठाला, इंद्रियदमन करणाऱ्यांच्या शिरोमणीला. ४. अन्वयः—ज्या शुद्धा [विद्या] तशाचाही (त्या प्रकारच्या वशिवराचाही) संग (संगति) [तो रागाला वश झाल्यामुळें] अशिव (अपवित्र) मानूनि रागेल्या (रुसल्या). ५. साधारण मनुष्य. ६. मानून, समजून. ७. लाल. ८. ऋषींचे दोन डोळे. ९. वितळविलेलें. १०. चोख, स्वच्छ. ११. सोनें. १२. पिंपळाचें. कल्पनासादृश्यः—अश्वत्थपर्णसा तो मुनिवचनें दहनदेव कांपविला। (मोरोपंत, अश्वमेधपर्व, १।७९.) १३. ऊठ. १४. दुष्टा, हरामखोरा. १५. भय घाली, धमकी देई. १६. मुनीचा देह हीच प्रलयकाळची मेघमंडळी. येथें वाणीचा स्पष्ट निषेध करून, तिच्या ठिकाणीं अप्रस्तुत जी वीज तिची संभावना केली आहे, म्हणून हा **अपन्हुति** व **उत्प्रेक्षा,** यांचा संकर. १७. विते, प्रसवते. १८. वेद व गुरु यांनीं उपदेशिलेला. १९. माझा. २०. मोठ्या कीर्तीसाठीं, सुयशोर्थ. २१. पृथ्वी. २२. ज्यांचें निर्वाहाचें साधन तुटपुंजें आहे असे, याचक. २३. सज्जनांच्या शत्रूंबरोबर; दुष्ट, पापी लोकांबरोबर.

गाधिज म्हणे, ‘जरि असा राजा! तूं रक्षितोस धर्मातें; ।
दे इष्ट दक्षिणा, मी करणार [1]विवाहयज्ञकर्मातें.’ ॥ १८
या मुनिवचनें हर्षे भूप, [2]पुनर्जात आपणा मानी, ।
[3]हा निज ह्रदयांत म्हणे, ‘[4]चुकली, [5]होणार जी महाहानी.’ ॥ १९
राजा म्हणे, ‘[6]अदेयहि दिधलें, व्हावें [7]अशंक वद काय? ।
सर्वस्व, पुत्ररत्न, स्त्री किंवा स्वपुर, राज्यपद, [8]काय? ॥ २०
गाधिज म्हणे, ‘दिलें त्वां जें, हें म्यां घेतलें नृपा ! जाण, ।
परि [9]राजसूय केला, त्याची दे योग्य दक्षिणा, आण.’ ॥ २१
भूप म्हणे, ‘करिन तुझी मी, देउनि हेहि दक्षिणा, सेवा, ।
[10]इष्ट [11]प्रतिग्रह तुला, सांग, मदुक्तांत कोण तो? देवा!’ ॥ २२
मुनि बोले, ‘[12]किंबहुना? तूं [13]पुत्रकलत्रधर्मसह देहें ।
राहोनि निराळा, [14]भू, [15]सर्वस्व, स्वपुर, राज्य, मज दे हें.’ ॥ २३
ऋषिवचन श्रवण करुनि, हर्षे, कर [16]निर्विकारमुख जोडी, ।
राजा ‘दिलें’ म्हणे, तों [17]जों णों प्रेमाश्रु तेंचि [18]जळ सोडी. ॥ २४
विप्र म्हणे, ‘जरि दिधल्या या राज्यपदीं बसेन तापस मी, ।
[19]प्रभुता तरि कोणिकडे? वद, कीं [20]विषमीं वसे, न ताप [21]समीं.’ ॥ २५
भूप म्हणे, “[22]मुनिनाथा ! क्षिति न दिली तेधवांहि तूं स्वामी; ।
काय नवल, आतां तुज भूपतितें ‘प्रभु’ म्हणेन जरि बा! मी?” ॥ २६
गाधिज म्हणे, ‘जरि प्रभु मी, न मही त्वां कदापि [23]जोडावी; ।

---

१. विवाहादि संस्कारांना व यज्ञयागादि कार्यांना. २. आपला पुनर्जन्म झाला, असें समजे; आपल्या जीवावरचीच वारी टळली, असें मानी. ३. विश्वामित्र. राजाला सत्वापासून ढळविण्याची व आपली तपोहानि टाळण्याची आपली युक्ति साधली, असें विश्वामित्राला वाटून त्यालाही आनंद झाला. ४. टळली. ५. व्हावयाची होती अशी. ६. देण्यास कठिण किंवा अशक्य असें सुद्धां. ७. निर्भय, भीति किंवा संकोच न धरितां. ८. देह. ९. ‘राजसूय’ हे एका महायज्ञाचें नांव आहे. १०. योग्य, मनाला रुचणारा. ११. आदान, दक्षिणाग्रहण. ‘इष्ट प्रतिग्रह तुजला’–हा सर्वसंग्रहपाठ. १२. फार बोलण्यांत काय हंशील? थोडक्यांत. १३. मुलगा, बायको व धर्म (=क्षत्रियधर्म) यांसह. १४. पृथ्वी. १५. सर्व धन, दरोबस्त मालमत्ता. १६. ज्याच्या तोंडावर कांहींएक विकार(=दुःख, खेद वगैरे) नाहीं असा, तोंड वाईट न करणारा. १७. येथें **उत्प्रेक्षा** आहे. १८. दानसंकल्पसूचक पाणी. १९. राज्याधिकार, सत्ता, अंमल. २०. वांकड्या गोष्टींत, कुटिलतेंत. २१. सरळ गोष्टींत. चरमचरणांत **सुभाषित** आहे. २२. जेव्हां मीं तुला पृथ्वी दान दिली नव्हती, तेव्हांही तूं सर्वांचा धनीच होतास. पाठभेदः–सोमावी. २३. संपादावी.

तरि म[1]च्छासन जेथें, क्षिति ती त्वां आजि शीघ्र सोडावी.' ॥ २७
या व[2]चनवज्रपातें झाला निश्चेष्ट नृप मुहूर्तभरी; ।
मग पावुनि सं[3]ज्ञेतें, तो सुविवेकेंकरूनि धैर्य धरी. ॥ २८
नि[4]जवज्रकवच जो, तो जे[5]ळगत कुळगुरु वसिष्ठ जाणोनी, ।
राज्यत्याग करि, म[6]नीं क्रूरतर ब्रह्मशाप आणोनी. ॥ २९
घे वल्कलें, वपुवरुनि तो नृप वस्त्रें विभूषणें उतरी; ।
कीं निःस्[7]पृहताचि हि[8]ता काळीं वि[9]षमीं, न[10]दीं जसी सु[11]तरी. ॥ ३०
वंदुनि, निरोप मुनिचा, प[12]रमानुग्रह मनांत मानुनि, घे; ।
येउनि गृहांतुनि ससुतदार त[13]रणिवंशपद्मभानु निघे. ॥ ३१
तों त्या महीपतिपुढें प्रकटोन तपो[14]नंद क्षणामाजी, ।
'कोठें जातोस ?' म्हणे, 'ना[15]र्पून ज[16]पोन दक्षणा मां[17]जी.' ॥ ३२
नृपति म्हणे, 'निष्कं[18]टक राजश्री तुज समर्पिली बा ! हे; ।
अ[19]वशिष्ट शि[20]ष्टवर्या ! देह[21]त्रयमात्र राहिलें आहे.' ॥ ३३
मुनिवर म्हणे, 'सुशीला ! सर्वस्व दिलें जरी, तथापि क[22]वी ।
तूं देऊं केलें दे; दे[23]यं, न देतां, बहु व्य[24]था पि[25]कवी.' ॥ ३४
भूप म्हणे, 'बा ! नाहीं धन संप्रति, काय मी करूं आतां ? ।
मज दक्षिणार्पणीं बळ येइल स[26]मयांतरीं, तुला गा[27]तां.' ॥ ३५
विप्र म्हणे, 'दा[28]नावधि सांग खरा, यां[29] मुलासि[29] पाव[29] कसा[29], ।
वदतां असत्य, माझा शाप तुला करिल भस्म पा[30]वकसा.' ॥ ३६

---

१. माझा अधिकार. २. भाषणरूपी वज्राच्या तडाख्यानें. ३. शुद्धीला. ४. आपलें वज्राचें बनविलेलें चिलखत, आपलें अभेद्य चिलखत. ५. पाण्यांत किंवा वरुणगृहीं गेलेला. ६. स्मरून, आठवून. ७. निर्लोभता, निरिच्छपणा. ८. हितकर. ९. वांकड्या वेळीं, कठिण प्रसंगीं. १०. नदांत. **स**र्वसंग्रहपाठः—नदी. या गीतींत 'विषम' हा शब्द **श्लिष्ट** आहे, व त्याचा नदाशीं अन्वय करितांना 'तरून जाण्यास कठीण' असा अर्थ करावा. ११. चांगली होडी. हें गीत्यर्ध **सुभाषित** आहे. १२. अत्यंत कृपा, मोठी मेहेरबानी. १३. सूर्यवंशरूपी कमळाला [आनंदविणारा व फुलविणारा] सूर्य. **परंपरितरूपक.** १४. तपाचा मोठा प्रवाह, बडा तपस्वी. १५. न देऊन. १६. काळजीपूर्वक, आस्थेनें. १७. माझी. १८. निर्वैध, जीस शत्रू नाहीं अशी. १९. बाकी, शिल्लक. २०. महाजनश्रेष्ठा, पूज्यवरा ! २१. मी, बायको व मुलगा ही तिकलमात्र. २२. शाहाणा. २३. देऊं केलेलें. २४. दुःख. २५. उत्पन्न करितें, पसरितें. **अर्थान्तरन्यास.** २६. कालान्तरानें, कालक्रमानें. २७. तुझें स्मरण ठेविलें असतां, तुझ्याच प्रभावानें. २८. दान देण्याचा वायदा. २९. या बालकावर, तूं आपल्या दीन रोहिताश्वावर, कृपा कर. ३०. विस्तवाप्रमाणें.

राजा म्हणे, 'प्रभो ! ते देइन मी दक्षिणा तुला मासें,[1]' ।
विप्र म्हणे, 'जा, धन किति[2] ? द्यावीं कीर्त्यर्थ आपलीं मांसें.[3]' ॥ ३७
पायींच निघे, शिशुतें घेउनि, नृप, चालवीत राणीतें; ।
पाणी, तेंवि न मरणहि, जननयनीं व्यसन[4] जेविं आणी तें. ३८
'पळभरि तरि पाहों दे मुख,' म्हणति संशोक[5] लोक 'हाँ !' करिती;[6] ।
राहे उभा, तयांची करिल कसा तो दयालु हाक रिती[7] ? ॥ ३९
तों मुनि येउनि सहसा,[8] धिक्कार करुनि, म्हणे, 'रहातोस, ।
मंत्र करिशि पौरांशीं, राज्य दिलें घ्यावया पहातोस ? ॥ ४०
वद, रे ! जें दान दिलें, बुध हरिती काय पुनरपि तयातें ? ।
अवमानितोसि मज तूं, वृद्धपणीं जेविं कुनर[9] पितयातें.' ॥ ४१
नमुनि नृप म्हणे, 'जातों,' शैब्येतें[10] कर धरूनि आकर्षी,[11] ।
मुनि तीस दंड हाणी, 'हा' म्हणती नारदादि नाकर्षी[12]. ॥ ४२

---

## अध्याय दुसरा.

वाराणसीस गेला, कीं ती न मनुष्यनाथपरिभुक्ता[13]; ।
विश्वेशराजधानी सर्वांसि वसावयासि बहु युक्ता[14]. ॥ १
वाराणसीप्रवेशीं मुनि भेटे, त्यासि भूप तो वंदी, ।
बंदीसा[15] स्तवन करी, होय तदादेशशंभुचा[16] नंदी. ॥ २
अंजलि करुनि प्रार्थी, 'हा सुत, हे स्त्री, तसेचि हे प्राण, ।
घे, जेणें[17] कृत्य[17] तुझें[17]; वद अन्यहि कार्य, सत्य हें जाण.' ॥ ३
विश्वामित्र म्हणे, 'रे ! झाला, जो अवधि[18] मास, तो पूर्ण; ।
स्मरण असेल जरि तुला, तरि दे ती दक्षिणा मला तूर्ण[19].' ॥ ४

---

१. एक महिन्यानें, एका महिन्याच्या अंतीं. २. पैशाची ती पर्वा काय? **काव्यार्थापत्ति.** ३. अंगाचें मांस, शरीराचे कातडे. हें गीत्यर्ध **सुभाषित** आहे. ४. संकट. ५. दुःखानें गहिंवरलेले. ६. सर्वसंग्रहपाठः—हाकरिती. ७. निष्फळ, वांया. 'दयालु' हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें **परिकर.** ८. एकदम. ९. वाईट मनुष्य. १०. तारामतीला. ११. ओढी. १२. देवर्षी. येथें तारामतीला काठी मारिली व नारदादि 'हा' म्हणतात म्हणून **असंगति.** १३. कोणत्याही राजानें न भोगलेली, पृथ्वीपतीच्या सत्तेबाहेरील. १४. योग्य. १५. भाटाप्रमाणें. १६. त्याची आज्ञा हाच शंकर त्याचा. **परंपरितरूपक.** १७. ज्याशीं तुझें कर्तव्य असेल, जें तुला पाहिजे. १८. वायदा. १९. लौकर.

भूप म्हणे, '[1]मुनितिलका! [2]अम्लानतपोबळा! प्रभो! बा! गा!।
दिवसार्ध शेष आहे, तों मज अवकाश दे, महाभागा[3]!' ॥ ५
गाधिज म्हणे, 'बहु बरें; जातों; येतों फिरोनि; आजि मला,।
जरि दक्षिणा न देशिल, शापिन; मग मी नृपा! नव्हेचि भला.' ॥ ६
ऋषि जातां[4], भूप म्हणे, 'आतां कोठोनि वित्त [5]ओपावें?।
देऊं करुनि, न देतां, मजवरि मुनिचित्त कां न कोपावें?॥ ७
संपन्न[6] मित्र असतें, तरि येतें[7] संकटांत कामा तें;।
दैवें अहा! अकस्मात् त्यजिलें दुःखार्णवांत कां मातें?॥ ८
मरणचि उचित गमे, परि सद्वंशज[8] पुरुष उचित न क्लैब्या[9];।
हेही [10]बाळापत्या मजवांचुनि वांचती कशी शैब्या?॥ ९
मुनि शापील, [11]अतिक्रम करितां जात्युरग[12] तो न कां चावे?।
जावेचि प्राण, न हे चिंतापाशांत[13] पडुनि [14]कांचावे.॥ १०
सुब्राह्मणासि देऊं केलें जें, तें न [15]वारितां मेलों,।
केलों अकीर्तिनें पति, मी निःसंशय [16]अधोगतिस गेलों.॥ ११
अथवा प्रेष्यंचि[17] व्हावें; जैसें कोणी हया, [18]इभा विकिती,।
तैसा स्वविक्रय वरा; न कळे, मज गांजणार [19]भावि किती!'॥ १२
ऐसें बोलुनि राजा दीन [20]अधोमुख बसे, तया आर्या।
प्रार्थुनि[21] चिंतेंत, वदे यापरि शैब्या महासती भार्या.॥ १३
'राया! या संसारीं बुध, संरक्षावयासि सत्य, जिती[22];।
[23]सर्वस्व त्यजिती, परि सत्य स्वप्नींहि साधु न त्यजिती.॥ १४
[24]सत्यबहिष्कृत नर जो, पितृवन[25] सम [26]वर्जनीयता पावे;।

---

१. मुनिश्रेष्ठा! २. ज्याच्या तपाचें सामर्थ्य कधींही हीनत्व पावलें नाहीं अशा! ३. उदारा, ोर मनाच्या पुरुषा! ४. पाठ भेद:—जातो ५. द्यावें. ६. श्रीमन्त. ७. उपयोगीं पडतें. ८. कुलीन. ९. लंडीपणाला, नामर्दपणाला. **परिसंख्या** व **अप्रस्तुतप्रशंसा.** १०. लहान आहे मूल जिचें अशी. ११. उल्लंघन. १२. जातिवंत साप. **दृष्टान्त.** १३. चिंतेच्या फासांत. १४. करकचून जावें, जाचांत सांपडावें. १५. फेडतां, देतां. १६. अधःपतनास, नरकवासाला. १७. चाकर. १८. हत्तीला. १९. होणार, होष्यमाण, दैव. २०. खालीं मान घातलेला. २१. काळजींत पडलेला असतां. 'पाहुनि चिंतेंत' असा पाठ अधिक सरळ झाला असता. २२. वांचतात. २३. एकंदर मालमत्ता. या गीतींत सामान्य सांगून, विशेष सुचविल्यामुळें **अप्रस्तुतप्रशंसा. सुभाषित.** २४. सत्यानें वाळींत टाकलेला, सत्याचा ज्याला गंधही नाहीं असा. २५. स्मशानासारखा. २६. त्याज्यता.

पूर्वज सर्व निवावे[1] सत्यें, अनृतें[2]करूनि तापावे. ॥ १५
हयमेधसप्तका[3]सह ज्यास सविधि[4] राजसूयही घडला, ।
सत्यच्युत[5] कृतिरात[6] स्वर्गापासुनि तसाहि तो पडला. ॥ १६
झालें[7] अपत्य मजला,—' ऐसें बोलुनि रडावया लागे; ।
राजा म्हणे, "न भ्यावें, हा बाळ तुझा असे, महाभागे! ॥ १७
वद, जें वदावयाचें; निववाया, सूक्त आयकों, देहीं[8]; ।
या तापांतहि माझा त्वत्सूक्तिसुखेंचि काय कोंदे हा." ॥ १८
"झालें अपत्य मजला, इच्छुनि फळ हेंचि, करिति बुध भार्या; ।
म्हणुनि मज विकुनि, घेउनि धन, द्यावी दक्षिणा तया आर्या." ॥ १९
ऐसें राज्ञी वदतां, पावे तत्काळ भूप मोहातें[9], ।
परिसा[10], संज्ञा[11] पावुनि, साश्रु वदे जें म्हणोनि तो 'हा', तें. ॥ २०
"दयिते[12]! असें कसें गे! अश्राव्य[13], अवाच्य[14] वाक्य वदलीस? ।
कर्पूर जीस व्हावा, झाला गर[15] त्या तशाहि कंदलीस[16]? ॥ २१
कर्णीं, मुखीं, मनीं नच यावें; करवेल तें कसें कर्म? ।
नर्मस्मितसंल्लापस्मृति[17] नाहीं, कीं मला नसे धर्म?" ॥ २२
इत्यादि विलाप करुनि राजा मूर्च्छित पडे, करिल काय? ।
शैब्या रडे, विलोकुनि भूवरि संमंचका[18]वरिल काय[19]. ॥ २३
देवी म्हणे, "सखि! धरणि! कांत[20] पडुनि धूळिउपरि मळला गे! ।
त्या देहा लागावे रज[21], नवनव ज्यासि सुपरिमळ[22] लागे! ॥ २४

---

१. संतुष्ट व्हावें. २. असत्यानें. **अप्रस्तुतप्रशंसा. सुभाषित.** ३. सात अश्वमेधांसकट. ४. यथाविधि, शास्त्रोक्त. ५. सत्यापासून ढळलेला. ६. नहुष. **अप्रस्तुतप्रशंसा. सुभाषित.** ७. 'मला आतां मूल झालें आहे; व लोक प्रजोत्पत्तीकरितांच पत्नी करितात. तरी मी आतां आपल्याला निरुपयोगी आहें. तेव्हां मला विकावें व आपण त्या विक्रयधनानें ब्राह्मणऋणांतून मोकळें व्हावें' असें तारामती बोलणार होती. परंतु तिच्यानें तें बोलवेना व ती अर्धवटच वाक्य उच्चारून मध्येंच थबकली. हें वाक्य तारामतीनें पुढें १९ व्या गीतींत पुरें केलें आहे. ८. शरीराला. हें 'निववाया' याचें कर्म. सर्वसंग्रहाचा 'दे हा' असा पाठ असून, 'हा' वर 'बाळ' अशी टीप आहे. ९. मूर्च्छेला. १०. ऐका. ११. शुद्धी. १२. प्रिये! १३. श्रुतिकटु, न ऐकण्याजोगें. १४. बोलण्यास अयोग्य असें. १५. विष. १६. केळीला. केळीपासून कापूर उत्पन्न होतो असा समज आहे. या गीतींत **दृष्टान्त** व **विषम** हे अलंकार आहेत. १७. तुझा विनोद, मृदु हंसणें व मधुर संभाषण यांची आठवण. १८. उत्तम पलंगावरचा, सुंदर पलंगावर वावरणारा. १९. देह. **विषम.** २०. पति. २१. धूळीचे कण. २२. सुगंधि पदार्थ. **विषम.**

हे तद्दशा, [1]मणिकनकसदनीं जरि म्हणति बुध 'नको,' टिकवी; ।
बहु ज्यापासुनि पावत होते बहुमान सुधन कोटि [2]कवी." ॥ २५

करुनि बहु विलाप असे, जेविं हरिश्चंद्र, ती सतीहि पडे; ।
तों भोजन मागे शिशु, [3]शुष्कमुख, क्षुधित, रोहिताश्व रडे. ॥ २६

दैवें उठोनि राजा, राज्ञी, उघडोनि दृष्टि जों पाहे, ।
तों तो पुढेंचि मुनिवर मागाया दक्षिणा उभा आहे. ॥ २७

मुनिसि पहातां, त्रासें मूर्च्छा आली पुन्हाहि दोघांस; ।
[4]शापत्रास खवळवी [5]मोहास, जसाचि मेघ [6]ओघांस. ॥ २८

पाहुनि दीनावस्था, होउनि चित्तांत भीत, तो यांतें ।
मृदु वचनें बोध करी, उठवी [7]प्रोक्षूनि शीत तोयांतें. ॥ २९

[8]आप्यायित होय, जळ प्रोक्षी जेव्हां मुनींद्र तो हातें; ।
उठुनि हरिश्चंद्र पुन्हा पावे, पाहुनि तयासि, मोहातें. ॥ ३०

मुनि कोपोनि म्हणे, "रे! दे माझी दक्षिणा अगा! राया! ।
रक्षीं सत्या सद्गतिसत्कीर्तिसुखांचिया [9]अगारा या. ॥ ३१

[10]सत्यें हा रवि तपतो, सत्यें भूमि [11]प्रतिष्ठिता जाण, ।
सत्यांत [12]पुमर्थ सकळ, सत्यचि जीवासि [13]पवितनुत्राण, ॥ ३२

अथवा चुकलों मीच स्पष्ट, न तूं पात्र [14]नष्ट [15]सामास, ।
न वळे खळ, 'पळचि' म्हणे, जरि झाले [16]अर्थिकष्ट सा [17]मास. ॥ ३३

तुज मी [18]अलब्धदक्षिण, रवि मावळतांचि, निज यशा [19]पीनें ।

---

१. रत्नें व सोनें यांनीं बनविलेल्या वाड्यांत. २. गीतीचा अन्वयः—हे तद्दशा (=त्याची अवस्था), [जो] जरि बुध (=शाहाणे लोक) 'नको' म्हणति [तरि, आग्रहानें त्यांना] मणिकनकसदनीं टिकवी (=राहवी, नांदवी), [व] ज्यापासुनि बहु कोटि कवी बहुमान [व] बहुधन पावत (=लाभत) होते. **विषम.** ३. सुकलें आहे तोंड ज्याचें असा. ४. शापाचें भय. ५. मूर्च्छेनेला, घेरीला. ६. जलप्रवाहांस, ओढ्यांस. ७. शिंपून. ८. ताजातवाना. ९. मोक्ष, कीर्ति व सुख यांचें माहेर अशा. हा 'सत्या' शब्दाचा उद्देश. १०. **अप्रस्तुतप्रशंसा. सुभाषित.** ११. स्थिर केलेली, सांवरलेली. १२. पुरुषार्थ; धर्म, अर्थ, काम व मोक्ष. १३. वज्रकवच, अभेद्य चिलखत, आत्मरक्षणाचें साधन. १४. दुष्ट. १५. सामोपचारास. १६. याचकाला होणारे सायास, भिक्षुकाचे श्रम. १७. सहा महिने. **काव्यलिंग.** उत्तरार्धांत **सुभाषित.** १८. ज्याला दक्षिणा लाभली नाहीं असा. १९. पुष्ट, विस्तृत.

करिन, [१]सुतप्त तपाचा व्हाया विश्वांत विजय, [२]शापीन." ॥ ३४
गेला यापरि **गाधिज** [३]आधिजलधिमाजि भूप बुडवून, ।
ने [४]शापभीतिवात्या [५]तद्धैर्यतृणासि दूर उडवून. ॥ ३५
[६]शैब्या म्हणे, "विनविलें जें, सुखवाया बुधा, करा हो! तें; ।
[७]सत्यप्रतिपालनभव सुयश [८]व्रीडद [९]सुधाकरा होतें. ॥ ३६
[१०]प्रभुनें नरकीं मजसह तुज म्हणवाया [११]न 'हाय' शापावें; ।
रक्षीं स्वपूर्वजांच्या [१२]अतुला, शुद्धा, महायशा; [१३]पावें." ॥ ३७
भूप म्हणे, "सति ! जातों निर्लज्ज, कृतघ्न, तुज विकायाला, ।
राक्षस, पिशाच येतिल मजपाशीं [१४]कठिणपण शिकायाला. ॥ ३८
वाटे, [१५]नेईल मज, 'घ्या स्त्री' म्हणतां, हाचि बोल विलयातें; ।
[१६]अथवा खळविधिबळ, कीं त्या प्रभुचें तेज, बोलविल या तें." ॥ ३९
यापरि बोलुनि, जाय गोविश्वेश्वरपुरींत सत्वर हा, ।
[१७]ज्यांच्या प्राणांसि म्हणे दुःख, 'निघा, प्रतिपदीं ससत्व रहा.' ॥ ४०
वदतां बहु गंहिवरला [१८]महिवर लाजे, म्हणे, 'सुधीर मला ।
हंसतिल; धैर्य धरावें, कीं [१९]सत्वीं सर्वही सुधी रमला.' ॥ ४१
मोठ्यानें भूप म्हणे, "पुरजन हो ! वचन आयका माजें, ।

---

१. चांगल्या प्रकारें (=मोठे कष्ट सहून) तपलेल्या. २. याचें कर्म 'तुज'–गीतीचा **अन्वयः**—अलब्धदक्षिण मी, रवि मावळतांचि, निज यशा पीन करिन [व] सुतप्त तपाचा विश्वांत **विजय** व्हाया तुज शापीन. ३. चिंतेच्या सागरांत. ४. शापाचें भय हीच वाहुटळ. ५. **त्याचें** धैर्य हेंच गवत त्यास. **परंपरितरूपक.** ६. अन्वय–शैब्या म्हणे, हो! [मीं] जें विनविलें, तें बुधा सुखवाया (=शाहण्यांस संतुष्ट करण्यासाठीं) करा. ७. सत्याच्या रक्षणापासून उद्भव**णारें**. ८. लाजविणारें. ९. चंद्राला. या गीतींत **अर्थान्तरन्यास** अलंकार असून, उत्तरार्धांत **प्रतीप** आहे. उत्तरार्ध **सुभाषित** आहे. १०. आपला स्वामी जो ब्राह्मण त्यानें. ११. **याच्या** संबंध 'शापावें' कडे. १२. निरुपम अशा. १३. कृपा कर, प्रसन्न हो. १४. **निर्दयता. प्रतीप.** १५. नष्ट करील, नाशाप्रत नेईल. १६. अन्वयः–अथवा तें (=सुप्रसिद्ध) खळविधि**बळ** (=दुष्ट दैवाचें साहाय्य) कीं (किंवा) तें (=तें प्रसिद्ध असें) त्या प्रभुचें (=त्या ब्राम्हणाचें) तेज **या** [मला] बोलवील. १७. अन्वयः–ज्याच्या प्राणांसि दुःख म्हणे, 'निघा (=बाहेर निघून **जा**) [किंवा] ससत्व (=सत्व न सोडतां; सत्य, धर्म वगैरेंची हेळसांड न करितां) प्रतिपदीं **रहा.** 'सुसत्व' व 'प्राणासि' असे पाठभेद. १८. पृथ्वीपति, राजा. १९. सत्य, कर्तव्य, **धर्म,** इत्यादिकांच्या रक्षणांत. हा चरण **सुभाषित** आहे. **अर्थान्तरन्यास.**

'कोण[1]' असें पुसतां, तरि पुशिजे येईल काय कामा जें. ॥ ४२
स्पष्ट नृशंस[2], अमानुष[3], राक्षस, त्यांहूनि पापतर[4] आहें; ।
स्त्रीतें धनार्थ विकितों, जो मी न मरें, हिताहित न पाहें. ॥ ४३
ज्या कोणाला दासी व्हावी कार्यें करावया गेहीं, ।
तो येउनि वेंचो हे, जोंवरि आहेत मंदसु[5] या देहीं " ॥ ४४
ऐसें ऐकुनि, आला वृद्ध ब्राम्हण म्हणे, "गृहीं कार्या ।
न शके करावया बहु सुकुमारी मम मनःप्रिया[6] भार्या. ॥ ४५
व्हावी मज दासी;" हें वदुनि धन उदंड[7] दे, करी संवदा[8], ।
हर! हर! दुष्कर तो स्त्रीविक्रय असुविक्रयापरीस[9] वदा. ॥ ४६
न वदे, न करि कर पुढें, होय हरिश्चंद्र शोकहतचित्त[10], ।
तद्वल्कलांचलीं[11] तो बांधी आपणचि भूमिसुर[12] वित्त. ॥ ४७
मग 'चाल, चाल,' म्हणतां, सोडुनि पतिपुत्र न निघतां क्षिप्रं[13], ।
केश धरुनि राज्ञीतें स्वगृहा वोढीत चालवी विप्र. ॥ ४८
विप्रें ओढुनि नेतां, शिशु शोकें म्हणुनि 'अंब[14]! अंब[14]!' रडे, ।
झोंबे वस्त्रासि, मनीं फोडी ती मायगाय हंबरडे. ॥ ४९
राज्ञी विप्रासि म्हणे, 'बापा! पळमात्र, सोड, राहों दे; ।
मग मज दुर्लभ होइल शिशुचें मुख; पोटं[15] भरुनि[15] पाहों[15] दे.' ॥ ५०
शैब्या पुसोनि नेत्रें, पाहे परतोनि रोहिताश्वास; ।
अत्युष्ण दीर्घ सोडी, तो[16] पतिला[16] होय[16] मोहित[16] श्वास[16]. ॥ ५१
'ये, बा! दूरुनिच पहा; राजसुता! आंतळें[17] न आंगातें, ।
झालें दासी मी कीं; नातें पहिलेंच धरिसि कां गा! तें?' ॥ ५२

---

१. अन्वयः—[जरि तुह्मीं मला] 'तूं कोण' असें पुसतां, तरि [मी म्हणतों कीं] जें काय (=जें कांहीं) कामा येईल (=उपयोगी पडेल, अवश्य असेल) [तेंच] पुशिजे (=पुसावें, पुशिलें जावें). मी कोण, कुठला वगैरे भाकड प्रश्नांत कांहीं अर्थ नाहीं, हा हरिश्चंद्राचा भाव. २. दुष्ट. ३. माणुसकी ज्यास नाहीं असा. ४. अधिक पापी किंवा दुष्ट. ५. माझे प्राण. जोंवरि मदसु या देहीं आहेत=जोंपर्यंत या माझ्या कुडींत प्राण आहे. ६. आवडती. ७. पुष्कळ. ८. खरेदी, व्यवहार. ९. स्वतःच्या प्राणाच्या विक्रीपेक्षां. **व्यतिरेक.** १०. शोकानें व्याकुळ आहे अंतरंग ज्याचें असा. ११. त्याच्या वल्कलाच्या पदरीं. १२. ब्राह्मण. १३. लौकर. १४. आई! आई! १५. ही **लोकोक्ति** आहे. १६. तो उसासा नवऱ्याला घेरी आणिता झाला. येथें दीर्घ व उष्ण सुस्कारा टाकितो एक, बेशुद्ध पडतो दुसराच, असा वर्णनप्रकार असल्यामुळें **असंगति.** १७. शिवूं.

द्विज केश धरुनि ओढी, ओढी तो शिशुहि वस्त्र कवळून; । 
[1]खवळून पदें हाणी विप्र, परि नव्हेचि दूर जवळून. ॥ ५३
जरि ताडिला, तरिहि तो 'अंबांब!' म्हणून शिशु मिठी घाली, । 
न्हाली [2]घर्माश्रुजळें, वंदुनि विप्रास विनविती झाली. ॥ ५४
'बा! घेतली जशी हे मी दासी, हाहि बाळ घे दास; । 
तव [3]कार्यसाधिका कसि? जरि या होईन पात्र खेदास. ॥ ५५
गाईशीं वत्स जसा, [4]मजशीं हा शिशु तसा करीं युक्त; । 
बापा! प्रसन्न हो, या दासीचें हेंचि [5]चालवीं उक्त.' ॥ ५६
द्विज तो, त्याहि शिशूचें जें झालें मूल्य [6]धर्मशास्त्रमतें, । 
बांधोनि नृपतिला दे घेऊनि [7]तदुत्तरीय वल्कल तें. ॥ ५७
विप्रें केली, [8]ज्याची [9]व्हावी धनदासही खरेदी न; । 
विधि[10] फिरतां, होती, जे [11]प्रभुचे जन [11]दासही, खरे दीन. ॥ ५८
स्त्रीसुत घेउनि गेला द्विज झाला जेधवां दिसेनासा, । 
नृप रडुनि म्हणे, '[12]मज हे [12]अद्यापि [12]तशीच कीं दिसे [12]नासा. ॥ ५९
रविनें न निरखिली जे, स्पर्शलि वातें [13]विशंक न [14]व्यजनें, । 
अवलोकिली [15]पुरीं [16]ती ओढुनि नेतां असंख्य [17]नव्य जनें. ॥ ६०
ज्यावरि करीत होत्या बहुतचि दाया दया सदा, [18]सत्त्व । 
जीचें [19]साध्वीशतमत, [20]तीचा [20]दायाद [20]यांस दासत्व! ॥ ६१
[21]एकें [21]म्यांचि कृतघ्नें बुडविलि दुःखार्णवांत [22]मज्जाया, । 

---

१. संतप्त होऊन. २. घाम व आसवें यांच्या पाण्यानें. ३. कामकाज आटोपणारी, घरकाज पाहणारी. ४. माझा व या मुलाचा सहवास असूं दे, आम्हांस एकत्र राहूं दे. ५. विनंति मान्य कर. ६. धर्म व शास्त्र यांच्या नियमांनीं. ७. त्याच्या अंगावरील वल्कल, त्यानें उपरण्यासारखें घेतलेलें वल्कल. उत्तरीय=वरील वस्त्र, उपरणें. ८. रोहिदासाची. ९. कुबेरालासुद्धां. **विरोध.** १०. दैव. ११. देवाचे भक्तसुद्धां. या गीतींत **अर्थान्तरन्यास** आहे. १२. अजून माझें नाक नेहमींप्रमाणें मला दिसतेंच आहे, मी अजून जीवंतच आहें. मरणोन्मुख झालेल्या मनुष्यास स्वतःच्या नाकाची बोंडी दिसत नाहीं, या लौकिक समजुतीस अनुलक्षून हें वर्णन आहे. या गीतींत **विशेषोक्ति** आहे. १३. निर्भय. १४. पंख्यानें. १५. शहरांत. १६. शैब्या, तारामती. १७. परक्या. या गीतींत **विषम** आहे. १८. पवित्र आचरण. १९. शेकडों साध्वींना (=पतिव्रतांना) मान्य. २०. त्या तारामतीच्या पुत्राला. **विषम.** २१. या गीतींत **परिसंख्या** आहे. २२. माझी पत्नी.

केलें नच साध्वीनें, नच त्या शिशुनेंहि पाप मज्जाया[1]. ॥ ६२
सति! विकुनि घेतलें त्वां, गुर्वर्थ[2] तुवांहि बा! शिशो! भावें[3]; ।
जेंवि[4] यशें, मुक्तांचा तेविं न वाहोनि राशि शोभावें. ॥ ६३
धिक्कार मला! कष्टीं सुकलत्र[5], तसेंचि लोटिलें मुल तें; ।
शतकोटिसारघटितचि[6] हें माझें हृदय, अन्यथा उलतें[7]. ॥ ६४
हा! सति! हासतिरस्कृतचद्रे[8]! तुज विकुनिही न घामेलों[9]; ।
हा! तनय! हांतनय[10] मी जोडुनिहि न या महा अंघा[11] मेलों.' ॥ ६५
ऐसे विलाप करितां, गाधिज येऊन दक्षिणा मागे; ।
फिरफिरुनि येरझारा करि, परि भगवान् न लेशही भागे. ॥ ६६
सुतदारविक्रयार्जित[12] धन जें, दे त्यास भूप पद नमुनी; ।
अल्प म्हणुनि बहु कोपे, कठिण वदे 'दुर्निरीक्ष्यवदन[13] मुनी. ॥ ६७
'अधमा! योग्य अशा या इतुक्याशा दक्षिणेसि तापस हा? ।
पात्रापात्र न करिशी, तरि लेश पहा प्रताप[14], तांप सहा.' ॥ ६८
कांपे भूप, म्हणे, 'बा! अन्या देईन दक्षिणा, आर्या! ।
भार्यासुत विकुनि दिलें हें धन, अवकाश दे मला कार्या.' ॥ ६९
विश्वामित्र म्हणे, 'अवकाश दिन[15] चतुर्थभाग दिधलाहे; ।
समज स्पष्ट ब्रह्मक्षोभें[16] जन ताप नैकविधं[17] लाहे.' ॥ ७०
जाय हरिश्चंद्रातें यापरि मुनिराज तो दटाऊन[18], ।

---

१. बुडण्याला. २. बापासाठीं. ३. मोठ्या भक्तीनें, निष्ठेनें. ४. अन्वयः–जेविं यशें शोभावें (=शोभा यावी), तेविं मुक्तांचा (=मोत्यांचा) राशि (=भारा) [अंगावर] वाहून (घालून, लेवून) न शोभावें. या गीतींत **अर्थान्तरन्यास** आहे. उत्तरार्ध **सुभाषित.** ५. चांगली पत्नी. ६. वज्रांच्या सत्वानें बनविलेलेंच, वज्रमयच. ७. तडकतें, ताड्कन् फुटतें. **अनुमान.** ८. हंसण्यानें (=हास्याच्या शुभ्र प्रभेनें) धिक्कारिला आहे चंद्र जिनें, अशा! **प्रतीप.** 'हा सति! हासति (रस्कृत०)' हें **यमक.** ९. घामानें डबडबलों, विटलों. १०. त्यक्तनय, अनीतिमान्. **यमक.** ११. पापाला. या गीतीच्या दोन्ही अर्धांत कार्यक्षम कारणें असूनही कार्योत्पत्ति झाली नाहीं, असें वर्णन असल्यामुळें **विशेषोक्ति.** १२. बायको व मुलगा यांच्या विक्रीनें कमावलेलें. १३. ज्याच्या तोंडाकडे पाहवत नाहीं असा. दुर्निरीक्ष्य=मोठ्या कष्टानें पाहण्याजोगें. १४. सर्वसंग्रहपाठः–प्रतापताप. १५. एक प्रहर. १६. ब्राह्मणाच्या कोपानें. १७. नाना परींचा. उत्तरार्धांत **अप्रस्तुतप्रशंसा. सुभाषित.** १८. धमकावून.

ज्या विघ्नस्मरण तसें, जेविं तपनकांतगिरितटा ऊन. ॥ ७१
भूप मनांत म्हणे, 'जें दयितेतें[2] सूनुतें[3] विकायातें[4] ।
केलें धैर्य, करावें म्यां आपुलियाहि तेविं काया तें. ॥ ७२
मज, दक्षिणा न देतां, नेइल शापूनि यावरि लयातें ।
प्रभु हा; प्रसन्न, आज्ञा[5] न करूनि[5], कवण कृती[6] करिल यातें?' ॥ ७३
करुनि विचार असा, तो साधु करायासि पावला विकरा[7]; ।
'घ्या मज कोणी' ऐसें पौरांच्या स्पष्ट ऐकवी निकरा[8]. ॥ ७४
ऐसी संसाराची होतां दैवेंकरूनि बंडाळ, ।
ये विकत हरिश्चंद्रप्रभुला घ्यायासि उग्र[10] चंडाळ[11]. ॥ ७५
चांडाळरूप धर्म[12]प्रभु, परि समजे न तत्त्व[13] भूपा तें; ।
'कोण' असें त्यासि पुसे, बहु कंटाळूनि[14] तदुग्र रूपातें[14]. ॥ ७६
सांगे, "मृतकंबलहर[15] मी चांडाल, 'प्रवीर' या नावें; ।
घेतों विकत तुज धनें स्वल्पें विपुलेंहि, सत्य मानावें." ॥ ७७
भूपति म्हणे, 'करीं ना मी हें[16] चांडालदासतापाप[16]; ।
जा परतोनि, शतगुणें[17] याहूनि बरा महर्षिचा शाप.' ॥ ७८
ऐसें नृपति वदे, तों ये मुनि, कोपोनि लोचनें फिरवी, ।
विरवी[18] मनहि नृपाचें ऐसें अत्युग्र तेज तो मिरवी. ॥ ७९
नृपतिस म्हणे, "विपुल धन देतो चंडाल हा, तद्दान[19] ।
कां न करिसि? म्हणतें[20] मन तुज 'करं, दंडा लहा, तदा दान?' ॥ ८०

---

१. अन्वयः—ज्या [मुनिराजा] विघ्नस्मरण तसें [तेज आणणारें, चेव आणणारें], जेविं (=जसें) तपनकांतगिरितटा (=सूर्यकांतमण्याच्या डोंगराच्या कड्याला) ऊन. सूर्यप्रकाशांत सूर्यकांताला चेव येऊन, तो जसा ज्वाळा ओकूं लागतो, तसा विश्वामित्रालाही छळ करण्याचें स्मरण होऊन, तो चेवला व दुःशब्द ओकूं लागला—हा भाव. विश्वामित्राच्या वर्तनाचें द्वितीयार्धांत कारण दर्शविल्यामुळें **काव्यलिंग.** २. प्रिय पत्नीला. ३. मुलाला. ४. शरीराला. ५. आज्ञा न पाहून, हुकुमाचें उल्लंघन करून. ६. कर्तृत्वी पुरुष, कसबी, चतुर. ७. विक्री. ८. नागरिकांच्या समूहाला. ९. वाताहत. १०. भयंकर, अक्राळविक्राळ. ११. मांग. १२. यम. १३. वर्म, गुप्त गोष्ट, गूज. १४. त्याच्या विक्राळ चेहऱ्याचा किळस येऊन. १५. प्रेतावरील कांबळें (किंवा इतर वस्त्र) घेणारा. १६. सर्वसंग्रहपाठः—हे चांडालदासता पाप. १७. शेंकडोंपटींनी. १८. वितळवी. १९. त्या धनाचा स्वीकार. २०. अन्वयः—'दंडा लहा, तदा दान करं' [असें] [तुझें] मन तुज [कां] म्हणतें? अर्थ—'जेव्हां चांगली अद्दल घडेल, तेव्हांच कबूल केलेलें देणें दे' असें तुझी बुद्धि तुला कां सांगते?

भूप म्हणे, 'भगवंता! केवळ [1]ठेवूनि दृष्टि वित्तांत, ।
[3]येईल [2]रविकुलजाच्या कैसें चांडालदास्य [3]चित्तांत?' ॥ ८१
विप्र म्हणे, 'धन, घेउनि यापासूनि स्वविक्रयें, जरि न ।
क्षिप्र मला देशिल, तरि शापुनि तुज आजि भस्म मी करिन.' ॥ ८२
पाय धरुनि राय म्हणे, 'हाय! कसें मायबाप हें वदशी? ।
दास्यार्थ तूंचि मज घे, स्वीकारी चंद्र काय गा! न [4]दशी? ॥ ८३
[5]धनशेषें दास तुझा झालों मी; हो प्रसन्न [6]भूदेवा! ।
दे [7]वात्सल्यें शरणागत दीना अभयदान, घे सेवा.' ॥ ८४
विश्वामित्र म्हणे, 'तूं जरि माझा दास, तरि तुज स्वामी ।
या चांडाळा देतों, घेउनि [8]वित्तार्बुद, स्वयें हा मी.' ॥ ८५
ऐसें वदतां राजा जरि नमुनि वदे, '[9]नको कडकडों, बा!' ।
तरि अर्बुद धन घे, दे त्यास, म्हणे, 'दास ने [10]कंडक, [11]डोंबा!' ॥ ८६
बांधुनि, ताडुनि, ओढुनि, नेति, न देउनि रडों पडों बकरें; ।
तैसेंचि ने नृपातें, [12]दंडें उगारूनि, उग्र डोंब करें. ॥ ८७
स्वस्थानातें नेला बांधुनि [13]पति [13]भूमिचा [14]करकरून, ।
तो स्थापिला स्मशानीं सांगुनि अधिकार, चाकर करून. ॥ ८८

---

## अध्याय तिसरा.

राजा वसे स्मशानीं, घे [15]शवकर, [16]विधिपुढें उपाय नसे; ।
[17]जेथें [18]परासु नेती बहु काळा अर्पिले [19]उपायनसे. ॥ १
'हा! हा!' असें, स्मरोनि स्त्रीसुत, [20]साकेत, सचिव, पौर, वदे; ।
तो [21]पितृवनवास तया दुःसहतर ताप, जेविं [22]रौरवें, दे. ॥ २

---

१. द्रव्यावर नजर ठेवून, द्रव्यदृष्टि बनून. २. सूर्यकुळांत जन्मलेल्याच्या. ३. मनास येईल, आवडेल, रुचेल. ४. वस्त्राची झिरमिळी. शुद्ध बीजेला चंद्रदर्शन घेऊन भाविक लोक त्याला अंगावरील वस्त्राची दशी दान करितात, या गोष्टीवर कवीचें लक्ष्य आहे. **दृष्टान्त.** पूर्वार्धांत **अश्वधाटी यमक** आहे. ५. दक्षिणेची जी बाकी राहिली आहे तिनें. ६. ब्राह्मणा. ७. प्रेमानें. ८. दहा हजार नाणीं. ९. कहर करूं नको, गहजब करूं नको. १०. तडक. ११. चांडाळा! १२. सोटा. १३. राजा. १४. गच्च. या गीतींत **विषम** आहे. १५. प्रेत जाळण्याबद्दलची पट्टी. १६. दैवापुढें. **अर्थान्तरन्यास.** १७. ज्या स्मशानांत. १८. मेलेले. १९. नजराण्यासारखे. २०. अयोध्या. २१. स्मशानांतील रहिवास. २२. नरक.

झाला तदा पितृवनीं [१]धूमभसितधारणें मलिन [२]काय, ।
होय हरिश्चंद्र प्रभु **वेद**, [३]विपत्काल तो **कलि** न काय? ॥ ३
होउनि [४]पुल्कसदास [५]द्वादश मास [६]क्षितीश तो राहे; ।
पाहे स्वप्न तयावरि, तें हें संक्षिप्त वर्णिलें आहे. ॥ ४
शवमूल्याकरितां तो नरवर [७]पितृकाननीं बहु भ्रमला; ।
वे [८]झोंपें [९]झोंपडींत स्त्रीसुतचिंतेंकरूनिहि श्रमला, ॥ ५
पाहे स्वप्न असें कीं, “गुरुला गुरुदक्षिणा दिली कांहीं, ।
परि ती, होउनि हर्षें रोमांचित, [१०]संविधि अर्पिली नाहीं. ॥ ६
त्या दोषें आयुःक्षय होतां आपण [११]महागदें मेलों; ।
गर्भांत [१२]पुल्कसीच्या भोगाया नरकयातना गेलों. ॥ ७
तेथुनि सुटतां, [१३]जाया [१३]दुष्कृत, पावावयासि [१४]शर्मातें, ।
होइन गुरुदेवचरणशरणागत, मी करीन धर्मातें. ॥ ८
होतां [१५]निर्गम त्या [१६]अनुतापाचा विसर तत्क्षणीं पडला; ।
[१७]शवमूल्यग्रहणाचा लोभ शिशुपणींच मानसीं जडला. ॥ ९
[१८]सप्तम वर्षीं वसतां प्रेतस्थानीं [१९]स्ववृत्ति पाळाया, ।
शव आणिलें [२०]अंधनगुणिविप्राचें पितृवनांत जाळाया. ॥ १०
शवमूल्यास्तव केला बहु [२१]दाहनिरोध, म्हणुनि तापाला ।
पावुनि, देते झाले क्रुद्ध द्विज [२२]नरकहेतु शापाला. ॥ ११
तत्काळचि **काळाच्या** दूतांनीं आंवळून पाशांनीं, ।
पीडुनि आपणाला नेलें, मीनास जेविं [२३]दाशांनीं. ॥ १२
सकळ नरक शत वर्षें भोगविले, [२४]पापयोनि मग नाना, ।
पाहे, हें श्रोत्यांच्या [२५]तद्विस्तर तापवील बहु काना. ॥ १३

१. धूर व राख हीं लागल्यामुळें. २. देह. **विषम.** ३. संकटकाळ. **परंपरितरूपक.** ४. चांडाळाचा नोकर. ५. बारा. ६. राजा. ७. प्रेतावरील करासाठीं. ८. स्मशानांत. ९. **यमक.** १०. यथाशास्त्र, योग्यसंस्कारपूर्वक. ११. महाव्याधीनें १२. मांगिणीच्या. १३. पाप निरसावें म्हणून. १४. सुखाला. १५. गर्भवासांतून सुटका, जन्म. १६. पश्चात्तापाचा. १७. प्रेतावरील कर घेण्याचा. १८. सातव्या. १९. आपला धंदा. २०. दरिद्री परंतु गुणवान् ब्राह्मणाचें. २१. दहनाला अटकाव, जाळण्याला हरकत. २२. नरकवासाचें कारण. हा ‘शापाला’ या शब्दाचा उद्देश. २३. धीवरांनीं, कोळ्यांनीं. २४. नीच जन्म. २५. त्यांचें विस्तृत वर्णन. वर्णनसंकोच करण्याची पंतांची ही एक नेहमींचीच सबब आहे—(विनायकमाहात्म्य ३।१, विराटपर्व ४।१७ व मंत्रभागवत ५।६४ पहा.)

द्यूतें[1] हारविलें निज राज्यपदकलत्रसुत असें, पाहे; ।
एकाकी[2] विजन[3] वनीं मन चिंताशोक आपुलें वाहे. ॥ १४

भ्रमतां भ्रमतां विपिनीं[4], तों धांवे आपणासि हरि[5] खाया, ।
परि तो शरभें[6] सहसा वधिला, जोडा[7] नसेचि हरिखा[8] या. ॥ १५

तों तो पाहे, आपण पडलों स्त्रीपुत्ररत्नशोकांत; ।
हारविलें सर्वस्व द्यूतें, झाली अकीर्ति लोकांत. ॥ १६

'धांव, हरिश्चंद्रा! ये, रक्षीं, तूं मुख्य कीं शरण्यांत[9];' ।
ऐशी श्रवणीं[10] शिरली शैब्येची हाक त्या अरण्यांत. ॥ १७

बहु शोधिलें वनीं, परि न कलत्र, न पुत्ररत्न आढळलें; ।
धैर्यसह[11] अश्रु तेव्हां, म्हणतां शोकेंकरूनि 'हा,' ढळले. ॥ १८

स्वर्गीं आपण आहें, ऐसें स्वप्नांत भूप तो पाहे; ।
तेथें यमभटक्लिष्टा शैब्या देखे, न ती दशा साहे. ॥ १९

तुटले हार, कच[12] शिरीं सुटले; फुटले चुडे[13], वसन[14] फिटलें; ।
ती दुर्दशा प्रियेची पाहुनि; नृपचित्त जीवितीं[15] विटलें[15]. ॥ २०

प्रियदारदुर्दशेतें पाहुनि, बहु गहिवरें[16] गळा दाटे, ।
तों आपणाहि नेलें यमदूतांनीं, असें नृपा वाटे. ॥ २१

पाशनिबद्ध[17], गतप्रभ[18], राहुमुखीं जेविं पतित रवि, पत्ती[19] ।
आपण तेविं अनुभवी ऐसी स्वप्नांत अतितर[20] विपत्ती. ॥ २२

यमधर्म म्हणे, 'मजला त्वां लावावा[21] न शब्द[21] बा! राजा! ।
तुज त्या विपत्ति गाधिजकोपें सर्वाहि, अब्द[22] बारा ज्या. ॥ २३

देइल यावरिहि तुला पुत्रमरण शोक, जाण हें साचें; ।
परि सत्त्वकवच[23] असतां, वक्र[24] न[24] होईल[24] अग्र[24] केसाचें. ॥ २४

न[25] मुनि, हरिश्चंद्रा! त्वां मानावा स्वविधि हेतु शोकातें.' ।

---

१. जुगार खेळून. २. एकटा. ३. मनुष्यहीन. ४. रानांत. ५. सिंह. ६. हें एक आठ पायांचें कविकल्पित जनावर आहे. हें सिंहाहून बलिष्ठ मानिलें आहे. ७. उपमा. ८. आनंदाला. ९. रक्षणकर्त्यांत. १०. कानांत. ११. **सहोक्ति.** १२. केश. १३. बांगड्या. १४. वस्त्र. **समुच्चय** व **स्वभावोक्ति.** १५. जीवाला कटाळलें. १६. सर्वसंग्रहपाठः—गहिवरे. १७. दोऱ्यांनीं जखडलेला. १८. फिकट. १९. पादचारी. २०. अत्यंत. २१. दोष द्यावा. २२. वर्षें. २३. सुशील-रूपी चिलखत. २४. केसाचें अग्र वक्र न होईल=कांहीं एक वांकडें होणार नाहीं. **लोकोक्ति.** २५. अन्वयः—हरिश्चंद्रा! त्वां शोकातें हेतु (=कारण) स्वविधि (=आपलें दैव) मानावें, मुनि न [मानावा].

दूतांसि म्हणे, 'सोडा, जाऊं द्या हा मनुष्यलोकातें.' ॥ २५
दूतांहीं यमलोकींहूनि ढकलितां, घडे तळीं पतन; ।
वाटे, दैवें केलें[1] दुःखातें भोगवावया जतन[1] !' ॥ २६
स्वप्नीं पाहोनि असें पतन, भयें भूप जाहला जागा; ।
गडबडुनि, दृष्टि उघडुनि पाहे, तों आपुलाचि तो जागा[2]. ॥ २७
भूप म्हणे, 'शिव! शिव! हा स्वप्नांत अनर्थ पाहिला काय ! ।
सत्यचि[3] असें म्हणावें, कैसा दुःखांत राहिला काय[3] ? ॥ २८
स्वप्न म्हणावा, तरि कसि आली आधींत झोंप ? डिखळाची ।
अशनिपुढें स्थिति मांडिल[4] न प्रकृतिच, काय झोंपडि खळाची ?' ॥ २९
सहवासिपुल्कसांतें[5], अनुभविला द्वादशाब्द[6] जो ताप, ।
तो सांगुनि, 'सत्यचि हा किंवा मिथ्या ?' असें पुसे क्ष्माप[7]. ॥ ३०
कोणी म्हणती, 'मूढा ! हा स्वप्न स्पष्ट, कां खरा गमला ?' ।
कोणी चांडाळ म्हणति, 'सत्य हरिश्चंद्र तों बहु भ्रमला.' ॥ ३१
बहुदुःसह[8] दुःख, क्षत घातलिया त्यांत जेंवि खारा, तें; ।
त्या स्वप्ना अत्यद्भुत उग्रत्व, स्वल्प जें विखारातें[9]. ॥ ३२
अत्यार्त[10] हरिश्चंद्रें आठविला देव कनकपट[11], ज्याला[12] ।
प्रणतभव[13] सुदुस्तरही जेविं जलधि तुच्छ निपट[14] घटजाला[15]. ॥ ३३
धर्मबृहस्पतिशक्रप्रमुख सुरांतेंहि हस्त जोडून, ।
स्त्रीपुत्रत्राणार्थ प्रार्थी निश्वास[16] दीर्घ सोडून. ॥ ३४

---

१. वांचविलें, राखिलें. **हेतूत्प्रेक्षा.** २. हा शब्द स्त्रीलिंगी तसा पुल्लिंगीही आहे. ३. जर हें खरें म्हणावें तर एवढ्या भयंकर विपत्तीच्या तडाख्यांतून हा देह तगला तरी कसा ? **आक्षेप.** ४. अन्वयार्थः–प्रकृति च (मुळीं स्वाभाविक परिस्थितीच) डिखळाची अशनिपुढें स्थिति न मांडिल (वज्रापुढें मातीच्या ढेकळाला टिकूं देणार नाहीं), [मग] खळाची झोंपडी काय (मग ही चांडाळाची खोंपटी तसें काय करूं शकणार ?). **अप्रस्तुतप्रशंसा** व **काव्यार्थापत्ति.** ५. बरोबरच्या चांडाळांस. ६. बारा वर्षें. ७. क्ष्मा+प=पृथ्वीपति, राजा. ८. अन्वयः–त्यांत (=क्षतांत) खारा (=क्षारा, मिठातें) घातलिया, जेविं क्षत (=जखम) [बहु दुःसह], [तेविं] तें दुःख बहु दुःसह. ९. सापाला. **व्यतिरेक.** १०. अत्यंत व्याकुळ, अतिकष्टी. ११. सोनेरी आहे वस्त्र ज्याचें असा, पीतांबरधारी. १२. ज्या देवाला. १३. नम्रांचा (=भक्तांचा) संसारत्रास. १४. अत्यंत. १५. अगस्तीला. अन्वयः–ज्या [देवा] सुदुस्तरही प्रणतभव [तेविं निपट तुच्छ], जेविं घटजाला दुस्तरही जलधि निपट तुच्छ. १६. उसासा.

नमुनि विधिला, भवाला, त्या त्या [1]अग्न्यादि [1]लोकपाळाला, ।
करि, [2]आला [3]शवमूल्यग्रहणव्यवहार जो [2]कपाळाला. ॥ ३५
तों शैब्या, [4]अहिहत सुत घेउनि, आली [5]स्मशानदेशाला, ।
कविस [6]शचीशाळेच्या जीची वर्णूं यशा न दे शाला. ॥ ३६
ती रडत म्हणे, 'झाली राजसुता! हे कशी [7]भवदवस्था? ।
हेंही नवल [8]परासु न झालें, जी मी अशी [9]भवदवस्था.' ॥ ३७
दूरुनि विलाप परिसुनि, जाय हरिश्चंद्र राय लवकरि तो, ।
ज्या शवकर अतिलोभी, [10]दायादा जेविं [11]दायलव करितो. ॥ ३८
कांतें कांता, याही कांतेनें वळखिला न हा कांत, ।
यास्तव करीत होती आधीं ती एकलीच आक्रांत. ॥ ३९
[12]अहिविषहत [13]नृपलक्षणसंपन्न कुमार नीट पाहोनी, ।
राहोनि स्तब्ध क्षण, [14]करि [14]चिंतां, शोकभार वाहोनी. ॥ ४०
राजा म्हणे, 'अहा! हा! [15]कोणी [15]एका [16]महामहीपतिचा, ।
बाळक [17]काळकवळ हा; नाहीं [18]परिहार मृत्युच्या गतिचा. ॥ ४१
स्मरला पुत्र, असावें [19]व्यक्त वयें एवढेंचि त्या बाळें, ।
जरि कवळिलें नसेल क्रूरतरें सर्वभक्षकें काळें.' ॥ ४२
ऐसें चिंती नृप, तों शोक [20]सुतांच्या जिला दिला [20]पांतें, ।
तीच्या ऐके, ज्यांत [21]स्वस्वसुताख्या, अशा विलापातें. ॥ ४३
"सांग वसिष्ठा! सोडूं कितिक सदा नव पुरोहिता! श्वास? ? ।

---

१. अग्निप्रमुख अष्ट दिक्पाळांना. २. वांट्याला आला, नशीबीं आला. ३. प्रेतावरील मसणपट्टी वसूल करण्याचा धंदा. ४. सापानें मारलेला. ५. मसणवटीला. ६. इंद्राणीच्या महालाच्या. अन्वयः—जिची (=शैब्येची) शाला शचीशालेच्या यशा कविस वर्णूं न दे. **व्यतिरेक.** ७. भवत्+अवस्था=तुझी स्थिति. ८. मृत. ९. भव+दव+स्था=संसाराच्या वणव्यांत सांपडलेली. **विशेषोक्ति.** १०. भाऊबंदाला. ११. वडिलार्जित मिळकतीचा लहानसा हिस्सा. भाऊबंदकीच्या चिकाटीसंबंधें उल्लेख पंतांच्या काव्यांत वारंवार आढळतात. अन्वयः—जेविं दायादा दायलव [अतिलोभी] करितो, [तेविं] ज्या शवकर अतिलोभी [करी]. १२. सर्पविषानें मेलेला. १३. राजचिन्हांनीं युक्त. हीं शरीरावरील सामुद्रिक चिन्हें होत. १४. विचारांत पडला. १५. कोणातरी. १६. मोठ्या राजाचा. १७. मृत्यूनें कवळलेला; काळाचा ग्रास. १८. निवारण. **अर्थान्तरन्यास.** १९. स्पष्ट. २०. मुलाच्या मरणानें. २१. आपलें व आपल्या मुलाचें नांव.

[1]वा! या द्यावें काय द्रवुनि न दान वपु रोहिताश्वास? ॥ ४४

हाय! हरिश्चंद्रा! मन [2]अवनीं रंगो, नसे तुजा [3]तोकीं ।
प्रेमा स्वल्प, भवींचा हा! हा! भंगोन [4]सेतु जातो कीं. ॥ ४५
'[5]शैब्या बहु भाग्यवती' ऐसें जीस [5]प्रजासभा गाती, ।
[6]प्रसवोनि पुत्र, वंध्या झालें, दासीहि, मी [7]अभागा ती!" ॥ ४६
भार्येसि ओळखे नृप, परिसुनि सहसा अशा विलापाला, ।
'हा! हा!' म्हणोनि मूर्च्छित तो पडतां, तीहि त्या [8]इलापाला. ॥ ४७
शैब्याहि, [9]श्वपचासम पतिची पाहोनि दुर्दशा, रडली; ।
'घडली अशी कशी गति तुज?' ऐसें म्हणुनि मूर्च्छिता पडली. ॥ ४८
'हा! हा!' म्हणत नृप उठे, राज्ञीही; [10]ओतु [11]आखुला धरितो, ।
क्षण सोडितो, जनाला मोहहि तैसेंचि कौतुकें करितो. ॥ ४९
भूप म्हणे, 'हा, वत्सा! विनवीं, [12]श्रुतिमंजु [13]मति वद, शेला ।
मळिव [14]पदरजें येउनि, न [15]उलो पाहोनि [16]हीं तव दशेला. ॥ ५०
[17]विकलासि वस्त्रसा, परि करि जें कांहीं कुकर्म कुपिता, तें ।
नाठवि [18]सुपुत्र; बा! गा! [19]पदर पसरितों तुज [20]प्रकुपितातें.' ॥ ५१
बहुविध असें वदे, मग आलिंगुनि बाळकासि तो रडला; ।
जाणों [21]अहिदष्टसुतस्पर्शें मूर्च्छित [22]विषानळें पडला. ॥ ५२
सुतशोक त्यजुनि क्षण, शैब्या, पाहोनि पतिकडेचि, रडे; ।
'हाय!' म्हणे, 'कोसळले दुःखाचे [23]उग्रगति [24]कडे, चिरडें. ॥ ५३

---

१. अन्वयः—बा! द्रवुनि (=दयेनें विरघळून) [त्वां] या रोहिताश्वास वपु (=शरीर) दान न द्यावें काय? अर्थः—दयेनें पाझरून तूं या निर्जीव शरीराचा रोहिताश्वाच्या आत्म्याशीं संबंध जोडून, त्यास पुन्हां जीवंत करूं नये काय? सर्वसंग्रहपाठः—वाया द्यावें काय इ०. २. रक्षणांत. ३. मुलावर. ४. संसार तरून जाण्याचा पूल. (म्हणजे मोक्षलाभ करून देऊन, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडविणारा मुलगा). ५. प्रजांचा समूह. ६. **विरोध.** ७. फुटक्या नशिबाची, कम दैवाची. ८. राजाला. हें 'ओळखे' या क्रियापदाचें कर्म. ९. चांडालासारखी. १०. मांजर. ११. उंदराला. या गीतींतील **उपमा** फार मार्मिक आहे. १२. कानास गोड लागणारी. १३. भाषण. १४. पायाच्या धूळीनें. १५. तडको, फुटो. १६. मी, हरिश्चंद्र. १७. [तुझा] कायद्याप्रमाणें विका केला. १८. चांगला सुशील मुलगा. येथें **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. १९. तुझी क्षमा मागतों, मला माफ कर. ही **लोकोक्ति** आहे. २०. अतिशय रागावलेल्यास. २१. सापानें दंश केलेल्या मुलास शिवल्यामुळें. २२. विषाच्या आगीनें. **हेतूत्प्रेक्षा.** २३. भयंकर आहे वेग ज्यांचा असे. २४. पर्वताचे सुळके.

[1]सुकविचकोरप्रियकरचंद्र हरिश्चंद्र राय हा धन्य; ।
नासा, वदन, रदन, भुज, तेचि प्रिय [2]निश्चयें, नव्हे अन्य. ॥ ५४
[3]या दर्शनीं मनाचा, सधनाच्या जेविं दीनकाम सणीं, ।
पुरतो; पुर तो सोडुनि, यावा परि [4]गुणनदीन कां मसणीं?' ॥ ५५
तो श्वपचाचा जैसा, पतिचा तैसाचि [5]दंड पाहे ती, ।
मूर्च्छित पाडी तीच्या देहा, जसि [6]जातिमंडपा [7]हेती. ॥ ५६
उठुनि म्हणे, 'हे गुण हो! [8]स्वाश्रयसर्वाहितासि [9]खंडाल, ।
असतां [10]तुम्ही असे, हा कैसा झाला नरेंद्र चंडाल? ॥ ५७
राजा! जन्मापासुनि, जाणुनि [11]हितहेतु, [12]सेविलें धर्म ।
[13]वर्म न झाला; वाटे केलें यज्ञादि तें वृथा कर्म. ॥ ५८
कोठें तें सिंहासन? केलीं स्वच्छत्रचामरें काय? ।
केला कसा [14]अमंगळवेष, जसा [15]पतितपामरें, [16]काय? ॥ ५९
रे! निर्दया विधे! त्वां विस्पष्ट विविध विलाप शिकवीले; ।
हरिलें सर्वस्व, दिला स्वजनविरह, [17]पुत्रदार विकवीले. ॥ ६०
[18]शेखीं केला, जो [19]शतमखसख, तो पुण्यकीर्ति पुल्कससा; ।
गुरु तो गुरु, लघु तो लघु; सिंह नव्हे [20]तोडितांहि शुल्क ससा.' ॥ ६१
यापरि रडुनि, पडुनि पतिकंठीं, साध्वी म्हणे, 'मला अंकीं ।
घेउनि न सांत्विशी कां? काढावी गाय कष्टतां [21]पंकीं. ॥ ६२
राया! स्वस्त्री ऐसें, कीं कैसें मानितोसि? सांग, मला; ।
वद, सदया! सर्वज्ञा! [22]संशय माजाचि कठिण कां गमला?' ॥ ६३

---

१. शाहणे लोक हेच चकोर, त्यांचा आवडता चंद्र. **परं० रूपक.** २. खास. ३. अन्वयः—जेविं सधनाच्या (=श्रीमंताच्या) सणीं (=उत्सवांत) दीनकाम (=गरीबाची इच्छा) पुरतो (=पुरा होतो), [तेवीं] या दर्शनीं (=हरिश्चंद्राच्या दर्शनानें) [माझ्या] मनाचा [काम=इच्छा] पुरतो; परि तो गुणनदीन पुर (=नगर) सोडुनि मसणीं कां यावा? ४. गुणांचा सागर. इन=नाथ, पति. ५. सोटा. ६. जाईच्या मांडवाला. ७. हत्यार; सुरी, कोयता, तरवार वगैरे. ८. आपल्या आसऱ्याला असणाऱ्या सर्वांच्या दुःखाला. ९. तोडाल, नाहींसें कराल. १०. अन्वयः—असे तुम्ही [गुण] असतां, हा नरेन्द्र (=राजा हरिश्चन्द्र) चंडाल कसा झाला? **विभावना.** ११. कल्याणाचें कारण. १२. स्वीकारिलेला. १३. चिलखत, रक्षणाचें साधन. १४. अशुभ व घाणेरडा आहे वेष ज्याचा असा. १५. पापकर्मांत पडलेल्या नीच मनुष्यानें. १६. शरीर, देह. १७. मुलगा व बायको. १८. अखेर. १९. इंद्राचा मित्र, इंद्रासारखा. २०. किंमत कमी केली असतांही. शुल्क=मोल, किंमत. **अर्थान्तरन्यास.** २१. चिखलांत. **दृष्टान्त.** २२. शंका, प्रश्न.

राजा सविस्तर कथी त्या [१]दयितेतें [२]श्वपाकता [३]आली, ।
[४]वैतरणीची, माळा [५]घालाया आपणा, [६]जशी आली. ॥ ६४

तींहि रडोनि, सविस्तर पुत्रमरणवृत्त पतिस आयकवी, ।
[७]नायक वीरांचा तो नृपचि न, अद्यापि म्हणति 'हाय' कवी. ॥ ६५

भूपति म्हणे, 'प्रिये! या दीर्घ क्लेशांत वांचणें [८]खोटें, ।
सोडावें वपु, तरि मी परतंत्र, पहा, अभाग्य हें मोटें. ॥ ६६

चांडालाज्ञा नसतां [९]होमावा [१०]पावकांत जरि [११]काय, ।
चांडालदास व्हावें लागेलचि; फळे [१२]जळोनि तरि काय? ॥ ६७

नीट न दिसे विचारें त्यजितां दहनांत [१३]भूपनरकाया; ।
जावें [१४]नैकां, [१५]उबगुनि स्यां एका दास्यरूपनरका या. ॥ ६८

जें [१६]स्वामिवाक्यलंघन, तें [१७]सकळागांत होय [१८]अत्याग; ।
परि [१९]दुःखाब्धिनिमग्ना तनुचा त्यागचि बरा, न [२०]अत्याग. ॥ ६९

जो [२१]वंशतन्तु एकचि होता सुत तोहि भक्षिला काळें; ।
देईलचि हें मन्मुख सुहृदांच्या दुःख [२२]अक्षिला [२३]काळें. ॥ ७०

परि हरि! हरि! हरि! दयिते! [२४]देवि! मरावें कसें [२५]पराधीनें? ।
अथवा [२६]अत्यार्ताच्या बहु दोषहि मानिजे [२७]बरा [२७]धीनें. ॥ ७१

[२८]तिर्यग्जन्मांत नसे, त्या [२९]वैतरणीनदींतही नाहीं, ।
[३०]असिपत्रवनींहि न तें, सति! [३१]सुतनिधनांत दुःख जें कांहीं. ॥ ७२

---

१. प्रियेला, पत्नीला. २. मांगाची स्थिति. ३. आलेली. ४. नरकांतील नदीची सखी. ५. वरण्याला. ६. जणूं काय. ७. या अर्धाचा अर्थः—तो वीरश्रेष्ठ राजा, हरिश्चंद्रच केवळ दुःखानें 'हाय! हाय! म्हणाला असें नाहीं, तर [ही गोष्ट नुसती ऐकूनच] शाहाणे लोक अजूनही 'हाय! हाय!' म्हणतात. ८. वाईट, दुःखद. ९. जाळावा. १०. अग्नींत. ११. देह. १२. मग स्वनाला जाळून घेण्यांत तरी फायदा कोणता? १३. राजपद पावलेल्या मनुष्याचा देह. १४. न+एका=अनेकांना, अनेक नरकांना. १५. एका परतंत्रतारूपी नरकाला कंटाळून. १६. धन्याची आज्ञा न जुमानणें. १७. सर्व अपराधांत. १८. फार मोठा अपराध. १९. दुःखसागरांत बुडालेल्यास. २०. अ+त्याग=ग्रहण. **अप्रस्तुतप्रशंसा.** २१. कुलांकुर, कुळाचें नांव चालविणारा. २२. डोळ्याला. २३. मळकें, अपकीर्तीच्या मशीनें भरलेलें. २४. हे राणी! २५. बंधा नोकरानें. २६. दुःखानें गांजलेल्याच्या. २७. धीनें=बुद्धीनें, मनानें. 'वराधीनें' (=मोठ्या दुःखावेगानें)—असा पाठभेद. **आक्षेप.** २८. पशुपक्ष्यादिकांच्या नीच योनींत. २९. नरकांतील नदींत. ३०. तरवारीसारख्या ज्यांच्या [तीव्र धारेच्या] पात्या आहेत अशा झाडांच्या अरण्यांत, उंसासारख्या झाडाच्या झाडींत. ३१. मुलाच्या मरणांत. **व्यतिरेक** व **अप्रस्तुतप्रशंसा.**

शोक न साहे, या सुततनुसह दहनांत काय[1] होमीनें[2]; ।
जीवनविरहीं[3] 'जीवनविरहचि,' न म्हणेल काय, 'हो' मीन? ॥ ७३
देवि! क्षमा करावी त्वां, तुज विकिलें कुकर्म हें माजें; ।
साध्वि! गुणकरचि[4], तोडनदाहच्छेदादिसहन[5] हेमा[6] जें. ॥ ७४
आज्ञा दिधली, आतां त्या विप्रस्वामिच्याचि जा गेहा; ।
निज धर्म उपासावा प्रेमें, स्वाश्रितहितार्थ[7] जागे हा[8]. ॥ ७५
स्वर्गीं[9] भेटशिलच तूं, भेटेलचि मज तसाचि हा तनय; ।
हात न यज्ञीं दानीं योजुनि, जरि मी नसेन हातनय[10]. ॥ ७६
[11]जरि विस्मरण नसेल स्वप्नींहि मना दिलें गुरुपदांनीं; ।
आली असेल, पाहुनि अधिकाधिक याचका, हुरुप[12] दानीं; ॥ ७७
तरि हें[13] घडेल नाकीं, आम्हांशीं भूमिवरि समागम तों ।
सरला; तरला मर्त्य न काळा, या मृगचि हरिसमा गमतो[14]. ॥ ७८
देवि! क्षमा करीं तें, जें वदलों ग्राम्य[15], याचितों, दे हें; ।
जो अविनयपरिमार्जन[16], वरिला स्वविनाश याचि तो देहें. ॥ ७९
नृपपत्नी या गर्वें अवमानावा न विप्र तो धामीं[17], ।
कामीं दासीनें त्वां राबावें, सेव्य[18] शंभुचा स्वामी[19].' ॥ ८०
राज्ञी प्रार्थी, 'मींही किति, पाहुनि दुःखभार, चिरडावें? ।
दहनीं[20] शिरेन, देवा[21]! राहुनि याहूनि फारचि रडावें. ॥ ८१

---

१. देह. २. जाळीन. ३. या अर्धाचा अन्वयः—जीवनविरहीं (=पाण्याचा वियोग झाला असतां), 'जीवनविरहचि (=प्राणनाशच) हो (=होवो)' [असें] मीन (=मासा) न म्हणेल काय? **दृष्टान्त.** ४. गुणावह, कल्याणकारक. ५. ठोकणें, तावणें, तोडणें वगैरे-अपक्रिया सहणें. ६. सोन्याला. **अप्रस्तुतप्रशंसा.** ७. आपला आसरा घेणारांच्या कल्याणासाठीं. ८. धर्म. **अर्थान्तर-न्यास.** ९. गीतीचा अन्वयः— यज्ञीं [व] दानीं हात न योजुनी (=हातानें यज्ञ न करून व दानें न देऊन), जरि मी हातनय (=त्यक्तनय, अनीतिमान्) [झालों] नसेन, [तरि] तूं मज स्वर्गीं भेटशीलचि, तसाचि हा तनय मज भेटेलचि. १०. हात+नय=त्यक्त+नीति, नीतिभ्रष्ट. ११. पूर्वार्धान्वयः—जरि स्वप्नींही गुरुपदांनीं [माझ्या] मना विस्मरण दिलें नसेल. १२. उत्साह, हौस. १३. भेट घडणें. १४. अन्वयः—काळा (=यमाला) मर्त्य (=मनुष्य) न तरला, [तो=मर्त्य] हरिसमा (सिंहासारख्या) या [काळा] मृगचि गमतो (वाटतो). १५. गांवढळ, असभ्य. १६. असभ्यपणाचें निराकरण. उत्तरार्धान्वयः—जो अविनयपरिमार्जन, तो स्वनाश (=आत्महत्या) याचि देहें वरिला. पाठभेदः—जों अविनय········तों देहें. १७. घरीं. १८. सेवा करण्यास योग्य. १९. शंभूलाहि जो पूज्य आहे, असा विप्र. २०. अग्नींत. २१. राया!

भोगूं स्वर्गीं सुख, कीं सहितचि निरयांत[1] यातना दोघें; ।
कुदशा पाहुनि[2], साहुनि[2], राहुनि[2] फळ कोण जीवितें[3] मोघें[3]?' ॥ ८२
भूप म्हणे, 'उद्धरिशिल[4], तुज सोडूं कां? पतिव्रते[5]! जाये! ।
कीं[6] साध्वीच्या, धरितो **यम** पाहुनि कांप, तीव्रतेजा; ये.' ॥ ८३
मग आपण स्मशानीं शीघ्र हरिश्चंद्र भूप थोर चिता ।
करुनि, धरुनि धैर्यातें, पुत्रातें तींत होय तो रचिता[7]. ॥ ८४
त्यावरि आर्य[8] सभार्य[9] प्रांजलि[10] होऊनि **शे**षशयनातें[11] ।
चिंती, प्रणतविपच्छतशमनातें[12], पुंडरीकनयनातें[13]. ॥ ८५

---

## अध्याय चवथा.

साक्षी[14] करुणाब्धि **प्र**भुवर जेव्हां संकटांत आठविला, ।
तेणें **ब्र**ह्मादि सकळ सुरजन तत्सान्त्वनार्थ पाठविला. ॥ १
गगनीं अगणित भरले द्याया उत्पूर्वसव[15] सुरविमान[16], ।
करिति नृपाचा बहुतचि **लो**कपति स**सा**ध्य स**व**सुरवि मान. ॥ २
ते म्हणति, '**ह**रिश्चंद्रा! आलों सुर **सा**दिगुरु[17] महाबाहो! ।
नेत्रें उघडोनि पहा, निजसुकृतें[18] पात्र गुरु[19] महा[20] बा! हो. ॥ ३
मित्र कराया भगवान् विश्वेंहि अशक्य जो, महाभागा[21]! ।
हा **गा**धिज तव मैत्री, इष्ट[22] करायासि[22], इच्छितो बा! गा!' ॥ ४
मग धर्म[23] म्हणे, "साधो! साहस[24] कांहीं करूं नको, बापा! ।
मी साक्षात् **ध**र्म, पहा, आलों वारावया तुझ्या तापा. ॥ ५

---

१. नरकांत. २. **अश्वधाटीयमक.** ३. निष्फळ जीवितानें, व्यर्थ प्राणानें. ४. [माझा] उद्धार करिशील. ५. हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें **परिकर.** ६. उत्तरार्धान्वयः—ये (माझ्याबरोबर अग्निप्रवेश कर), कीं (=कारण) साध्वीच्या तीव्र तेजा पाहुनि यम कांप धरितो. **सुभाषित.** ७. ठेविता. ८. सदाचारी [हरिश्चंद्र]. ९. स्त्रीसह. १०. अंजलि जोडली आहे ज्यानें असा, हात जोडून. ११. विष्णूला. १२. प्रणत+विपत्+शत+शमनातें= नम्र झालेल्यांच्या शेकडों प्रकारच्या विपत्ति नाहींशा करणाऱ्यातें. १३. कमलनयनाला. १४. [सर्व गोष्टी] पाहणारा. १५. उत्सव, आनंद. १६. देवांचीं विमानें. 'विमान' हा शब्द येथें पुल्लिंगी योजिलेला आहे. १७. ब्रह्मदेवासह. आदिगुरु=ब्रह्मा. १८. आपल्या पुण्याईनें. १९. मोठ्या. २०. आनंदाला. २१. भाग्यवंता! २२. तुझे मनोरथ पुरविण्याच्या हेतूनें. २३. यमधर्म, यम. २४. अविचाराची गोष्ट, आत्महत्या.

तव [1]दमसत्यतितिक्षाप्रमुख गुणांहीं प्रसन्न मी झालों, ।
'धालों सुखें,' असें मी तुजला म्हणवावया स्वयें आलों." ॥ ६
इंद्र म्हणे, 'राजेन्द्रा! आलों मी **शक्र** तुज पहायाला, ।
स्वर्गासि वहायाला, कुसुमाञ्जलि तव शिरीं वहायाला. ॥ ७
बा! जिंकिलें स्वसुकृतें [2]लोकें [2]सनातन तुवां सभार्यानें, ।
[3]यांहि तुझ्या बाळानें [4]वृद्धतपोधनमहासभार्यानें. ॥ ८
**सां**बाची **धन**द जशी, तव पूजा तशि [6]सदार करुं; चाल; ।
जेविं चकोरां [7]विधुकर, देवांसि तुम्ही [8]सदारक रुचाल.' ॥ ९
ऐशीं आधीं श्रवणीं वर्षे वचनें [9]मनःप्रहर्षकरें; ।
मग त्या शिशुवरि **हरि** करि [10]अपमृत्युविनाशि [11]अमृतवर्ष [12]करें. ॥ १०
तों सोडिली सुरांहीं [13]दिव्यद्रुमपुष्पवृष्टिहि तशी ते; ।
जो स्पर्शे, त्या पवनें केलें [14]मंदेंहि सृष्टिहित शीतें. ॥ ११
दुर्लभ [15]अमृतसुरकुसुमवर्ष जरि, अमंगळा परि चिता तें ।
पावे, कीं मिळतें यश दुष्टाही साधुच्या [16]परिचितातें. ॥ १२
वाजविती वाद्यांतें, नादेंचि दिशा दहाहि गाजविती; ।
साजविती [17]व्योमातें [18]देवी, [19]विद्युल्लतांशि [19]लाजविती. ॥ १३
शय्येवरुनि उठावें चिरकाळ जसें निजूनियां सहसा, ।
तेविं कुमार उठे, तों सर्वहि हरि ताप मूर्तिमान् [20]महसा. ॥ १४
[21]साश्रु **हरिश्चंद्र** सुता आलिंगुनि, सुचिर मस्तकीं हुंगी; ।

---

१. इंद्रियनिग्रह, सत्य, क्षमा वगैरे. २. शाश्वत पद, अक्षय्य लोक. ३. या अर्धाचा अन्वयः— हे वृद्धतपोधन महासभार्यानें तुझ्या बाळानें [सनातन लोक जिंकिले]. या गीतींत **व्यतिरेक** हे. ४. म्हातारे तपस्व्यांच्या मोठ्या मोठ्या सभांनाही पूज्य अशा. ६. पत्नीसह. ७. चंद्राचे एण. ८. पुत्रासह. ९. चित्ताला अत्यंत आनंद देणारीं भाषणें. १०. अकाल मरणाला नाहींसें णारा. ११. अमृताचा वर्षाव. १२. हातानें. १३. स्वर्गांतील कल्पवृक्षांच्या फुलांचा वर्षाव. ४.संथ, मृदु;[पक्षीं] जड, मूर्ख. येथें 'मंदानें सुद्धां हित केलें' या वर्णनांत **श्लेषमूलक विरोभास.** १५. अमृताचा व कल्पवृक्षांच्या फुलांचा वर्षाव. १६. सोबत्यातें. गीतीचा अन्वयः— रे अमृतसुरकुसुमवर्ष दुर्लभ, परि तें अमंगळा चिता पावे, कीं [=कारण] साधूच्या परिचितें दुष्टाहि यश मिळतें. रोहिताश्वावर जें अमृत शिंपिलें व जीं दिव्य फुलें उधळिलीं, तीं त्याच्या मंगळ चितेलाही लाभलीं, हें सत्संगाचें फळ होय;—हा भाव. **सुभाषित.** १७. आकाशाला. ८.देवस्त्रिया. १९. [आपल्या अंगकांतीनें] विजांना लाजवीत होत्या. **व्यतिरेक.** २०. आनंदारिखा. २१. ज्याच्या डोळ्यांत आसवें आहेत असा.

न सुटे मिठी तयाची, [1]सुमधुरसीं जेविं गुंतली मुंगी. ॥ १५
[2]ती माय दिसे जडली त्या माशी काय पां ! गुळाला हे; ।
तन्न्यूनचि तो, जो जन अंध नयन, पाय पांगुळा, लाहे. ॥ १६
झाले [3]दिव्याम्बरधर भूषणसंपन्न देह ते, [4]ज्यांचें ।
दर्शन हर्ष नवनवचि दे नयना, जरिहि गेह तेजांचें. ॥ १७
सोडूनि जाय कुदशा, सुदशा ये, उग्र भोग तो सरतां, ।
साधु हरिश्चंद्रातें, चंद्रातें जेविं राहु ओसरतां. ॥ १८
शक्र म्हणे, 'स्वर्गातें सस्त्रीक सपुत्र चाल; सामोरा ।
आलों तुज निववाया, यावा घन जेविं [5]सालसा मोरा.' ॥ १९
भूप म्हणे, 'देवेन्द्रा! मत्स्वामी [6]श्वपच संकटीं त्राण ।
करिता झाला, देउनि धन माझें; म्हणुनि [7]राहिले प्राण. ॥ २०
त्याचें न [8]वारिलें तें [9]ऋण, आज्ञा घेतली नसे त्याची; ।
स्वर्गासि न येइन मी, तुज कोप न यो, [10]मदुक्ति हे [11]साची.' ॥ २१
तेव्हां श्रीधर्म म्हणे, 'बा! माझें कपट जाण भूपा! तें; ।
कैंचा श्वपाक? घेता झालों मीच श्वपाकरूपातें.' ॥ २२
शक्र म्हणे, 'चाल कसा बालकसाध्वीसमेत; [12]नाकातें ।
[13]श्रीदें तव [14]वपु [15]सुवृत्त, स्त्रीच्या मौक्तिक जसेंचि नाकातें.' ॥ २३
सुरपतिस म्हणे, 'देवा! विनयें करितों तुला, पहा, नमन; ।
धर्म त्यागुनि, विषयाकरितां न करीन मी [16]लहान मन. ॥ २४
मजकरितां [17]साकेतीं वहुदुःखी जन, तयासि सोडून, ।
स्वर्ग रुचेल मज कसा? भक्तत्यागें [18]महाग जोडून. ॥ २५
ब्रह्मवध, स्त्रीवध, गुरुवध, गोवध, यांसमान [18]त्याग ।

---

१. उत्तम मधाच्या रसाचे ठायीं. २. अन्वयः—पां! (=बा!) ती माय [जणूं] काय हे माशी त्या (=रोहिताश्वरूपी) गुळाला जडली दिसे, जो अंध जन नयन लाहे, [किंवा] जो पांगुळा [जन] पाय लाहे, तो [आनंदानुभवासंबंधें] तन्न्यूनचि (=तिच्याहून खालच्या पायरीचाच) [होय.] ३. तेजस्वी वस्त्रें व सुंदर अलंकार यांनीं युक्त. ४. ज्या देहांचें. जरी ते देह तेजानें दिपवून टाकणारे होते, तरी ते डोळ्यांना त्रास न देतां, उलट आनंदच देते झाले. हा उत्तरार्धाचा भाव. ५. आळशी, निरुत्साह. ६. चांडाळ, मांग. ७. वांचले. ८. फेडिलें. ९. देणें, कर्ज. १०. माझें भाषण. ११. खरी. १२. स्वर्गाला. १३. शोभा देणारें. १४. शरीर. १५. (शरीरपक्षीं) चांगलें आहे वर्तन ज्याचें असें, सुशील; (मौक्तिकपक्षीं) वाटोळें, गोळीबंद. **श्लेष.** १६. क्षुद्र, हलकें. १७. अयोध्येंत. १८. मोठें पाप.

भक्तत्यागें घडतें; स्वजनाचा म्हणुनि योग्य [1]अत्याग. ॥ २६
स्वर्गासि जरि [2]तयाचें, माझें होइल तरीच [3]आगमन; ।
करितों [4]दुराग्रह, असें मानूनि तुझें धरो न [5]आग मन. ॥ २७
स्वजनसह सुखी स्वर्गीं होइन, कीं जाउनि श्रमी नरकीं; ।
भक्तत्याग करावा कैसा? धर्मज्ञ कुलज मी नर कीं.' ॥ २८
शक्र म्हणे, 'जन आले कर्में अशुभें शुभें करित नाना, ।
ज्यांच्या हृदयीं [6]करिती कामादि समस्तही अरि [6]तनाना. ॥ २९
सर्व जन [7]सम स्वर्गस्थितितें होइल कसा उचित? राया! ।
सद्गतितें पावाया संसारीं एक तूं शुचितरा! या.' ॥ ३०
नरवर म्हणे, 'कुटुंबी जे कोणी लोक, [8]तत्प्रभावानें ।
भोगितसे राज्यातें राजा, नच केवळ [9]स्वभावानें. ॥ ३१
करितो प्रजाप्रभावें, जें [10]पूर्तमखादि कर्म, देवा! तें; ।
धनसंचयें नृपाळा जन, जेविं [11]व्यंजन [12]शर्म दे वातें. ॥ ३२
तें म्यां जनप्रसादें शक्रा! सर्वहि [13]अनुष्ठिलें कर्म, ।
[14]उपकारी न त्यजिन, स्वर्गीं वांछुनि [15]तयांविना [12]शर्म. ॥ ३३
जें तप [16]दानमखसुकृत माझें, त्याचेंहि, बा! असो सम तें; ।
गमतें समुचित मज हें [17]सुकृतज्ञमतें, न केवळ स्वमतें. ॥ ३४
देवा! मज कर्माचें बहुकाल असेल सुफळ जें भोग्य, ।
तें एकहि दिवस असो [18]त्यांसह मज, हेंचि निश्चयें योग्य. ॥ ३५
प्रिय मज ते, त्यांस प्रिय मी आहें; मान सत्य; [19]जीनांतें ।
[19]सुत, [19]मातें [19]जन; नातें जें बा! हें, मानस त्यजीना तें.' ॥ ३६
ऐसें ऐकुनि, धर्मप्रमुखसुरसमूहसहित बहु डोले, ।
'राजा! म्हणतोस तसें होइल,' यापरि सहर्ष [20]हरि बोले. ॥ ३७
नवल नव्हे, श्रीगाधिज तेव्हां होय प्रसन्नचेता, तें; ।

---

१. स्वीकार, सांभाळ. २. माझ्या प्रजाजनाचें. ३. येणें. ४. हट्ट. ५. संताप, राग. ६. सूर काढिती, गोंधळ घालतात. ७. एकाच प्रकारच्या स्वर्गसुखाच्या अवस्थेला. ८. त्यांच्या गुणानें, पराक्रमानें. ९. आपल्या स्वतःच्या अंगच्या हिंमतीनें. १०. पूर्त (=वापीतडागादि जनहितार्चीं कामें), यज्ञ वगैरे. ११. पंखा. १२. सुख. १३. आचरिलें, केलें. १४. उपकार करते. १५. उपकार करणाऱ्यांवेगळें. १६. दानधर्म, यज्ञ इत्यादिकांनीं कमाविलेलें पुण्य. १७. पुण्यकर्माचें ज्यांस ज्ञान आहे, अशांच्या मतानें. १८. माझ्या प्रजाजनांसह. १९. म्हाताऱ्याला [बळ देणारे] मुलगे, [व] मला हे प्रजाजन होत. २०. विष्णु.

हर्षकरचि[1] जे केले गुरुनें, कीं काय जाच जे तातें. ॥ ३८
भूप[2] म्हणे, 'ज्ञान नरा द्याया, बैलास कल्पनग, रमलां ।
येथें, कीं कष्टचि हें त्यजितां कैलासकल्प नगर मला.' ॥ ३९
मग सुर साकेतातें[3] घेउनि गेले नृपाशि मिरवीत, ।
गुरु[4] नवरीस वरांकीं[5], तत्कर्णीं तेविं स्तुतिस[6] शिरवीत[7]. ॥ ४०
प्राण[8] हरिश्चंद्र प्रभु, त्याला पावे तनू अयोध्या ती; ।
उपमार्थ[9] कविमनीं कीं चंद्रातें कुमुदिनीच यो ध्याती. ॥ ४१
त्या साकेतजनातें शक्र म्हणे, 'सर्व लोक! परिसा रे! ।
स्वर्गासि चला; घ्या प्रिय गुरु, बंधु, कलत्र, तोकें[10] परि सारे.' ॥ ४२
आलीं दिव्य विमानें बहुलक्ष, पहा, तुम्हां वहायाला; ।
अमर हरिश्चन्द्रासह होउनि, नाकीं चला रहायाला. ॥ ४३
झाले स्वर्गमनोत्सुक[11] निजजनसह नर; विमान वासव[12] दे; ।
त्यां[13] न्यून आपणाहुनि तेजें तिळ न रवि मानवांस वदे. ॥ ४४
राज्याभिषेक करुनी स्वपदीं सुत रोहिताश्व चढवीला, ।

---

१. उत्तरार्धान्वयः—जे काय (=कांहीं) जाच गुरुनें केले, कीं (किंवा) जे काय जाच तातें केले, [ते] हर्षकरचि. **सुभाषित.** या गीतींत **अर्थान्तरन्यास** आहे. २. अन्वयः—भूप म्हणे, '[तुम्हीं] येथें (या जगीं) नरा ज्ञान द्याया [व] बैलास (दीन पशूंस) कल्पनग (कल्पतरु) द्याया रमलां (हौशीनें झटत आहां), कीं (कारण) [नाहीं तर] हें कैलासकल्प (कैलासाच्या बरोबरीचें) नगर त्यजितां मल कष्टचि [प्राप्त झाले असते]. परंतु आतां माझे सर्व प्रजाजन ज्या अर्थीं मजबरोबरच स्वर्गीं येणार, त्या अर्थीं नगरवियोगाचे कष्ट राहिले नाहींत. ३. अयोध्येला. ४. वडील माणसें. ५. नवऱ्या मुलाच्या मांडीवर. ६. स्तुतीला. ७. ज्याप्रमाणें वडील मनुष्यें शिकस्तीचा आग्रह करून नवरीला नवऱ्या मुलाच्या मांडीवर बसवितात, त्याप्रमाणें देव हरिश्चंद्राच्या स्तुतीला त्याच्या कानांत बसवीत होते. नवरानवरीला परस्परयोग जरी प्रिय असला, तरी तो लाजवटपणा उत्पन्न करणारा होतो, तद्वत् हरिश्चंद्र व त्याची स्तुति ह्यांचा योग जरी हरिश्चंद्राला फार प्रिय असला, तरी त्याच्या योगानें त्याच्या मनांत संकोच उत्पन्न होऊन, तो त्या स्तुतीचा संकटानेंच स्वीकार करीत होता. **उपमा** फारच सुंदर आहे. ८. अर्थसादृश्यः—धर्में कुरुपुर पावे, बहु अर्कें जेविं तोख राजीव; । करितां प्रवेश, वाटे तें नृपगृह देह, तो खरा जीव. ॥ (शांतिपर्व, ५।१७.) ९. या अर्धाचा अन्वयः—कीं (किंवा) चंद्रातें ध्याती (=चिंतणारी) कुमुदिनीच कविमनीं उपमार्थ (=उपमेसाठीं; अयोध्येशीं गुणसादृश्यास्तव) यो (=येवो). १०. मुलें. ११. स्वर्गास जाण्यासाठीं उतावीळ. स्वर्=स्वर्ग. १२. इंद्र. १३. या अर्धाचा अन्वयः—त्यां मानवांस रवि आपणाहुनि तेजें तिळ[हि] न्यून न वदे. **व्यतिरेक.**

हरिगुरुविप्रभजन निज धर्म तया सन्मतीस[1] पढवीला. ॥ ४५
दासी दास विमानीं चढले, मग राहतील कां दाया? ।
शक्र म्हणे, 'सुखरूप स्वर्गीं निःशंक सर्व नांदा, या.' ॥ ४६
सस्त्रीक हरिश्चन्द्र प्रभु वंदुनि पाय दे वर[2] विमानीं; ।
बहु धन्य आपणातें रोमांचितकाय[3] देव रवि[4] मानी. ॥ ४७
दुंदुभि[5], वीणा, दरवर[6], वेणु, अमित[7] वाजले मुरज[8] नाकीं; ।
जाय हरिश्चन्द्र प्रभु, सह नेउनि आदरें पुरजना कीं. ॥ ४८
बसवुनि पौर[9], विमानीं[10] बसला जो पुण्यकीर्ति कामगमीं[10], ।
श्रीरामपूर्वजा[11] त्या गाऊं परमादरें न का मग मी? ॥ ४९

---

## अध्याय पांचवा.

गंगेंतूनि मुनि[12] निघे द्वादशवर्षें करूनि सुतपातें, ।
परिसुनि साधुनृपपरिक्लेश[13] क्षोभे[14], न तेविं सुतपातें[15]. ॥ १
कोपोनि वसिष्ठ म्हणे, 'त्यजितों क्षण, आइक, क्षमे! रूस, ।
साधुच्छळ सोसेना, मानितसें आइ कक्ष[16] मेरूस. ॥ २
करितों दंड धरे[17]! मी त्वत्पालकपीडकासि[18] हरिकांते[19]! ।
सोसावा अपराध[20] स्वातिक्रमरूप[20] एक, मम शांते! ॥ ३
गाधिसुता! बक हो, घे, हें अयशोविषचि हा! हताशा[21]! पी.' ।

---

१. बुद्धिवानास. २. चांगल्या. ३. ज्याच्या अंगावर [आनंदानें] कांटा उभा राहिला आहे असा. ४. सूर्याला आनंद होण्याचें कारण असें, कीं हरिश्चंद्र हा त्याचेच वंशांत (सूर्यवंशांत) जन्मला होता व हरिश्चंद्राच्या पुण्याईनें तो सर्व वंश पावन झाला. ५. भेरी, नगारे. ६. उत्तम शंख. ७. असंख्य. ८. मृदंग, पखवाज. ९. नगरवासी जन. १०. कामगति विमानांत, [बसणाऱ्याच्या] इच्छेस येईल तसें चालणाऱ्या विमानांत. ११. रामचंद्राचा पूर्वज जो हरिश्चंद्र त्याला. येथें हें नाम विशेष हेतूनें योजिलेलें आहे. हरिश्चंद्राप्रमाणेंच रामचंद्रानें अवतारसमाप्तीच्या वेळीं सर्व पुरजनांना आपल्या बरोबर वैकुंठास नेलें. तेव्हां 'रामपूर्वज' ही पदवी या रविकुलोत्पन्न हरिश्चंद्रास अगदीं साजेशीच आहे. **परिकरांकुर.** १२. वसिष्ठ. विश्वामित्र हरिश्चंद्राचा छळ करीत होता, त्या वेळीं वसिष्ठ गंगाजळांत ध्यानस्थ होता. यावरून मागें दुसऱ्या अध्यायांतील एकुणतिसाव्या गीतींतल्या 'जळगत' शब्दाचा अर्थ स्पष्ट होईल. १३. सुशील राजाचा छळ. १४. कोपे. १५. पुत्रांच्या मरणानें. वसिष्ठाचे शंभर मुलगे विश्वामित्रानें मारिले, या गोष्टीवर येथें कटाक्ष आहे. १६. गवत. **दृष्टान्त.** १७. हे पृथ्वि! १८. तुझा पाळक जो हरिश्चंद्र त्याचा छळ करणाऱ्यास. १९. हे विष्णुपत्नि पृथ्वि! २०. आपलें (=शांतीचें) उल्लंघन हाच अपराध. २१. दुर्दैव्या!

ऐसें शांतिसमुद्रहि तो सुतशतशोक साहता शापी. ॥ ४
ऐकुनि वसिष्ठमुनिवरदत्त महातापजनक शापातें, ।
गाधिजमन बहु तापे, जैसें जात्यश्वमन[2] कशापातें[3]. ॥ ५
प्रतिशाप[4] गाधिजहि दे, प्राकृतजन[5] ताडिल्या जसा ताडी; ।
कोपें म्हणे, 'वसिष्ठा! मच्छापें करुनि तूंहि हो आडी[6].' ॥ ६
ते तिर्यग्भावातें[7] तत्काळचि पावले महातेजे[8], ।
युद्ध[9] करिति, सर्वत्र ब्रह्मातें अनुभवें पहाते जे. ॥ ७
तो उच्छ्रितप्रमाणें[10] बक तीन[11] सहस्र षण्णवति गावें[11]; ।
द्विसहस्रयोजनोच्छ्रित[12] आडि खगहि[13] चित्रें[14] तच्चरित गावें. ॥ ८
गगनीं खग[13] नीरदसे[15] उडती, अन्योन्यदृष्टि वंचूनी[16]; ।
ताडिति परस्परातें ते पक्षी पक्षचरणचंचूंनीं[17]. ॥ ९
तत्पक्षपवनवेगें[18] उडति नग[19] नभीं, त्यजूनि जगतीतें; ।
स्त्रीतें मत्त[20] विट[21] तसे, कांपविती वर पडोनि मग तीतें[22]. ॥ १०
क्षोभुनि, मर्यादेतें लंघाया लागला नदनदीन[23]; ।
नगभीत[24] साधि[25] झाले जन ऊर्ध्ववदन[26], अधोवदन दीन[27]. ॥ ११
एकें पार्श्वें[28] लागे, आर्ता[29] होऊनि, भूमि मज्जाया[30]; ।
तैं जन न म्हणे, मद्गृह, मद्धन, मत्पुत्रभूमि, मज्जाया[31]. ॥ १२
तेव्हां सुरर्षिसहित ब्रह्मा येउनि म्हणे, 'अहो! मुनि हो! ।

---

१. या अर्धांत **विरोधाभास** आहे. २. जातिवंत घोड्याचें मन, तेजस्वी घोड्याचें मन. ३. चाबुकाच्या फटकाऱ्यानें. ४. उलट शाप. ५. साधारण, अज्ञ मनुष्य. ६. पक्षिनाम. ७. पक्ष्यांच्या रूपाला. ८. मोठा आहे प्रभाव ज्यांचा असे. ९. या अर्धाचा अन्वय:—जे अनुभवें (प्रत्यक्ष ज्ञानानें) ब्रह्मातें सर्वत्र पहाते (=पाहणारे) [=सर्व ठिकाणीं एकच ब्रह्म आहे असा ज्यांस अनुभव आला होता), [ते] युद्ध करिती. **विरोधाभास.** १०. उंचीच्या मापानें, उंचीनें. ११. तीन हजार शहाण्णव गांवें. गांव=चार कोस, एक योजन. १२. दोन हजार योजनें उंच १३. पक्षी. १४. विलक्षण. १५. मेघाप्रमाणें. १६. टाळून, चकवून. १७. पंख, पाय (=नखें) व चोंची यांनीं. १८. त्यांच्या पंखांच्या वाऱ्याच्या सोसाट्यानें. १९. पर्वत. २०. झिंगलेले. २१. जार, ठोले. २२. पृथ्वीतें. हा दाखला बराच **अश्लील** आहे. २३. नद+नदी+इन= समुद्र. इन=पति, नाथ. २४. [वर उडणाऱ्या] पर्वतांच्या योगानें घाबरलेले. २५. केशयुक्त. २६. वर वळविलेलें आहे तोंड ज्यांचे असे, वर पाहणारे. २७. खालीं पाहणारे लोक [त्या खवळलेल्या व मर्यादा उल्लंघूं पाहणाऱ्या समुद्राला पाहून] दीन झाले. २८. बाजूनें. २९. व्याकुळ. ३०. बुडायाला. ३१. माझी स्त्री.

तुमचा प्रलयानलसख कोप मुखीं विश्व हें न होमुनि हो.' ॥ १३
विनवी त्रिजगद्गुरु, परि करिती सुतपस्विपाळ समरचि ते, ।
झाले अत्युग्रत्वें भय विश्वमनांत काळसम रचिते. ॥ १४
तेव्हां भगवान् त्यांच्या त्या तिर्यग्भावरूप शापातें ।
वारी, रवि तिमिरातें, किंवा जैसा सुधांशु तापातें. ॥ १५
तामसभाव उडविला, आपुलिया प्रकटुनि प्रभावातें, ।
वाढविली शांति पुन्हा विधिनें, जैशी शिखिप्रभा वातें. ॥ १६
सुरमुनि वंदुनि, करितां तत्काळ स्वच्छ विप्र, यां गाती; ।
म्हणती, 'भजतां येती, गेली जी स्वच्छवि, प्रयागा ती.' ॥ १७
ब्रह्मा म्हणे, 'वसिष्ठा! गाधिसुता! वत्स हो! अहा! काय, ।
क्रोधें अनर्थ केला? उचित क्षोभासि या न हा काय. ॥ १८
स्वीकारिला कसा हो? क्रोध न कोणाहि तापसा मान्य, ।
तिर्यग्भाव तुम्हांला, कवि हो! हा काय ताप सामान्य? ॥ १९
हा होय विपाक हरिश्चंद्ररचितराजसूययज्ञाचा, ।
सर्वज्ञ असोनि, तुम्हीं केला व्यवहार काय अज्ञाचा? ॥ २०
आतां तुम्हीं कवींनीं त्यजुनि स्वक्रोधताप, समजावें; ।
सुविवेकें हृदयींचें हें वैर असेंचि पापसम जावें. ॥ २१
स्वर्गप्रद कौशिक हा त्या राजाचा, नव्हेचि अपराधी; ।
मज या सत्पुरुषाची विदित असे जेविं, तेविं न परा, धी. ॥ २२

---

१. प्रळयाग्नीचा सोबती. २. न होवो. या अर्धाचा अन्वयः—तुमचा कोप हें विश्व [आपल्या] मुखीं होमुनि (=भस्म करून) प्रलयानलसख न हो. ३. ब्रह्मा. ४. तापसश्रेष्ठ. ५. भांडण. ६. या अर्धाचा अन्वय—[ते] अत्युग्रत्वें विश्वमनांत काळसम भय रचिते झाले. ७. ब्रह्मा. ८. पक्ष्याचें रूप ज्यानें प्राप्त झालें होतें, अशा शापाला. ९. चंद्र. १०. तमोगुणी प्रकृति, राग. ११. नाहींसा केला. १२. अग्नीची कांति. १३. ब्रह्मदेवाला. १४. अर्धाचा अन्वयः—म्हणती, 'जी स्वच्छवि (=आपलें तेज) गेली, ती प्रयागा भजतां येती.' १५. देह. १६. पक्ष्यांचें रूप. १७. त्रास, क्लेश. १८. साधारण. १९. परिणाम. पाठभेदः—विलाप. २०. हरिश्चंद्रानें केलेल्या राजसूय यज्ञाचा. २१. मूर्खांचा आचार. २२. शाहाण्यांनीं. २३. समजुतीला यावें, वळणीस यावें. २४. तावडतोब. 'तूं जरा थांब, मी असाच परत येतों' या वाक्यांत 'असाच' ह्या शब्दाचा प्रयोग 'झटकन्' या अर्थींच आहे. २५. स्वर्गवसतीचा लाभ करून देणारा. २६. अर्धाचा अन्वयः—या सत्पुरुषाची धी(=बुद्धि, मनोवृत्ति) जेविं मला विदित असे, तेविं परा(=दुसऱ्यास) न [असे].

ज्या शाणघर्षणादिक[1] संस्कार, चढे गुणासि[2] तोचि मणी; ।
यश संगरेंचि पावे; पंजरबद्धाहि काय हो! चिमणी? ॥ २३
कामक्रोध तपाचे नाशक, या भिडनि अंतरायांतें[3], ।
जे सावधान[4] वर्तति[5], धन्यपण तयांचि संतरायांतें. ॥ २४
हें ब्रह्मकर्म[6] दुष्कर, संरक्षण तों सुदुष्करचि आहे, ।
कीं यांत च्छळ पुष्कळ, जो सावध, तोचि शुद्ध यश लाहे.' ॥ २५
एवंविध **वि**धिबोधें बहु तापसराज लाजले हो! ते; ।
अमृतें[7] झाले स्वस्थ, द्रुमवरचि[8] देवांत[9] भाजले होते. ॥ २६
करिती, अन्योन्यांतें आलिंगुनि, ते क्षमापन[10] ज्ञानी; ।
कीं अयशोर्थ[11] दुराग्रह धरिजेतो[12], न समजोनि, अज्ञांनीं. ॥ २७
रक्षी यापरि **भ**गवान् सर्वांचा मायबाप तोकांतें[13]; ।
व्यसन न हरील कैसा? बाधों देईल तोंप तो कां ते[14]? ॥ २८
**गा**धिज, **व**सिष्ठ नमिती; स्तविती, स्तुति रचुनि बहुविधा, त्यातें; ।
जें सर्जनें[15], तयाहुनि यश झालें प्राप्त बहु **वि**धात्यातें. ॥ २९
**कौ**शिक, **व**सिष्ठ, भिजवुनि अन्योन्य प्रेमबाष्पवर्षानें[16], ।
स्वस्वाश्रमासि गेले, भेटूनि पुन्हा, पुसोनि हर्षानें. ॥ ३०
मग जगदाद्य प्रभु[17] तो गेला सुरसंस्तुत[18] स्वलोकातें[19], ।
परिहरुनि त्रिजगाच्या दुष्परिहर[20] दुःसहोग्र शोकातें. ॥ ३१
श्रीरामसुत **मयू**रें लिहुनि अशी सुकृतिजनकथा[21], बुद्धी ।
पुण्यश्लोका[22] वाहिलि, बहु ज्याच्या होय पूजनें शुद्धी. ॥ ३२

---

१. सहाणेवर घासणें वगैरे. २. गुणांनीं श्रेष्ठ होतो. ३. विघ्नांना. ४. सावधपणानें, हुशारीनें. ५. वागतात. गीति २३ व २४ यांत **अप्रस्तुत प्रशंसा**लंकार असून त्या **सुभाषितरूप** आहेत. ६. भगवद्गीतेंत ब्रह्मकर्माची व्याख्या अशी केली आहेः—'शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च । ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम्' ॥ (१८।४२). ७. पाण्यानें. ८. मोठे वृक्ष. ९. वणव्यांत. **उत्प्रेक्षा.** १०. [परस्परांची] क्षमा मागणें. ११. केवळ अपकीर्ति मिळविण्यासाठीं. १२. मूर्खांकडून धरिला जातो. **सुभाषित.** १३. मुलांना. १४. त्रिताप, आधिदैविक, आधिभौतिक, व आध्यात्मिक. या तीन तापांचें वर्णन समर्थ रामदासांनीं आपल्या दासबोधांत अगदीं सविस्तर केलें आहे. १५. सृष्टि निर्माण केल्यानें. १६. प्रेमाश्रूंच्या वर्षावानें. १७. ब्रह्मा. १८. देवांनीं स्तविलेला. १९. आपल्या स्थानाला, सत्यलोकाला. २०. ज्याचें निवारण कष्टसाध्य आहे असा. २१. पुण्यवान् लोकांची कथा. २२. पवित्र आहे कीर्ति ज्याची अशा विष्णूस.

## ४. अंबरीषाख्यान.

(साकीछंद.)[2]

यश भुवनवनवसंतांचें[3] । गावें नव नव संतांचें. ॥ ध्रु० ॥

रविवंशीं अंबरीष राजा होता भगवद्भक्त, ।
विषयविरक्त, द्विजदेवचरणपरिचरणीं[4] आसक्त[5]. ॥ १
तो 'साधनद्वादशी'[6] नामें व्रत आरंभी नेमें; ।
आचरला भगवत्प्रीत्यर्थी[7] नृप वर्षभरि प्रेमें. ॥ २
विहितव्रतावसानीं[8] भगवान् दुर्वासा मुनि आला, ।
'जेवुनि धन्य करा मज,' ऐसें राजा विनवी त्याला. ॥ ३
मान्य करोनि स्नान कराया यमुनातीर्थी[9] गेला, ।
अघमर्षणीं[10] बृहद्ध्यानपरें[11] तेणें विलंब केला. ॥ ४
नियतपारणासमयलंघनें[12] हानि व्रतास होय, ।
यास्तव तेव्हां तो नृप सेवी श्रुतिसाधुमतें[13] तोय[14]. ॥ ५
जलपानीं निजलंघन[15] मानुनि, तो मुनि कोपा पेटे; ।
कोप नव्हे, तो साक्षान्मारुत[16] या दैवदहना[17] भेटे. ॥ ६

१. याच आख्यानावर पंतांनीं 'भक्तभूषण' नांवाचें दुसरें एक विस्तृत व अत्यंत मधुर काव्य
षवृत्तांत रचिलें आहे. तें काव्यसंग्रहांत मोरोपंती स्फुटकाव्यांच्या दुसऱ्या भागांत छापिलें
. २. साकीच्या प्रत्येक अर्धांत, चार मात्रांचा एक गण, असे सात गण म्हणजे २८ मात्रा
तात. चवथ्या गणाच्या अंतीं म्हणजे सोळाव्या मात्रेवर यति असतो. हा नियम पंतांनीं
जीपूर्वक पाळिला आहे. परंतु साकी सरळ सुलभतेनें म्हणतां येण्याला, दुसऱ्या गणाच्या अंतीं
जे आठव्या मात्रेवरही यति बहुतेक अवश्यच आहे; तो न साधल्यामुळें साकी म्हणायाला
जड जाते, हें या प्रकरणांतील २,४,२२,२५,२९,४० इत्यादि साक्यांवरून स्पष्ट होईल. ३. वि-
प अरण्यास (सुखदानानें) फुलविणाऱ्या वसंतांचें. याचा संबंध 'संतांचें' या पदाशीं. ४. ब्राह्मण
व यांच्या पादसेवेंत. ५. गढलेला, रमलेला. ६. दशमीस एकवेळ हविष्यान्नभक्षण, एकादशीस
क्र व द्वादशीस सूर्योदयीं भोजन, हीं या व्रतास अवश्य आहेत. ७. ईश्वरप्रसाद व्हावा अशी
धरणारा. ८. व्रताच्या योग्यसमाप्तीच्या वेळीं, पारणें सोडण्याच्या सुमारास. ९. यमुनेच्या
ांत. १०. पापक्षालनविधींत, जपकर्मांत. ११. ब्रह्मचिंतनांत गढलेल्यानें. १२. पारण्याचा
लेला वेळ टळल्यानें. १३. वेदशास्त्र व सज्जन यांच्या अनुमतानें (=सल्ल्यानें). १४. पाणी.
.आपला अतिक्रम, उपमर्द, अपमान. १६. प्रत्यक्ष वारा. या अर्धांत **अपह्नुति** व **रूपक** यांचा
र आहे. १७. वणव्याला.

दंडाहत[1] अहिंसा तो उष्ण श्वास महात्मा सोडी, ।
भस्म नृपासि कराया स्वजटा कोपावेशें तोडी. ॥ ७
त्या मुनिराजजटेची झाली परम भयंकर कृत्या[2], ।
धांवे भस्म कराया भुजगी[3] तैशी श्रीहरिभृत्या[4]. ॥ ८
तों प्रभुभक्तत्राणानलस[5] प्रभुचें[6] धांवे चक्र, ।
भस्म करी कृत्येला, पाहे जी साधुकडे वक्र. ॥ ९
कृत्येची गति पाहुनि तो मुनि घेउनि धाक पळाला, ।
लागे मागें चक्र, प्रभुमत[7] विप्र म्हणुनि न जळाला. ॥ १०
धांवे चक्रभयें प्राणार्थी[8] मुनि, होउनि हतदर्प[9], ।
जैसा गरुडभयानें गरुडापत्यागस्कर[10] सर्प. ॥ ११
लोकत्रयीं शरण्य[11] न भेटे, मग विधिसमीप[12] गेला, ।
'शरणागतमव मामीश[13]!' असें प्रार्थुनि, वंदुनि ठेला. ॥ १२
द्रुहिण[14] म्हणे, 'तुज चक्रापासुनि रक्षाया मी न शकें, ।
शशकें[15] सिंह कसा वारावा? कीं पक्षीश्वर[16] मशकें[17]?' ॥ १३
शरणागतही हरिजनवैरी[18] विधिनें त्यजिला स्पष्ट, ।
नष्टप्रज्ञ[19] ब्राह्मण तेव्हां पुष्कळ पावे कष्ट. ॥ १४
मग तो मुनि कैलासीं जावुनि, काळाच्या काळाला, ।
'शरणागतमव मामीश!' म्हणे भूतप्रतिपाळाला[20]. ॥ १५
मृत्युंजयहि[21] म्हणे, 'वाराया दुर्बळ मी यो अरिला[22], ।
याहुनि अन्या वारीन तुझ्या काळात्[23]युग्रा अरिलों[24].' ॥ १६

---

१. दांडक्यानें बडविलेल्या. २. राक्षसी. ३. नागिणीप्रमाणें. ४. विष्णुभक्ताला. ५. विष्णूच्या (=देवाच्या) दासाचें रक्षण करण्याविषयीं अगदीं निराळशी असें. हें चक्राचें विशेषण. ६. विष्णूचें सुदर्शन. ७. ब्राह्मण विष्णूला प्रिय आहेत, म्हणूनच दुर्वासा जळून खाक झाला नाहीं. ८. जीव वांचवूं इच्छिणारा. ९. ज्याचा दर्प (=मान, गर्व) गळाला आहे असा. १०. गरुडाच्या पिल्यांची खोड काढणारा. ११. आसरा देणारा, आधार, रक्षणकर्ता. १२. ब्रह्मयाजवळ. १३. हे ईश ! शरणागतं माम् (=शरण आलेल्या मला) अव (=तार). १४. ब्रह्मा. १५. सशानें. १६. गरुड. १७. चिलटानें; घुंगुर्ड्यानें. **दृष्टान्त.** १८. विष्णुभक्तांचा शत्रू. १९. ज्याची बुद्धि नाहींशी झाली आहे असा, भांबावलेला, वेडावलेला, वैतागलेला. २०. सर्व जीवकोटीचें रक्षण करणाऱ्याला; किंवा पिशाचपति शंकराला. भूत=उत्पन्न झालेली वस्तू; किंवा पिशाच. २१. काळास जिंकणारा शंकर. हें नांव सहेतुक योजिलें आहे, म्हणून **परिकरांकुर.** २२. चक्राला. २३. यमाहून भयंकर अशा. २४. शत्रूला.

केली स्पष्ट उपेक्षा त्याची जैशी [1]पद्मभवानें, ।
परि [2]भवरोगचिकित्सकपतिचें कथिलें [3]सद्म [4]भवानें. ॥ १७
[5]वैकुंठीं जाउनि, जोडुनि कर, मुनि वैकुंठासि म्हणे, ।
'शरणागतमव मामीश! हरे! सकृप! [6]वरदमूर्धमणे!' ॥ १८
शरणागतवत्सलहि, प्रभुहि, [7]ब्रह्मण्यहि, परि हरि तो ।
[8]सच्छलकासि उपेक्षी, जरि [9]निर्जरिपुभवही परिहरितो. ॥ १९
विष्णु म्हणे, 'म्यां काय करावें येथें ताप सराया? ।
[10]तांप सरा यादा एक, तसा तुज मज, तापसराया! ॥ २०
शरणागत रक्षावा उचितचि, परि म्यां [11]भक्ताधीनें ।
[12]व्रतप्रभुत्वहि भक्तांसि दिलें [13]स्वीकृतभक्ताधीनें. ॥ २१
विश्वाचे, माझे, प्रभु संतचि; मजवरि त्यांची सत्ता, ।
सत्ता नसती, तरि सोसवती कशि [14]संतांची लत्ता? ॥ २२
मजवरि माझी सत्ता नाहीं; [15]कैंची चक्रावरि ती? ।
[16]सद्वृत्ता सत्कीर्ति मज, हरा, ब्रम्ह्या, शक्रा वरिती. ॥ २३
मज [17]बहुमत संतचि; न हर, न विधि, न बहुमता हे [18]कमला; ।
किंबहुना न बहुमता माझी मज हे मूर्तिहि [19]अमला. ॥ २४

---

१. ब्रह्मयानें. २. संसाररूप रोग नाहींसा करणाऱ्या श्रेष्ठ वैद्याचें, विष्णूचें. पाठभेद—'परिभवरोगचिकित्सक पतिचें.' ३. घर. ४. शंकरानें. ५. विष्णूला. ६. वर देणाऱ्यांच्या शिरोमणे! वरदात्यांतील श्रेष्ठा! ७. ब्राह्मणास मान देणारा. या साकींत कार्यक्षम अशीं अनेक कारणें असतांही कार्योत्पत्ति झालेली नाहीं, ह्मणून **समुच्चय** व **विशेषोक्ति** असे दोन अलंकार झाले आहेत. ८. सज्जनांचा छळ करणाऱ्यास. ९. आपल्या शत्रूचा सुद्धां संसारबंध. ज्या शत्रूंचा विष्णूच्या हातून अंत झाला, ते मोक्षपद लाभून संसारचक्रांतून सुटले, या गोष्टीकडे येथें लक्ष्य आहे. १०. सरा यादा एक ताप= सरोवराचा व त्यांतील जलचरांचा ताप एकच; सरोवराला ताप झाला म्हणजे तो त्या सरोवरांतील मत्स्यादिकांनाही झाला म्हणावयाचा. **दामयमक.** ११. भक्तांच्या कह्यांत असणारा जो त्यानें. १२. शरणागतांचें रक्षण करण्याचें जें ब्रीद, त्याचा अधिकार सुद्धां. १३. भक्तांचें दुःख ज्यानें आपल्यावर ओढून घेतलें आहे त्यानें, दासांच्या दुःखांचा भार ज्यानें पतकरिला आहे त्यानें. १४. विष्णूचें सत्व पाहण्यासाठीं भृगूनें त्याच्या छातींत लाथ मारिली व विष्णूनें न रागावतां उलट भृगूचे पाय चेपले, या कथेवर येथें अनुसंधान आहे. (मोरोपंतकृत स्फुट प्रकरणें, भाग २ रा, भृगुचरित्र पहा.) १५. **काव्यार्थापत्ति**नामक अलंकार. १६. योग्य मार्गानें जाणाऱ्या, सुवर्तन ठेवणाऱ्या. १७. मान्य, प्रिय. १८. लक्ष्मी. १९. निर्मळ, शुद्ध. या साकींत **सार**नामक अलंकार आहे; कारण हरविधिप्रभृति वस्तूंत गुणांची क्रमाक्रमानें चढती कडी आहे.

शरणागतरक्षणदक्ष प्रभु संतचि हरिती तापा; ।
संत क्षमादयाशांतीचे सागर विनवीं, बापा! ॥ २५
जनतापा [1]अमृतकरद्वारा [2]तपनाचा [3]कर हरितो, ।
माझा प्रसाद साधुद्वारा तैसा, लाभे जरि तो. ॥ २६
[5]मदतिक्रम [6]चक्रक्षोभाचा कीं [7]सदतिक्रम हेतू? ।
[8]जेथें भेटल जल, बांधावा प्राज्ञें तेथें सेतू.' ॥ २७

श्रवण करुनि भगवद्वचन असें मुनि वैकुंठीं न [9]टिके, ।
'संतचि सत्य शरण्य' म्हणे तो, 'तदितर सर्वहि लटिके.' ॥ २८
शरणार्थी संवत्सरभरि तो मुनि सर्वत्र भ्रमला, ।
गेला साधुप्रति [10]नौदंडांप्रति खग तैसा गमला. ॥ २९
'शरणागतमव मामार्य!' असें वदत, नृपाच्या जवळी ।
जाय पाय वंदाया, [11]तों नृप त्यासि भुजांनीं [12]कवळी. ॥ ३०
बसवुनि वरासनीं मुनिला, नृप चक्राला कर जोडी; ।
पीडित पाहुनि, पीडा पावे बहु [13]संतचि, तो [14]थोडी! ॥ ३१
भूप म्हणे, 'सासूचें धरिती जैसें सुमति सुना [15]भें, ।

---

१. चंद्राच्या मार्फत. चंद्राला सूर्य प्रकाशित करितो, ही गोष्ट पंतांस पूर्णपणें ठाऊक होती, हें यावरून अगदीं उघड आहे. (मोरोपंती स्फुट प्रकरणें भाग २ रा, भक्तभूषण, श्लोक १०० पहा.) २. सूर्याचा. ३. किरण. ४. ही **उपमा** फारच सुंदर आहे. ५. माझा उपमर्द, अपमान; माझी अवहेलना. ६. चक्राचे रागाचें कारण. ७. सज्जनाचा—सद्भक्ताचा—अपराध, उपमर्द. ८. 'ज्या ठिकाणीं मार्गांत पाणी लागेल, त्या ठिकाणींच शाहण्यानें पूल बांधावा. इतरत्र पूल बांधून काय फायदा? तसेंच, जर या चक्राच्या रागाचें कारण सद्भक्ताचा उपमर्द आहे, तर त्या भक्ताचें आराधन करणेंच योग्य. उगीच माझ्याजवळ तोंड वेंगाडून काय होणार?' हा विष्णूचा मतलब. **दृष्टान्त.** ९. थारे, उभा राही. १०. डोलकाठीवर. काव्येतिहाससंग्रहांत 'वल्ह्यावर' अशी टीप आहे. ही **उपमा** फारच सुरेख आहे. भरसमुद्रांत एकाद्या तारवांतून सोडलेला पक्षी ज्याप्रमाणें अफाट सागरावर आश्रय मिळविण्यासाठीं बराच वेळ सारखी भ्रमंती करून, अखेर त्याच तारवाच्या डोलकाठीवर विश्रांतीसाठीं येऊन बसतो, त्याप्रमाणेंच दुर्वासानें प्राणत्राणार्थ सर्व त्रिभुवनांत पायपिटी करून, तो अखेर मूळ ठिकाणीं म्हणजे अंबरीषाकडेच आश्रयार्थ परत येऊन ठेपला. ११. काव्येतिहाससंग्रहाचा पाठः—तो. १२. मिठी मारी, आलिंगी. १३. सज्जन, अंबरीष. १४. पीडित, दुर्वासा. हें पद्यार्ध **सुभाषित** असून, यांत **असंगति**-नामक अलंकार आहे, कारण पीडित एक व अत्यंत वेदना भोगणारा दुसराच असें वर्णन आहे. १५. भीति, भय. या अर्धांतील 'सुमति' हें विशेषण हेतुगर्भ असल्यामुळें **परिकरालंकार** झाला आहे.

तैसें द्विज भय जरि धरित [1]असे, द्यावें अभय [2]सुनाभें. ॥ ३२
मजपर्यंत रविकुलज नृप जरि धर्मन्यायाचरणीं ।
चुकले नसतील स्वप्नींही [3]गुरुविप्रांच्या [3]चरणीं, ॥ ३३
[4]श्रुतिसाधूदित शक्य [5]विहितें म्यां केलें असेल कार्य, ।
तरि त्या पुण्यें सुदर्शना! त्वां रक्षावा हा आर्य. ॥ ३४
[6]प्रणताभयदमुकुंदबहुमता! चक्रा! द्विज रक्षावा; ।
हें जरि करणें नसेल, आधीं [7]अंबरीष भक्षावा. ॥ ३५
[8]स्वापत्यावरि [9]हितकाम पिता किंवा माता क्षोभे? ।
[10]तदधिककृप नृप त्यासि दंडितां, तो न सुनाभा! शोभे.' ॥ ३६
ऐसें [11]प्रांजलि सज्जन वदतां, चक्र प्रभुचें शमलें, ।
झालें शान्त सुदर्शन [12]सद्वागमृतेंचि, असें गमलें. ॥ ३७
पाद्यें, अर्घ्यें, स्नानें, वस्त्रें, गंधें, [13]दीपें, [13]धूपें, ।
पूजुनि, जेवविला मुनि, केलें भोजन मग त्या भूपें. ॥ ३८
मुनि [14]हनु [14]धरुनि म्हणे, "हें सद्यश लोकीं संतत राहो, ।
तारुनि जड जीव [15]भवांत तुम्ही [16]सुकृती संत तरा हो!" ॥ ३९
भक्त [17]मयूर, देव करुणावन दासाचा अभिमानी, ।
[18]स्वातिक्रमापरीस [19]स्वजनातिक्रम दुःसह मानी. ॥ ४०

---

१. काव्ये०संग्रहपाठ–असो. २. सुदर्शनचक्रानें. 'सुनाभ' हा बहुव्रीहि समास आहे; सु=सुंदर आहे नाभि (=मध्य, तुंबा) ज्याचा असें, हा त्याचा विग्रह. ३. गुरुजी व ब्राह्मण यांच्या चरणीं (=चरणसेवेंत). ४. श्रुति (=वेदशास्त्र) व साधु यांनीं सांगितलेलें. ५. योग्य. ६. शरण आलेल्यास अभय देणारा जो विष्णू, त्याच्या आवडत्या! हें विशेषण हेतुगर्भ असल्यामुळें **परिकर.** ७. काव्ये० संग्रहपाठ:–अंबरिषचि. ८. खुद्द आपल्या स्वतःच्या मुलावर. ९. (मुलाचें) हित व्हावें अशी ज्याची इच्छा आहे असा. १०. आईबापांहूनही अधिक आहे कृपा ज्याची असा, मातापितरांहून जास्त दयाळू. ११. जोडली आहे अंजली ज्यानें असा, हात जोडलेला, सविनय, नम्र. १२. सज्जनाचें भाषण हेंच अमृत, त्यानें. १३. काव्ये० संग्रहपाठ:–धूपें दीपें. १४. हनुवटी धरणें हें प्रेमाचें, लडिवाळपणाचें व प्रसन्नतेचें चिन्ह आहे. 'दाढीस हात लाविणें' हें मात्र मिनतवारीचें व गयावया आल्याचें लक्षण आहे. १५. संसारांत. १६. सत्कृत्य करणारे, सदाचारी. १७. मोर; (पक्षीं) मोरोपंत. या अर्थांत **परं० रूपक** आहे. १८. स्वतःच्या उपमर्दापेक्षां. १९. आपल्या भक्तांचा उपमर्द.

## ५. दत्तचरित्र.[1]

(साकीवृत्त.)

महिमा साध्वीचा[2] परिसा,[3] गातां उद्धरितो हरिसा.[4] ॥ ध्रु० ॥
होता कौशिक विप्र क्रोधी, अतिवृद्ध, गलितकुष्ठी,[5] ।
तन्मन[6] सती धराया न शके, पाऱ्याला जसि मुष्टी.[7] ॥ १
निधिला[8] लुब्ध[9] तसी फार जपे, परि तो उगाचि गांजी.[10] ।
चित्तींहि[11] सती न म्हणे, 'छळितां दोषांवांचुनि[12] कां? जी!' ॥ २
बहुबीभत्सहि[13] साध्वीला दे पतिचें न वपु[14] त्रास. ।
प्रेमभरें प्रतिपाळी[15] जैसी जननी[16] नव[17] पुत्रास. ॥ ३
तो स्त्रीस म्हणे, 'मार्गीं जातां आजि निरखिली गणिका,[18] ।
ती मदनाग्निज्वाला[19] झाली, माझी धृति[20] घृतकणिका.[21] ॥ ४
त्वत्कर[22] तिच्या प्रसादार्थ[23] तिला तत्प्रिय[24] बहुविध वाहो,[25] ।
नाहीं तरि आतांचि मला जळ[26] सोडुनि, तूं विधवा हो.' ॥ ५
त्या संकटीं तिचें तीस म्हणे व्रतपुण्य,[27] 'न कांपो हे.[28]' ।
बुडत्याहि[29] जडा[30] वाहुनि, नौका[31] जलधींत[32] न कां पोहे? ॥ ६

---

१. हें प्रकरण मार्कंडेय पुराणांतील 'दत्तात्रेयमाहात्म्य'नामक सोळाव्या अध्यायाच्या पूर्वार्धावरून पंतांनीं रचिलें आहे. २. पतिव्रतेचा. ३. ऐका. ४. विष्णूसारखा. ५. ओली रक्तपिती ज्याच्या अंगावर आहे असा, महारोगी. ६. कौशिकाचें मन. मन धरणें=मन संतुष्ट ठेविणें, मनधरणी करणें, मर्जी संभाळणें. ७. मूठ. ८. द्रव्याच्या ठेव्याला. ९. लोभी मनुष्य. १०. पीडा देई. ११. मनांतहि. १२. अन्यायावांचून. या अर्धाचा भावार्थ—अन्याय केला नसतां उगीच कां पीडतां, असें ती मनांतही आणीत नसे. १३. रोगामुळें अत्यंत किळसवाणें व हिडीस झालेलेंही. १४. शरीर. येथें कारणसामग्री असूनही कार्योत्पत्ति झाली नाहीं, असें वर्णन आहे, म्हणून **विशेषोक्ति.** १५. पालन करी. १६. माता. १७. नूतन. १८. वेश्या. १९. मदनरूप अग्नीची ज्वाला. २०. धैर्य. २१. तुपाचा कण. अग्निज्वालेंत तुपाचा कण जसा तेव्हांच खाक होतो, तद्वत् तिला पाहून माझें धैर्य अगदीं बेचिराख झालें आहे, हा भाव. **परं० रूपक.** २२. तुझा हात. २३. कृपेस्तव. २४. तिचे आवडते (पदार्थ). या अर्धाचा अन्वय—तिच्या प्रसादार्थ त्वत्कर तिला बहुविध तत्प्रिय वाहो. याचा भावार्थ—त्या वेश्येला तिचे आवडते पदार्थ तूं आपल्या हातानें देऊन, तिला प्रसन्न करून घे. २५. देवो. २६. जळ सोडणें=तिलांजलि देणें, उत्तरक्रिया करणें, जीवाची आशा सोडणें. **लोकोक्ति.** सबंध गीतींत **विकल्प.** २७. पातिव्रत्याचें पुण्य. २८. ही सती. २९. बुडणाऱ्यालाही. ३०. जड—भारदस्त—पदार्थाला. ३१. नाव. ३२. समुद्रांत. **प्रतिवस्तूपमा.**

स्कंधीं[1] स्थापुनि[2] पतिला, माथां[3] वाहुनि अर्थ[4], निघाली, ।
निःशंक[5] तमीं[6] साध्वी जैसी तत्पतिबुद्धि[7] रिघाली[8]. ॥ ७
लागे पाय तयाचा शूलप्रोता[9] मांडव्याला[10] ।
जेविं अकस्मात् आसन्नमरणकरगत कांडें[11] व्याला[12]. ॥ ८
'जेणें चाळविलें[13] मज शूळीं, जो निर्दय बहु पापी, ।
सूर्योदय होतांचि मरो तो.' मुनिपति[14] ऐसें शापी. ॥ ९
मुनिच्या शापें कांपे साध्वी जैसी वातें[15] कदली[16], ।
'पाहों बरें, कसा रवि[17] उदया येतो.' ऐसें वदली. ॥ १०
उगवेनाचि[18] सतीच्या तेजें देव तपन[17] कांपविला[19], ।
मग भंगील अशा साध्वीचें दिव्य[20] तप[21] न कां पविलो[22]? ॥ ११
व्याकुळ[23] करी महासंकट तें गुरुतें[24] सशतमखातें[25]. ।

१. खांद्यावर. २. बसवून. ३. मस्तकावर. ४. द्रव्य. ५. न भितां. ६. काळोखांत, (पतिबुद्धिपक्षीं) पातकांत. **श्लेष.** ७. तिच्या पतीची (कौशिकाची) बुद्धि. ८. शिरली. येथें 'रिघाली' या क्रियेचा 'साध्वी' व 'बुद्धि' या पदार्थांशीं अन्वय करणें असून, हे दोन्ही पदार्थ प्रस्तुत आहेत, म्हणून **तुल्ययोगिता.** ९. शूळावर चढविलेल्याला. १०. ऋषिविशेष. हा ऋषि एकदा आपल्या आश्रमासन्निध वृक्षाखालीं तप करीत असतां, कांहीं चोर द्रव्य चोरून पळत तेथें आले. त्यांच्या मागून राजाचे द्रव्यरक्षक आले, तेव्हां ते चोर तेथेंच द्रव्य टाकून आश्रमांत लपून राहिले. ते रक्षक आल्यावर, त्यांनीं मांडव्यास चोर कोठें गेले? म्हणून विचारिलें, पण त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. म्हणून आश्रम शोधून पहातां, तें द्रव्य व चोर त्यांस तेथेंच आढळले. मग राजपुरुषांनीं त्या द्रव्यासह चोर व मांडव्य यांस बांधून राजापुढें नेऊन उभे केलें. तेव्हां राजानें त्या सर्वांस सुळीं देण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें सर्वांस सुळीं देण्यांत आलें; परंतु त्या सुळावरही मांडव्य तप करूं लागला. तेव्हां तेथें अन्य ऋषींनीं येऊन त्यांस विचारिलें कीं, 'तुम्हीं असें दुःख कां सोशितां?' तेव्हां मांडव्यानें, 'म्हटलें मी कोणालाही दोष देत नाहीं. मी पूर्वजन्मीं पोरवयांत एका किड्याला कांट्यानें बोचबोचून असेंच दुखविलें होतें. तें प्राक्तन दुष्कर्मच मला आतां कष्टवीत आहे. तेव्हां चोरी न करितांही जरी मला शिक्षा झाली आहे, तरी त्याचा दोष मी इतरांस देऊं शकत नाहीं.' ही सर्व हकीकत रक्षकांनीं राजास जाऊन सांगितली, तेव्हां राजा मंत्र्यांसह तेथें आला व ऋषीची क्षमा मागूं लागला. तेव्हां ऋषि प्रसन्न झाला. मग राजानें त्यास सुळासुद्धां खालीं काढविलें व सूळ ओढून काढवीत असतां निघेना, म्हणून तो तोडून काढविला. परंतु सुळाचा अंश पोटांत राहिला; तरी मोठें तप करून मांडव्यानें उत्तम लोक मिळविला. यापुढें त्यास अणिमांडव्य म्हणूं लागले. ११. ज्याचें मरण जवळ ओढविलें आहे, अशाच्या हातांतील दांडा. १२. सर्पास. १३. त्रास दिला. १४. मुनिश्रेष्ठ मांडव्य. १५. वाऱ्यानें. १६. केळ. १७. सूर्य. १८. उगवला नाहींच. १९. भिवविलेला. २०. अद्भुत. २१. तेज, पुण्यप्रताप. २२. वज्राला. **काव्यार्थापत्ति.** २३. विव्हल. २४. बृहस्पतीतें. २५. इंद्रासह. याचें विशेष्य 'गुरुतें.'

मुनिहि म्हणे, 'भी[1] न जगा बुडवो, रवितें सश[1] तम खातें.' ॥ १२
विधिला[2] विनवुनि शक्र[3] म्हणे, 'हा न घडो प्रलय[4] अकाळीं[5], ।
व्हावीं आम्हां लोकपतींचीं[6] अयशें[7] मुखें न काळीं[8].' ॥ १३
ब्रह्मा म्हणे, 'अमर हो[9]! तेजें तेज, तपें तप शमतें; ।
मग[10] तें भय वारिल अनुसूया[11] निजसुकृतें[12] विश्वमतें[13].' ॥ १४
कंजज[14], हरि, हर सकळ दिगीश्वर[15], झाले मुनि एकवट[16], ।
सुरगण[17] मार्कंडेयचि[18], अत्रिपरिग्रह[19] तो एक वट[20]. ॥ १५
सर्वांतेंही पूजुनि सुखवी, जैसी भगवल्लीला[21]; ।
देइल देवांच्या लाज न कां बहु ती मग वल्लीला[22]? ॥ १६
अनुसूया बोले, 'न मला गौ[23], निजकरुणा[24] परमा[25] गौ; ।
आलां ज्याकरितां, तो, सोडुनि शंकेला, वर मागा.' ॥ १७
देव म्हणति, 'सूर्योदय व्हावा, आम्हां दे हाच वर; ।
शोभउ तुझ्या व्रतीं[26] यश[27], जैसें सत्प्रभुदेहा[28] चवर[29]. ॥ १८
'समजाउनि कौशिकपत्नीतें[30], करिल्यें तुमच्या कार्या.' ।
कथुनि असें, स्वपतिमतें भेटे शीघ्र[31] तिला[32] ती आर्या[33]. ॥ १९
मातेनें सुखवावी, अर्पुनि निजसर्वस्वा[34], दुहिता[35], ।
अनुसूयेनें तसि तोषविली, कथुनि कथा[36] स्वादु[37] हिता[38]. ॥ २०

---

१. अन्वयार्थ—भी (भीति, भय) जगा न बुडवो [=कसें तरी जगाचें संकटापासून रक्षण होवो], [कारण] तम (अंधकार) रवितें सश (स+श=सह+सुख, सुखासह) खातें [अंधार सूर्याला न गिळतो, इतकेंच नाहीं, तर सर्व प्रकारच्या सुखांनाही तो गिळून टाकीत आहे]. २. ब्रह्मदेवाला. ३. इंद्र. ४. कल्पांत. ५. अयोग्य वेळीं. ६. इंद्रादि लोकपाळांचीं. लोकपाळांचीं नांवें—इंद्रो वन्हिः पितृपतिर्नैरृतो वरुणो मरुत् । कुबेर ईशः पतयः पूर्वादीनां दिशां क्रमात् ॥ १ ॥ ७. अकीर्तीनें. ८. मलिन. ९. देवहो. १०. तेव्हां, म्हणून. ११. अत्रिस्त्री. १२. आपल्या पुण्यानें. १३. सर्वांना मान्य, पूज्य अशा (पुण्यानें). १४. ब्रह्मदेव. १५. दिक्पाळ. १६. एकत्र. १७. देवसमुदाय. १८. ऋषिविशेष. १९. अत्रीची स्त्री, अनसूया. येथें **'प'** वर यति आल्यामुळें **यतिभंग** झाला आहे. २०. वड. एकदा प्रळयकालीं जगबूड झाली असतां, मार्कंडेय ऋषि एका वटवृक्षाचा आश्रय करून राहिले होते, अशी कथा आहे. तीवर कटाक्ष ठेवून, येथें कवीनें **परंपरितरूपक** साधिलें आहे. २१. भगवंताचें चरित्र. २२. कल्पलतेस. **प्रतीप.** २३. स्तवा, प्रशंसा. २४. आपली कृपा. २५. मोठी. २६. सतीव्रताला, पातिव्रत्यास. २७. कीर्ति. २८. चांगल्या राजाच्या शरीरास. २९. चवरी. ३०. कौशिकाच्या स्त्रीतें. ३१. त्वरित. ३२. कौशिकस्त्रीस. ३३. अनसूया. ३४. आपल्या सर्व द्रव्यास. ३५. कन्या. ३६. गोष्टी. ३७. गोड, मधुर. ३८. हितकारक. याचें विशेष्य 'कथा.'

तीस पुसे, 'होतें कीं पतिमुख सुखद[1] सदा नवनवसें? ।
नैमिषनंदन[2] पतिपदचि[3], वरुनि[4] इतर कदा न वन वसें. ॥ २१
सकळांही देवांहुनि अधिकचि मानिसि कीं तूं पतितें? ।
पतिसेवा जें कांहीं देती, नेदी[5] सुरभी[6] सति! तें. ॥ २२
सुकृतार्थ[7] सुखें[8] पदरा[9], भजतां पतिपदसारस[10], येते; ।
पतिपदभजनेतर[11] जे, न म्हणसि कीं तूं सारे[12] सये[13]! ते? ॥ २३
पतिसेवेचा अद्भुत महिमा, मज आला अनुभव हो! ।
जीवा[14], जो पति, तो तो बाई! साक्षात् नरतनु[15] भव[16] हो[17]!' ॥ २४
ऐसें परिसुनि, ती विप्रस्त्री[18] बहु सुख पावे, डोले; ।
ओले प्रेमाश्रुभरें[19] गल्स्तन[20] करुनि, असें बोले. ॥ २५
'माते! वाढविली त्वां माझी श्रद्धा, झालें धन्या; ।
स्त्रीला या लोकीं परलोकीं[21] गति[22] पतिच, नसे अन्या. ॥ २६
आर्ये! कवणा कार्योद्देशें[23] आलीस? महाभागे! ।
काय करूं? वद, अतिथिभजनरत[24] मद्देह[25] न हा भागे.' ॥ २७
ती[26] तीस म्हणे, "हे ब्रह्मादिक देव मजकडे आले, ।
दिनैयज्ञव्यवहारविलोपें[27] सर्व व्याकुळ झाले. ॥ २८
म्हणुनि तुजकडे आलें, चालो व्यवहार जसा पहिला; ।
लोक तमाला[28] भ्याले, दर्दुरमूषक[29] जैसे अहिला[30].' ॥ २९
विप्रवधू वदली, 'माझें धन, जीवन, सर्व स्वामी; ।

---

१. सुख देणारें. २. नैमिषारण्य व नंदनवन. ३. पतिचरणच. ४. सेवून. या अर्धाचा अन्वय—पतिपदचि नैमिषनंदन (होत). इतर वन वरुनि कदा न वसें. येथें 'वरुनि' ऐवजीं 'विवरुनि' असा पाठभेद आढळतो. परंतु त्यांत, छंदोभंग असून, अर्थस्वारस्यही नाहीं. ५. देत नाहीं. ६. कामधेनु. **व्यतिरेक.** ७. पुण्यरूपी अर्थ. ८. सहज. ९. पदरा येणें=लाभणें, मिळणें. १०. पतीचे चरणकमल. या अर्धाचा अन्वय—पतिपदसारस भजतां, सुकृतार्थ पदरा सुखें येते (येणारे होतात). ११. पतिचरणाच्या सेवेहून अन्य. १२. उत्तम. १३. सखे. १४. पत्नीच्या हृदयाला. १५. नरदेहधारी. १६. शिव. येथें पति व भव यांतील साधर्म्य दर्शवून, 'नरतनु' शब्दानें वैधर्म्यही सुचविलें आहे; म्हणून **व्यतिरेक.** १७. होवो. १८. कौशिकाची स्त्री. १९. आनंदाश्रूंच्या विपुलतेनें. २०. गाल व स्तन. २१. स्वर्गलोकीं. २२. परिणाम, आधार, आसरा. २३. कार्याच्या हेतूनें. २४. अतिथींच्या सेवेच्या ठायीं आसक्त. २५. माझें शरीर. २६. अनुसूया. २७. सूर्योपासना, संध्यावंदन इत्यादि आन्हिक कृत्यें व यज्ञकर्में हीं बंद पडल्यामुळें. २८. काळोखाला. २९. बेडूक व उंदीर. ३०. सर्पाला.

शापें भस्म न व्हाया वेचिंन[१] तनुसह[२] सर्वस्वा[३] मी. ॥ ३०
'रविच्या उदयीं मरशील' असा **मां**डव्याचा शाप ।
प्राण हरिल, न चुकेलचि, बाई! जेविं दुखविला साप.' ॥ ३१
**अनु**सूया तीस म्हणे, 'मी हें कार्य तुझें पथ्यकरितें, ।
तुझिया सौभाग्या भय कांहीं नाहींच; शपथ करितें. ॥ ३२
मतिमति[४]! सति! पति अतिविश्वासें माझ्या हातीं[५] दे हा; ।
विसरतिल लवों नित्य निरखितां[६] याच्या पातीं[७] देहा[८]. ॥ ३३
उगवो रवि, पावो पावोनि त्रास तिमिरें[९] विलयातें[१०]; ।
जग रक्षुनि, यश साधिं; सत्सभा[११] [मग] सति! मिरविल यातें[१२]. ॥ ३४
दे आज्ञा रविला, न उगवतां गेले याम[१३] अशीती[१४].' ।
धरूनि हनु[१५], करि अत्रिवधू[१६] बहु मानें साम[१७] अशी ती. ॥ ३५
आज्ञा दे, स्वस्थ[१८] बसे, होतां **अनु**सूया जामीन, ।
**गं**गेनें कर[१९] देतां, कां न म्हणेल भया 'जा' मीनें[२०] ? ॥ ३६
होतां अभय[२१], चढे उदयशिरीं[२२], आक्रमुनि नभा[२३], सविता[२४], ।
साधु म्हणति, 'विश्वास[२५] सतीमहिमाचि[२६], रवि न भासविता[२७].' ॥ ३७
पावे **त्रि**शंकुसा तो[२८] रविच्या उदयीं सहसा[२९] पतन; ।
न पडों दे **अनु**सूया, **गा**धिजदृष्टि[३०] जसी, करि जतन. ॥ ३८

---

१. कामीं लावीन, खर्चीन. २. देहासह. ३. सर्व संपत्तीस. ४. बुद्धियुक्ते, शाहण्या. **अश्वधाटीयमक.** ५. हातीं देणें=स्वाधीन करणें. ६. पाहतां. ७. पापण्या. ८. शरीरास. या अर्धाचा भावार्थ—अनसूया कौशिकस्त्रीस म्हणते, तुझ्या पतीच्या शरीराकडे मी एकसारखी पहात असतां, माझ्या पापण्या लवण्याचेंसुद्धां विसरून जातील, ह्मणजे मी तुझ्या नवऱ्याची फार काळजी घेईन. **चेतनोक्ति** व **पर्यायोक्ति.** ९. काळोख. १०. नाशातें. ११. साधूंची सभा. १२. तुझ्या यशातें. १३. प्रहर. १४. ऐशीं. १५. हनुवटी. १६. अत्रिस्त्री. १७. समजूत, सांत्वन. १८. शांत, निश्चित. १९. कर देणें=हात देणें, मदत (किंवा आश्रय) देणें. २०. मासा. या अर्धांत **यतिभंग** आहे. **प्रतिवस्तूपमा,** कारण पूर्वार्धांतील 'स्वस्थ बसणें' व उत्तरार्धांतील 'भय जा कां न ह्मणे' हे धर्म अभिन्न आहेत. २१. निर्भय. २२. उदयाचलाच्या शिखरावर. २३. आकाशास. २४. सूर्य. २५. जगास. २६. पतिव्रतेचें माहात्म्यच्च. येथेंही **यतिभंग** आहे. २७. प्रकाश देणारे. येथें **परिसंख्या**नामक अलंकार आहे. २८. कौशिक ब्राह्मण. २९. एकाएकीं. ३०. विश्वामित्राची दृष्टि. इक्ष्वाकुवंशांत सत्यव्रत नांवाचा राजपुत्र होता. कांहीं अपराधामुळें त्यास हद्दपार केलें होतें. एकदा देशांत बारा वर्षें अवर्षण पडलें. त्या वेळीं विश्वामित्रानें आपलें कुटुंब सत्यव्रताच्या वनांत जवळ आणून सोडिलें. सत्यव्रत श्वापदें मारून त्याच्या आश्रमाजवळ ठेवी व तें कुटुंब त्यावर निर्वाह करी. इकडे सत्यव्रताचा पिता त्र्य्यारुण वनांत गेला,

त्या समयीं अत्रि[1]कलत्र म्हणे, 'पति अधिक, न इतर मला; ।
माझा आत्मा जाणुनि पति[2]पदभजनीं बहु हित रमला; ॥ ३९
हें जरि सत्य, तरि न हा कौशिक विप्र मरो, [3]हो [4]रुचिर; ।
[5]शुचि [6]रत्नाकर [7]पुण्यगणांचा स्त्रीसह नांदो [8]सुचिर.' ॥ ४०
यापरि अनुसूयेनें करितां बहु [9]सुकृतामृतवृष्टी, ।
ब्राह्मण उठला, [10]द्युतिनें मोही देवांच्याही [11]दृष्टी. ॥ ४१
केली [12]सुकुसुमवृष्टि [13]सुरांनीं, वाजविलीं बहु वाद्यें; ।
स्तविली सकल [14]त्रिदशांहीं, त्या [15]सर्वांच्याही आद्यें. ॥ ४२
देव प्रसन्न होउनि म्हणती, 'अनुसूये! वर मागें, ।
कोणाचेंहि असें नायकिलें यश [16]विस्मयकर [17]आगें.' ॥ ४३
त्यांसि म्हणे अनुसूया, 'म्हणतां जरि मजला वर सति! घे; ।
विधिहरिहर! हो! द्या मज, होउनि [18]मत्सुत, सुख [19]सरस तिघे.' ॥ ४४
ते प्रभु विधिहरिहर, 'मागितला तुज दिधला वर' म्हणती. ।
ऐसी [20]गुरुता दाउनि जातां, कां न करितिल [21]प्रणती? ॥ ४५
[22]ती अनुसूयेसि म्हणे, 'कन्या मी, कौशिक जामाता; ।
[23]सत्या तूं, त्या दाया झाल्या, असतिल मज ज्या माता.' ॥ ४६

---

तेव्हां वसिष्ठ राज्य करूं लागला. तें ऐकून सत्यव्रतास राग आला. एके दिवशीं त्याला स्वतःच्या व विश्वामित्राच्या कुटुंबाच्या निर्वाहार्थ श्वापद मिळालें नाहीं, तेव्हां त्यानें रागानें व क्षुधेनें वसिष्ठाची गाय मारिली. यास्तव त्यास अमेध्य मांसाशन, गुरुधेनूचा नाश व गुरूचा असंतोष, हीं तीन पापें लागलीं. यामुळें सत्यव्रतास त्रिशंकु नांव पडलें. दुष्काळांत त्रिशंकूनें आपल्या कुटुंबाचें पालनपोषण केलें, हें स्मरून विश्वामित्रानें दुष्काळानंतर त्रिशंकूला स्वर्गप्राप्ति व्हावी म्हणून यज्ञ आरंभिला. परंतु यज्ञदेवताच हविर्भाग घेण्याला येईनात. तेव्हां क्रोधाविष्ट होऊन विश्वामित्रानें आपल्या स्वतःच्या तपोबलानें त्रिशंकूस स्वर्गीं धाडिलें. परंतु इंद्रानें त्याला तेथून खालीं लोटून दिलें. परंतु विश्वामित्रानें केवळ आपल्या तेजस्वी दृष्टीनें त्रिशंकूची अधोगति बंद केली व तो अंतराळींच लटकत राहिला. या सुप्रसिद्ध प्रतापशाली तेजस्वी विश्वामित्रदृष्टीवर येथें कविकटाक्ष आहे.

१. अत्रिस्त्री अनसूया. २. पतिचरणाच्या सेवनीं. ३. होवो. ४. सुंदर. ५. पवित्र. ६. समुद्र. ७. पुण्यसमुदायांचा. ८. फार काळ. ९. पुण्यरूप अमृताचा वर्षाव. १०. तेजानें. ११. नेत्र. १२. चांगल्या पुष्पांचा वर्षाव. १३. देवांनीं. १४. देवांहीं. १५. सर्वां(देवां)च्या आद्यें=शिवानें. १६. आश्चर्यकारक. १७. पूर्वीं. १८. माझे पुत्र. १९. उत्तम. २०. मोठेपणा. २१. नमन. २२. कौशिकस्त्री. २३. खरी. या अर्धाचा भावार्थ—कौशिकस्त्री ह्मणते, हे अनसूये! तूंच माझी खरी आई, ज्या माझ्या माता असतील, त्या आज खरोखर दायाच ठरत आहेत; कारण त्यांनीं जरी, मला जन्म देऊन, माझें पालनपोषण केलें असलें, तरी आज मला चुडेदान देऊन तूं जें खरें खरें मातृवात्सल्य दाखविलें आहेस, तें त्यांच्या हातून दाखविलें जाणें शक्य नाहीं. **प्रतीप.**

कौशिकहि, करुनि वंदन, ऐसें मागे मुख वासून, ।
'बाई! पुत्रचि मानुनि जन हा, हेही सुखवा सून.' ॥ ४७

सुखवुनि त्या दोघांसि, सती ती स्वाश्रमपदासि आली; ।
विश्वसृग्विश्वंभरविश्वेश्वरजननि मग ती झाली. ॥ ४८

चंद्र चतुर्मुख, दत्त दानवांतक, धूर्जटि दुर्वासा; ।
कविगणगणपतिशिरीं कीर्तिसह पंच मूर्ति दुर्वासा. ॥ ४९

मोहें ग्रासित होता ज्याला अर्कासि दुजा राहू, ।
केला मुक्त अलर्क प्रभूनें, अर्जुन दशशतबाहू. ॥ ५०

जैसा सेतु समुद्रीं केला प्रख्यात श्रीरामें, ।
तैसा योगपंथ श्रीदत्तें स्वपदाश्रितहितकामें. ॥ ५१

तो तो गुरु गणिला, योगोचित गुण जेथें आढळला; ।

---

१. मुख वासून=दीनमुद्रेनें (किंवा नम्रतेनें) याचना करून. 'तोंड पसरणें' या शब्दसमूहाचा प्रयोगही याच अर्थीं होतो. २. अनसूया. ३. आपल्या आश्रमस्थानास. ४. ब्रह्मदेव, विष्णु व शिव यांची माता. येथें 'विश्वेश्वर०' या शब्दांतील '**श्व**'वर यति आल्यामुळें **यतिभंग** दोष झाला आहे. शिवाय हें अर्ध म्हणण्यालाही चांगलीशी गोड व सुलभ चाल लागत नाहीं. ५. ब्रह्मदेव. ६. दानवांचा नाशकर्ता, विष्णु. ७. शिव. ८. ब्रह्मा, विष्णु व महेश यांच्या अंशानें अनसूयेला चंद्र, दत्तात्रेय व दुर्वासा असे अनुक्रमें तीन मुलगे झाले. पैकीं ब्रह्मांश चंद्र हा रजोगुणी, विष्णूचा अंश दत्त हा सत्वगुणी व महेशांश दुर्वासा हा तमोगुणी होय. या तीन मुलांच्या वृत्ती पुढील श्लोकांत उत्तम प्रकारें वर्णिल्या आहेतः—सोमो ब्रह्मा भवद्विष्णुर्दत्तात्रेयोऽभ्यजायत । दुर्वासाः शंकरो जज्ञे वरदानाद्दिवौकसाम् ॥ सोमः स्वरश्मिभिः शीतैर्विरुदोषधिमानवान् । अप्याययन्सदा स्वर्गे वर्तते स प्रजापतिः ॥ दत्तात्रेयः प्रजाः पाति दुष्टदैत्यनिबर्हणात् । शिष्टानुग्रहकृद्योगी ज्ञेयश्चांशः स वैष्णवः ॥ निर्दहत्यवमन्तारं दुर्वासा भगवानजः । रौद्रभावं समाश्रित्य दृङ्मनोवाग्भिरुद्धतः ॥ सोमत्वं भगवानत्रिः पुनश्चक्रे प्रजापतिः । दत्तात्रेयोपि विषयान्योगस्थो बुभुजे हरिः ॥ दुर्वासाः पितरं त्यक्त्वा मातरं चोत्तमं व्रतम् । उन्मत्ताख्यं समाश्रित्य परिबभ्राम मेदिनीम् ॥ १० (मार्कंडेयपुराण, अ० १६). ९. कविसमुदायरूप गणपतीच्या मस्तकीं. १०. चंद्र, दत्त, दुर्वासा, अत्रि व अनुसूया या पांच मूर्ति. ११. सदा. १२. अज्ञान. १३. सूर्यास. या अर्धाचा अन्वयः—ज्याला अर्कासि (ज्या अलर्करूप व सहस्रार्जुनरूप सूर्यास) मोह दुजा राहू (अज्ञानरूप नवीनच राहू) ग्रासित (गिळीत) होता, [तो] अलर्क व दशशतबाहु, अर्जुन प्रभुनें (दत्तात्रेयानें) मुक्त केला. १४. सहस्र आहेत बाहू ज्याला तो, कार्तवीर्य अर्जुन. १५. योगमार्ग. १६. आपल्या चरणाच्या सेवकांच्या हिताची इच्छा ज्यास, त्यानें. याचें विशेष्य 'श्रीदत्तें.' १७. योगाला योग्य. जगामध्यें पशु, पक्षी, वृक्ष, लता इत्यादि सर्व स्थावरजंगमांत जो जो सद्गुण दिसेल, तो तो शिष्यभावानें स्वीकारावा, असा दत्तात्रेयाचा सर्व योग्यांना उपदेश आहे. (मार्कंडेयपुराण, अ० ४०).

ज्याचा दास न [1]कल्पांतींही, पावुनि [2]सुपदा, ढळला. ॥ ५२
भजती भोळे भाविक भावें श्रीमद्दत्ताला जे, ।
[3]काळहि [4]किंकरसा दावाया त्यांला [5]सत्ता [4]लाजे. ॥ ५३
नित्यत्वें [6]निगमहि दत्ताच्या [7]दासांसचि [7]मानवले; ।
[8]मानव, [9]लेख, इतर सारेही काळाचे [10]कानवले. ॥ ५४

उपसंहार.

[11]भक्तमयूरमुदिर दत्तानें केला ज्या उपदेश, ।
त्या मानवले मानव, लेख, ब्रह्मादिहि [12]सुपदेश. ॥ ५५

---

## ६. नारदाभ्युदय.

(गीतिवृत्त.)

[13]देवर्षि म्हणे, "व्यासा! [14]श्रीहरिजनसंगती [15]निकाम [16]हिमा; ।
अनुभविला, तुज कथितों, तूं त्यांचा ऐक तो [17]निका [18]महिमा. ॥ १
ज्यांच्या बुद्धींत [19]सुनय शोभति, [20]मणिदीप जेविं [21]समयांत; ।
त्या ब्रह्मज्ञांचा मी [22]दासीसुत [23]पूर्वकल्पसमयांत. ॥ २
तेथें चातुर्मास्य श्रीहरिचे भक्त राहिले होते, ।
[24]मज्जननीस्वामींनीं [25]भगवद्भावेंचि पाहिले हो! ते. ॥ ३
मातेच्या स्वामींनीं त्यांच्या सेवेसि [26]योजिलों बा! मी, ।
[27]दास्य [28]यथाशक्ति करित होतों [29]अचपळ तयांचिया [30]धामीं. ॥ ४
तद्भाषणास [31]भुललों, [32]सुमधुरगीतध्वनीस हरिणतसा; ।
जरि मी [33]अपक्क, झालों [34]सत्सहवासेंकरूनि [35]परिणतसा. ॥ ५

---

१. प्रलयकाळींही. २. मोक्षास. ३. यम. ४. चाकरासारखा लाजतो. ५. अधिकार. ६. वेद. ७. दासांना मान देतात. ८. मनुष्यें. ९. देव. १०. करंज्या, पक्वान्नविशेष. ११. भक्तरूप मोराचा मेघ अशा. १२. उत्तमपदाचे स्वामी. ५४ व ५५ या दोन साक्यांत 'मानवले' व 'मानवले[ख]' हें **यमक.** १३. नारद. नारदानें हा स्ववृत्तांत व्यासास सांगितला आहे. (श्रीमद्भागवत प्रथमस्कंध, अ० ५,६.) १४. श्रीविष्णुभक्तांचे सहवास. १५. अत्यंत. १६. शीतळ, सुखविणारी. १७. खरा. १८. माहात्म्य. १९. सुनीति. २०. रत्नाचे दीप. २१. समई=पितळेचें किंवा इतर धातूचें उंच दिवाठणें. २२. दासीपुत्र. २३. पूर्वकल्पाच्या वेळीं. २४. माझ्या मातेच्या यजमानांनीं. २५. ईश्वराच्या भावनेनें. २६. कर्मणिरूप आहे. अशीं प्रथमपुरुषी कर्मणिरूपें गद्यांत येत नाहींत. २७. सेवा. २८. शक्त्यनुरूप. २९. स्थिर. ३०. घरीं. ३१. लुब्ध झालों. ३२. अत्यंत गोड गाण्याच्या आवाजास. ३३. कच्चा, लहान. ३४. साधुसंगतीनें. ३५. पक्वासारखा; वृद्धासारखा.

मज सदय साधु देती, राहे जें अन्न भक्षितां पात्रीं; ।
तत्सेवेनें हळु हळु आली माझ्या पवित्रता गात्रीं[1]. ॥ ६
भागवतधर्मभगवत्कीर्तिश्रवणींच[2] लागली गोडी, ।
सोडी न मन पळभरी; वाटे बहु ऐकिली कथा थोडी. ॥ ७
करितां नित्य हरिकथाश्रवण[3], न वाटेचि अन्य रुचिर[4] मला; ।
श्रीकृष्णींच मंदात्मा[5], व्यासमुनिवरा[6]! धरूनि रुचि[7], रमला. ॥ ८
कृष्णकथांच्या श्रवणें माझी कृष्णीं प्रवर्तली[8] भक्ती, ।
अत्यद्भुता[9] अशीच श्रीकृष्णाच्या सुकीर्तिची शक्ती[10]. ॥ ९
मग भगवदुक्त[11] गुह्य[12] ज्ञान मला त्या दयाळुंनीं कथिलें, ।
जेणें ब्रह्मचि व्हावें, बा! रजत[13] जसें रसें[14]करुनि कथिलें[15]. ॥ १०
प्रथम महत्सेवा[16], मग त्या सेवेनें महत्कृपा[17] होती, ।
मग तद्धर्मीं[18] श्रद्धा, करवी भगवत्कथा श्रवण हो ती[19]; ॥ ११
त्यावरि भगवंतीं रति[20], त्या रतिनें देहयुगविवेक[21] घडे, ।
त्या सुविवेकें अंतःकरणींचा[22] क्षिप्र[23] सर्व मोह[24] झडे; ॥ १२
मग होय ज्ञान विमळ[25], त्या ज्ञानें ईश्वरीं दृढ[26] भक्ती, ।
मग भगवत्तत्वाच्या[27] ज्ञानाची होतसे अभिव्यक्ती[28]; ॥ १३
भगवत्कृपेंकरुनि मग सर्वज्ञत्वादि अतुल[29] जे सारे, ।
ते भगवंताचे गुण होतात प्रकट मुनिवरा[30]! बा! रे! ॥ १४
करुनि कृपा मजवरि, मुनि चातुर्मास्य क्रमूनियां गेले. ।
केले उपदेश तिंहीं मच्चित्तीं[31] जागरूक[32] ते ठेले. ॥ १५
मातेचें प्रेम मला होतें अत्यंत सुदृढ[33] बंधन गा! ।

---

१. देहीं. २. भागवतधर्म व ईशयश हीं ऐकण्यांत. ३. भगवत्कथेचें श्रवण. ४. गोड. ५. माझें मन. ६. मुनिश्रेष्ठा व्यासा. ७. गोडी, आवड. ८. वळली, फिरली. ९. फार आश्चर्यकारक. १०. सामर्थ्य. ११. भगवंतानें सांगितलेलें. १२. गहन, गुप्त. १३. रुपें. १४. (वनस्पतीच्या) रसानें. हें किमयाच्या कृतीस अनुलक्षून लिहिलें आहे. १५. कथील नांवाच्या धातुविशेषानें. १६. साधूंची सेवा. १७. साधूंची दया. १८. त्यांच्या धर्मांच्या ठिकाणीं. १९. श्रद्धा. २०. प्रीति. २१. स्थूल व सूक्ष्म देहांचा विचार. २२. चित्तींचा. २३. त्वरित. २४. अज्ञान. २५. शुद्ध. २६. अचल. २७. ब्रह्मरहस्याच्या. २८. स्पष्टता, उलगडा. २९. ज्यांस तुलना नाहीं असे, अप्रतिम. ३०. ऋषिश्रेष्ठा व्यासा! गीति ११–१४ यांत **कारणमाला** नांवाचा अलंकार आहे. ३१. माझ्या मनांत. ३२. जागते, जागृत. ३३. फार बळकट.

त्यासि [१]विलंघुनि जाऊं न शकें मी, जेविं [२]पंगु [३]अंध [४]नगा. ॥ १६
जातां [५]दोहार्थ [६]पथीं रात्रीं मातेसि [७]उग्र साप डसे; ।
गेले देहांतुनि [८]असु, [९]गेहांतुनि [१०]शीघ्र पुरुष [११]तो पडसे. ॥ १७
मातेचा मृत्यु [१२]मना [१३]भगवदनुग्रहचि वाटला; [१४]गेहा ।
त्यजुनि, वनीं हरिभजना, [१५]आयकिली धरुनि वाट, लागे हा. ॥ १८
पिंपळमूळीं बसलों मी, जावुनि [१६]निर्जना अरण्यातें; ।
ध्याता झालों, झांकुनि [१७]नेत्रें, [१८]श्रीशा [१९]महाशरण्यातें. ॥ १९
पांचा वर्षांचा मी दासीसुत काय! [२०]विश्वगुरु काय! ।
ध्यातां हळु हळु [२१]हृदयीं [२२]स्फुरला [२३]सच्चित्सुखैकमयकाय. ॥ २०
थोरीं [२४]तसाच दावी देव [२५]दयानिधि [२६]अनुग्रह [२७]लहानीं, ।
काय लघूचि [२८]क्षेत्रीं न करी, होउनि [२९]अनुग्र, [३०]हल हानी? ॥ २१
आलें फळ तें, जें वी [३१]कोट्यधिकहि परि [३२]अनुग्र [३३]हव्यासा. ।
या वर्णू एक मुखें काय प्रभुचा अनुग्रह? व्यासा! ॥ २२
हृदयीं, होतांचि प्रभुदर्शन, बा! दास [३४]हा परम [३५]हर्षे; ।

---

१. अतिक्रमून. २. पांगळा. ३. आंधळा. ४. पर्वतास. ५. दूध काढण्यास. ६. मार्गांत. ७. भयंकर. ८. प्राण. ९. घरांतून. १०. त्वरेनें. ११. तापट असे, संतापी, जमदग्नीचे अवतार, शेंडीत राख घालणारे. १२. मनास. १३. भगवत्कृपाच. दोषाचें गुणरूपानें वर्णन केल्यामुळें **लेश.** १४. घरास. १५. ऐकलेली. या गीतीचा अन्वयः—मातेचा मृत्यु (माझ्या) मना भगवदनुग्रहचि वाटला; गेहा त्यजुनि, [भागवतांच्या तोंडून] आयकिली वाट धरुनि, हा (नारद) हरिभजना लागे. १६. मनुष्यरहित. याचें विशेष्य 'अरण्यातें.' १७. डोळे. १८. लक्ष्मीच्या स्वामीला, श्रीविष्णूला. १९. श्रेष्ठ आश्रयदात्याला. याचें विशेष्य 'श्रीशा.' २०. विश्वाचा स्वामी. **विषम.** २१. चित्तांत. २२. प्रकटला. २३. सत्य, ज्ञान व आनंद यांनीं भरलेलें आहे शरीर ज्याचें असा (म्ह०—ईश्वर). २४. मोठ्याप्रमाणेंच. २५. दयेचा ठेवा. २६. कृपा. २७. लहानाचे ठायीं. २८. शेतांत. २९. शांत. ३०. नांगर. या गीतीचा अन्वय—हल अनुग्र होउनी लघुच क्षेत्रीं हानि न करी काय? अर्थः—नांगर आपला तीक्ष्णपणा टाकून लहान शेतांना खणीत नाहीं, असें घडतें काय? शेत लहान असो वा मोठें असो, तो सगळ्यांशीं सारखाच वागतो. त्याप्रमाणेंच परमेश्वरही आपल्या भक्तांत लहान व मोठे असा पंक्तिप्रपंच करीत नाहीं. तो सर्वांवर सारखीच कृपा करितो. येथें 'लहान थोरांशीं सारखें वागणें' या गोष्टीपुरतेंच दृष्टान्तदार्ष्टान्तांमध्यें साधर्म्य घ्यावयाचें आहे. ३१. कोटीपेक्षां अधिक. ३२. शीतळ, सुखकर. ३३. इच्छेस. या गीतीचा अन्वय—तें फळ आलें, जें कोट्यधिकहि परि अनुग्र हव्यासा वी. 'जेवीं कोट्याधिकहि इ०' असा पाठभेद आहे. ३४. हा दास=नारद. ३५. आनंदित झाला.

झालों धन्य जगीं; या स्वस्तुतपादा[1] सहा[2] पर महर्षे[3]! ॥ २३
जीच्या चरणीं, करुनी व्रत तीर्थ, सुतीव्र[4] तप, रमा लवली[5]; ।
श्रीमूर्ति[6] स्फुरली ती राहों दे ताप[7] न, पर[8] मालवली[9]. ॥ २४
मोठ्या पाप्यासहि दे जीचें उच्चारितांचि नाम गती[10]; ।
ध्यान धरुनि पाहें, परि हृदयीं मूर्ति स्फुरेचिना[11] मग ती. ॥ २५
जे सत्कवि, दृष्टांतीं[12] आतां योजूनि मत्समा[13], ते तें ।
मद्दुःख वर्णितिल कीं, 'चुकला विपिनांत[14] वत्स[15] मातेतें.' ॥ २६
किंवा ताप[16] ग्रीष्मीं[17] गंगाविरहें[18]करूनि यादास[19], ।
झाला होता तेव्हां हा दृष्टांतांत योग्य[20] या दास. ॥ २७
लोभी पुरुष तळमळे, होतां सर्वाहि जेविं हानि धना[21]; ।
तळमळला तेविं, म्हणे, 'परम हित जिण्यापरीस[22]' हा निधना[23]. ॥ २८
मी तेविं, जसा राजा शोक करी, हारवूनि पदें[24], लाजे; ।
ऐक, अदृश्य[25] दयानिधि[26] तेव्हां बहु मधुर[27] शब्द वदला जे. ॥ २९
'रे! वत्सा! या जन्मीं तूं योग्य नससि पहावयास मज; ।
मी त्या अदृश्य, ज्याचे दग्ध[28] न कामादि[29] दोष बा! समज. ॥ ३०

---

१. या स्वस्तुतपादा (आपल्या स्वतःच्याच चरणाची स्तुति करणाऱ्या या मला, आत्मप्रौढी मिरविणाऱ्या या मला) सहा (सहन कर, क्षमा कर). २. परंतु. ३. हे महामुनि व्यासा! पाठभेदः— स्वःस्तुत पादा सहापर महर्षे. हा सर्वसंग्रहाचा पाठ आहे, व त्यावर 'स्वर्गलोकीं स्तविलेले पाय ज्याचे अशाशीं (ईर्ष्यापरायण)' अशी टीप आहे. ४. अतितीक्ष्ण. ५. नम्र झाली. ६. भगवन्मूर्ति. ७. दुःख. ८. परंतु. ९. अंतर्धान पावली. अन्वय—सुतीव्र तप करुनि जीच्या चरणीं रमा लवली, ती स्फुरली श्रीमूर्ति ताप न राहों दे, पर (परंतु) [ती तत्क्षणींच] मालवली. अर्थ—अतितीक्ष्ण तप करून जिच्या पायांच्या ठायीं लक्ष्मी नम्र झाली, अशा त्या [माझ्या मनांत] प्रकट झालेल्या भगवंताच्या मूर्तीनें थोडेंसुद्धां दुःख राहूं दिलें नाहीं; परंतु ती [लागलीच] अंतर्धान पावली (गुप्त झाली). १०. मोक्ष. ११. प्रकटेना. १२. दृष्टांतांत, दाखल्यांत. १३. माझ्यासारख्यास. १४. वनांत. १५. बालक. अन्वय—जे सत्कवि, ते आतां मत्समा दृष्टांतीं योजून, मद्दुःख वर्णितिल कीं, विपिनांत वत्स मातेतें चुकला. अर्थ—जे उत्तम कवि आहेत, ते माझ्याशीं ज्याचें पूर्ण साम्य आहे अशाला दृष्टांतांत योजून, वर्णन करितील कीं, अरण्यांत बालक (आपल्या) आईस चुकला. **अतिशयोक्ति.** १६. दुःख. १७. ग्रीष्मऋतूंत. १८. गंगेच्या (नदीच्या) वियोगानें. १९. जलजंतूस. २०. पूर्वार्धांत वर्णिलेल्या तापाला पात्र. २१. द्रव्यास. २२. जगण्यापेक्षां. २३. मरणास. अन्वयः—हा निधना जिण्यापरीस परम हित म्हणे. **व्यतिरेक** व **लेश.** २४. राज्यपद. २५. गुप्त. २६. दयेचा ठेवा, भगवंत. २७. गोड. २८. जळलेले. २९. कामप्रमुख.

तुज रूप एकदा म्यां दाखविलें, मदनुराग[1] वाढाया; ।
क्षेम[2] सर्वा कामांतुनि[3] पुरुषातें हेंचि[4] होय काढाया. ॥ ३१
बाळा ! तुज या जन्मीं सत्सेवा[5] थोडकीच जी घडली, ।
तीणें मद्रूपीं[6] तव मति,[7] मधुपी[8] सारसीं,[9] तसी जडली. ॥ ३२
या निंद्या देहातें सोडुनि, तूं पावशील मज्जनता,[10] ।
यापरि माझ्या प्राज्य[11]स्मरणामृतसागरांत मज्ज,[12] नता[13] ! ॥ ३३
सर्गीं,[14] प्रलयींही,[15] हे मन्निष्ठा[16] मति न खंड[17] पावेल; ।
बहु वाढेल प्रेमा[18] हा, गेला[19] जेविं मंडपा वेल. ॥ ३४
मदनुग्रहें[20]करुनि नच विसरसिल कदापि यांउपर[21] मातें.' ।
व्यासा ! पावे पावन,[22] ऐसें बोलोनियां, उपरमातें.[23] ॥ ३५
त्या दीनबंधु[24]च्या मी करिता झालों पदां[25] शिरें नमन, ।
शिरलेंचि म्हणत होतें जें, 'दासजनीं[26] कदा शिरेंन?' मन. ॥ ३६
विमद,[27] विमत्सर,[28] निस्पृह,[29] निस्त्रप,[30] होऊनि बा! तनानाचा,[31] ।
होतों करीत, गाउनि, यश ये, चुकतांचि यातना,[32] नाचा. ॥ ३७
प्रभुचीं नामें गात प्रेमभरें, आदरीत[33] नटनातें,[34] ।
प्रारब्ध[35] सरे, तोंवरि होतों क्षितिवरि[36] करीत अटनातें.[37] ॥ ३८

---

१. माझ्या वरील प्रेमा. २. समर्थ. ३. विषयवासनांतून. ४. भगवत्प्रेमा. ५. साधूंची सेवा. ६. माझ्या रूपाच्या ठायीं. ७. बुद्धि. ८. भ्रमरी. ९. कमलाच्या ठायीं. १०. माझें भक्तमंडळ. ११. अखण्ड स्मरणरूप अमृतसागरांत. १२. बुडी मार. १३. नता !=हे नम्रा ! १४. (पृथ्वीच्या) उत्पत्तिकाळीं. १५. कल्पान्तीं. १६. माझ्या ठिकाणीं निष्ठा (भाव, स्थिरता) जिची अशी. १७. खंड पावणें=छिन्न होणें, नाश पावणें. १८. प्रेम. १९. गेलेला, पोंचलेला. २०. माझ्या कृपेनें. २१. यापुढें. २२. पवित्र करणारा. २३. शांतीतें; अंतर्धानाला. २४. दीनांच्या आप्ताच्या. २५. पाठभेद :–पदाशि रें ! २६. भक्तांचे मंडळांत. या अर्धाचा अन्वय–जें मन 'दासजनीं कदा शिरेंन' (असें) म्हणत होतें, (तें) शिरलेंचि. अर्थ:–दासजनांत शिरण्यास उत्सुक झालेलें मन (एकदाचें इष्टस्थानीं) शिरलेंच. वर्णनसादृश्य :–वदतां असें प्रसादें, प्रभुच्या केलें पदा शिरें नमन, । झालों मग्न स्तवनीं, म्हणतचि होतें सदा 'शिरेंन' मन. ॥ (अनुशासन० ५।५०). २७. गर्वरहित. २८. द्वेषहीन. २९. निर्लोभी. ३०. निर्लज्ज. ३१. गाण्याचा, ताना मारण्याचा, ताना मारण्यांत. ३२. क्लेश. या गीतीचा अन्वय–बा (मी) विमद, विमत्सर, निस्पृह (व) तनानाचा निस्त्रप (=भगवद्भजनांत ताना मारण्यांत संकोच व लज्जा यांनीं अगदीं रहित असा) होऊनि, गाउनी, नाचा करीत होतों, (कारण) यातना (=मनाचे संशय व क्लेश) चुकतांचि (हरीचें) यश [तोंडाला] ये. ३३. स्वीकारीत, करीत. ३४. नृत्यातें. ३५. दैव. ३६. पृथ्वीवर. ३७. फिरण्यातें.

मग [1]देहपात झाला, सरतां [2]प्रारब्धकर्म सारेंच; ।
न [3]अविद्येचा उतरी दुसरा भागवत धर्मसा [4]रेंच. ॥ ३९
दासीसुत होतों, तो [5]पार्षद झालों वरें [6]दयानिधिच्या; ।
मग [7]कल्पांतीं शिरलों [8]निश्वासासहचि अंतरीं [9]विधिच्या. ॥ ४०
[10]एकार्णवांत बा! या विश्वातें [11]स्वांतरीं करुनि गुप्त, ।
नारायणीं प्रवेशुनि, होता ब्रह्मा [12]यथासमय [13]सुप्त. ॥ ४१
उठुनि [14]सहस्त्रयुगांतीं, पुनरपि [15]सर्जन करावया [16]सजला, ।
जेविं [17]मरीचिप्रमुखां, विधिपासुनि जन्म जाहलें मजला. ॥ ४२
[18]अव्याहतगति फिरतों या [19]तीं [19]लोकांत आंत बाहेर; ।
अनुकूल विश्व हें [20]मम [20]मतिस, सुकन्येस जेविं माहेर. ॥ ४३
बा! [21]देवेश्वरदत्ता जेविं [22]सुधा [23]स्वैरस मधुर चाखविती, ।
हे [24]सुस्वर [24]वीणारी [25]वीणा रीती तशाच दाखविती. ॥ ४४
प्रभुनें, अनुग्रह करुनि बहुतचि, हा दास सुखविला [26]सांचा; ।
कीं मजपुढें फिका रस बा! [27]शक्राच्याहि [28]सुखविलासाचा. ॥ ४५
अत्यद्भुत लाभ मला झाला या प्रभुयशाचिया गानीं; ।
इतरां योगांनीं, गति द्यावी तशि [29]परवशाचि यागांनीं." ॥ ४६

उपसंहार.

लक्ष्मीचा कांत [30]अमृतघन परम उदार नित्य [31]वर्षतसे, ।
हा भक्तमयूर करी बहु [32]तांडव, कीं सदैव हर्षतसे. ॥ ४७

---

१. देहाचा नाश. २. पूर्वजन्मीं केलेलें व या जन्मीं भोगावयाचें कर्म. ३. अज्ञानाचा. ४. रेंच उतरणें=गर्वहरण करणें, खोड मोडणें. **लोकोक्ति.** ५. देवासन्निध राहणारा भक्त. ६. दयेच्या ठेव्याच्या, प्रभूच्या. ७. प्रलयकाळीं. ८. श्वासाबरोबर. ९. विधिच्या अंतरीं=ब्रह्मदेवाच्या पोटांत. १०. प्रलयकाळीं सर्वत्र पसरलेल्या समुद्रांत. ११. आपल्या पोटांत. १२. योग्यकाळीं. १३. निजलेला. १४. हजार युगांच्या शेवटीं. १५. उत्पत्ति. १६. तयार झाला. १७. मरीचि इत्यादिक ऋषींस. हे ऋषि सात आहेत—मरीचि, अत्रि, अंगिरस्, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ. १८. अप्रतिबंध गति ज्याची असा. १९. स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तीन लोकांत. २०. माझ्या बुद्धीस. २१. इंद्रानें दिलेली. २२. अमृत. २३. आपली रुचि. २४. मधुर सूर उत्पन्न करणारी. २५. या नारदाच्या वीणेचें नांव **महती. दामयमक.** २६. खरोखर. २७. इंद्राच्या. २८. ऐषआरामांचा. **प्रतीप.** २९. दुसऱ्याच्या अधीन. येथें प्रभुयशोगीत व योगयाग यांमधील साधर्म्य व वैधर्म्यही दाखवून, प्रभुयशोगीताचें श्रेष्ठत्व सिद्ध केल्यामुळें **व्यतिरेकालंकार.** ३०. अमृताचा मेघ. ३१. वर्षाव करितो. ३२. एक प्रकारचें नृत्य. **परं० रूपक.**

## ७. अनंतव्रतकथा.

(गीतिवृत्त.)

'श्रीमदनंतप्रभुची गावी प्रेमेंकरूनि पुण्य कथा,[1]' ।
भाग्यें संदेश[2] असा आला हरिजनमुखें[3] स्वकर्णपथा.[4] ॥ १
भगवन्महिमा गातां होतांहे[5] कायवाङ्मन:शुद्धी,[6] ।
यास्तव भगवद्भक्तप्रेरित[7] मी गातसें यथाबुद्धी.[8] ॥ २
धर्म म्हणे 'श्रीकृष्णा! मी द्यूतें[9] जाहलों पदभ्रष्ट,[10] ।
स्पष्ट नरक निर्धनता;[11] माझे सरतील हे कसे कष्ट?[12]' ॥ ३
श्रीकृष्ण म्हणे, 'धर्मा! ताप अनंतव्रतें[13] अखिलें[14] सरतो, ।
करुनि चतुर्दश[15] वर्षें, जीवें[16] विपत्सागरीं[17] सकळ तरतो.' ॥ ४
धर्म म्हणे, 'व्रत ज्याचें, तो कोण अनंत देव? कळिव मला; ।
त्वद्वचन[18] सेव्य दासा; पद्में[19] मधु[20] पाजिलें न अळि[21] वमेला.[22]' ॥ ५
कृष्ण स्मित करुनि म्हणे, "कथितों तुज धर्मनंदना[23]! सत्य, ।
बापा! मीच अनंत स्वाश्रितभवरोगकंदनासत्य.[24]' ॥ ६
कुरुपति म्हणे, 'मुकुंदा! कोणीं केलें, कधीं, कसें, व्रत? ती ।
सांग कथा; त्वद्रसना[25] तर्पू,[26] जसि नंदनीं[27] रसें व्रतती.[28]' ॥ ७
यदुपति[29] म्हणे, 'कुरुपते! कथितों सद्व्रतकथा,[30] परिस राया! ।
राज्यपदच्युतिरूपा[31] जरिहि दुरंत[32] व्यथा,[33] परि सराया. ॥ ८
होता विप्र कृतयुगीं सुतपा,[34] ज्ञानी, 'सुमंत' या नांवें; ।
वानावें[35] यश[36] ज्याचें, साधूंनीं ज्यास फार मानावें. ॥ ९

---

१. पवित्र चरित्र. पांडव वनांत असतां, ही कथा श्रीकृष्णांनीं धर्मराजास सांगितली. २. निरोप. ३. प्रभूच्या दासांच्या मुखानें; हरिदासांकडून. पंतांनीं अनेक आख्यानें व काव्यें हरिदासांच्या (कीर्तनकारांच्या) सांगण्यावरून रचलेलीं आहेत. ४. माझ्या कर्णमार्गावर. ५. होत आहे, होते. ६. शरीर, वाणी व मन यांची शुद्धि. ७. ईश्वराच्या दासानें प्रेरणा केलेला. ८. बुध्यनुरूप. ९. जुगारानें. १०. राज्यपदापासून च्युत. ११. दारिद्र्य. १२. दु:खें. १३. अनंतदेवाच्या व्रतानें. १४. सर्व. १५. चवदा. १६. प्राणी. १७. संकटरूप समुद्रांत. १८. तुझें भाषण. १९. कमलानें. २०. मध, पुष्परस. २१. भ्रमर. २२. ओकला. **प्रतिवस्तूपमा.** २३. यमपुत्रा, धर्मराजा! २४. आपल्या आश्रितांच्या संसाररूप रोगांच्या कांद्याचा (नाशकर्ता) अश्विनीकुमार. हे अश्विनीकुमार देवांचे वैद्य होत. २५. तुझी जिव्हा. २६. तृप्त करो. २७. नंदनवनांत. २८. (कल्प)लता. २९. श्रीकृष्ण. ३०. चांगल्या (अनंत) व्रताची कथा. ३१. राज्यपदापासून झालेलें पतन हीच (व्यथा). ३२. जिला अंत नाहीं अशी. ३३. पीडा. ३४. मोठा तपस्वी. ३५. वर्णावें. ३६. कीर्ति.

तद्भार्या[1] भृगुकन्या[2], साध्वी '**दीक्षा**' असें तिचें नाम; ।
बा! मर्त्येशा[3]! शोभे स्त्रीनें श्रीनें[4], तसेंचि तें, धाम[5]. ॥ १०
तीच्या पोटीं झाली कन्या, नामें धरावरा[6]! '**शीला**;' ।
जैसी सुगुणमणीच्या[7] ती पात्र[8], तशी परा[9] न, राशीला. ॥ ११
पावे पंचत्वातें[10] दैवें **दीक्षा**, **सुमंत** तो विप्र ।
दुसरी स्त्री संपादी, धर्मातें चालवावया क्षिप्र. ॥ १२
स्त्री केली दुसरी जी, तीचें अन्वर्थ[11] '**कर्कशा**' नाम; ।
तापें **सुमंत**देह[12] स्वेदार्द्र[13], जलार्द्र[14] घट जसा आम[15]. ॥ १३
पितृगृहभित्तीवरि[16] ती नाना चित्रें लिही सदा **शीला**, ।
त्या शिल्पें[17] वृद्धाच्या होय नृपा! पात्र ती सदाशीला[18]. ॥ १४
देहीं यौवनें[19] दिसतां, तातें **शीला**भिधा[20] निजा[21] कन्या ।
सुमुहूर्तीं[22] सुविधानें[23] **कौंडिन्या**ख्य द्विजा[24] दिली धन्या. ॥ १५
**शीले**सह **कौंडिन्य** स्वगृहाप्रति[25] जावया निघे, **धर्मा**! ।
स्त्रीस **सुमंत** म्हणे, 'दे आंदण पाथेय[26] कन्यकाशर्मा[27].' ॥ १६
सांगे ऐसें ध्यायां[28], ध्यायासि **सुमंत** हा यश स्त्रीतें, ।
परि **कर्कशा** करी, जें करि म्हणवायासि 'हाय' शस्त्री[29], तें. ॥ १७
**धर्मा**! दुःखगृहाचा[30] संसारीं सुदृढ[31] कर्कशा पाया. ।

---

१. त्याची स्त्री. २. भृगुनामक ब्राह्मणाची कन्या. ३. राजा! ४. लक्ष्मीनें. ५. गृह. ६. पृथ्वीपते! राजा! ७. उत्तम गुणरूप रत्नांच्या. ८. योग्य. ९. दुसरी. या अर्धाचा अन्वय–जैसी ती सुगुणमणीच्या राशीला पात्र, तशी परा न. भावार्थ–तिच्या सारखी उत्तम गुणवती दुसरी कोणीच नव्हती. १०. पंचत्वातें पावे=पंच महाभूतांत मिळून गेली, मरण पावली. ११. अर्थास अनुसरून, सार्थ. येथें 'कर्कशा आपल्या नांवाप्रमाणेंच कर्कश (=कठिण, भांडखोर व निर्दय) होती,' असें वर्णन करून, कर्कशा नांवाचें अनुरूपत्व सिद्ध केलें आहे; म्हणून, **निरुक्ति**नामक अलंकार झाला आहे. १२. सुमंताचें शरीर. १३. घामानें ओला. १४. पाण्यानें ओला. १५. कच्चा. १६. बापाच्या घराच्या भिंतीवर. १७. कलेनें, कुशलपणानें. १८. चांगल्या आशीर्वादाला. १९. तारुण्य. २०. शीला नांवाची. २१. आपली. २२. चांगल्या मुहूर्तावर. २३. उत्तम विधीनें, योग्य संस्कारानें. २४. कौंडिन्य नांवाच्या ब्राह्मणास. २५. आपल्या घरास. २६. प्रवासाची सामग्री. २७. मुलीच्या सुखार्थ. २८. यांचें कर्म 'यश'. २९. शस्त्रयुक्त मनुष्य. हत्यारबंद मनुष्य इतरांस वार करून जसे अत्यंत दुःख देतो, त्याप्रमाणेंच कर्कशेनें दुर्वर्तन व निष्ठुर कृत्य करून, सर्वांस दुःख दिलें, हा भाव. ३०. दुःखरूप गृहाचा. ३१. अत्यंत बळकट.

तेजस्वीही तापें लागे **छा**येसि अर्क[1] शापाया. ॥ १८
भिंतीवरल्या काढी चित्रांच्या खरवडोनि ती खपल्या[2], ।
मंजूषेंत[3] भरुनि दे आंदण; ऐशा न कुस्त्रिया[4] खपल्या[5]. ॥ १९
पेटाऱ्यांत भरुनि ती बा! पाथेयार्थ[6] अन्न दे उष्टें. ।
दुष्टें अशा कलत्रें[7] लज्जा सुकुलासि[8] बहु, जशी कुष्टें[9]. ॥ २०
भोजनसमयीं उतरे मध्यान्हीं ती नदीतटीं[10] **शी**ला, ।
लीला जेविं **शि**वाची[11], छद्म[12] किमपि[13] ठाउकें नसे जीला. ॥ २१
ती तेथें देवार्चनसक्ता[14], भक्ता, बहु स्त्रिया पाहे; ।
त्यांसि पुसे, 'आर्या! हो! सांगा, कोण प्रसंग हा आहे?' ॥ २२
वदल्या स्त्रिया, 'सुशीले! **शी**ले! लीलेंकरूनि विश्वास[15] ।
जो प्रभु **अ**नंत रचितो, त्या पूजितसों धरूनि विश्वास[16]. ॥ २३
व्रत, शुक्ला **भा**द्रपदीं मासीं येतां चतुर्दशी, भावें ।
ध्यावें; भव्य **अ**नंतव्रत हें पूजूनि, विष्णुतें ध्यावें. ॥ २४
ग्रंथि[17] चतुर्दश[18] देउनि, पूजुनि दोरक[19], करांत[20] बांधावा; ।
**प्र**भुला अर्पायास्तव घृतपाचित[21] सत्पदार्थ[22] रांधावा. ॥ २५
करबद्ध[23] रम्य[24] दोरक थोर करी भव्य[25] नित्य धरित्यांचें[26]; ।

---

१. सूर्य. उत्तरार्धाचा अर्थ–तेजस्वीही (स्वतः तेजस्वी असतांही) अर्क (सूर्य) तापें (त्रासानें, छळानें उबून) छायेसि (आपली कपटी कर्कशा पत्नी जी छाया, तीस) शापाया लागे. सूर्याची खरी पत्नी संज्ञा. ती सूर्याच्या न कळत माहेरीं गेली व तिच्या (संज्ञेच्या) वेषानें छाया ही पत्नी-भावानें सूर्याजवळ राहिली. सूर्याला कांहीं काळपर्यंत हें कपट उमगलें नाहीं. छायेच्या पोटींच सूर्यास शनि व सावर्णि, हे मुलगे व तपनी ही मुलगी झाली. **अर्थान्तरन्यास.** २ खवळ्या. ३. पेटींत. ४. वाईट स्त्रिया. ५. संपल्या. पंत म्हणतात, 'अशा दुष्ट स्त्रिया अजूनही जगांत दुर्मिळ झालेल्या नाहींत.' ६. प्रवासाच्या सामग्रीसाठीं. ७. स्त्रीनें. ८. चांगल्या कुळास. ९. कोडानें. हा रोग आनुवंशिक असलेला वारंवार आढळतो; तेव्हां तो कुलाला एक प्रकारचा दोष आहे. १०. नदीच्या तीरावर. ११. शिवाची 'भोळा सांब' म्हणून प्रसिद्धि आहेच. १२. कपट. १३. किंचितही. उत्तरार्धाचा भावार्थ–शिवाची वृत्ति जसी भोळी, तशी जी भोळी होती. शिवाच्या रीतींत कपटाचा लेशही असत नाहीं म्हणजे भक्तानें कांहींही मागितलें तरी तो त्यास देतो, भक्ताच्या मागण्यांत कांहीं कपट असेल, असें मनांत आणीत नाहीं; त्याप्रमाणें जिला थोडेंसुद्धां कपट माहीत नाहीं. १४. देवपूजेविषयीं आसक्त. याचें विशेष्य स्त्रिया. १५. जगास. १६. भरंवसा. १७. गांठी १८. चवदा. १९. दोरा. २०. हातांत. २१. तुपांत शिजविलेला. २२. चांगलें अन्न. २३. हातांत बांधलेला. २४. सुंदर. २५. कल्याण. २६. धारण करणाराचें.

हरि त्याचें हित साधी [1]सदनंतव्रतसुमार्ग वरित्याचें. ॥ २६
साध्वींनीं कथिलें जें, शीला सुव्रत [2]वरी यथाविधि तें, ।
गेली शरण प्रभुतें बापा! धर्मा! नृपा! [3]कृपानिधितें. ॥ २७
विप्राला द्याया ती उघडुनि पाथेय जों नृपा! पाहे, ।
तों त्या व्रतप्रभावें अद्भुत [4]दिव्यान्न जाहलें आहे. ॥ २८
त्या चित्रांच्या खपल्या दिव्य [5]विभूषा [6]कुरूत्तमा! झाल्या, ।
व्रत तीस म्हणे, 'यांतें, महिमा व्हाया प्रसिद्ध माझा, [7]ल्या.' ॥ २९
वा! त्या दिव्यान्नाचें [8]वाणक विप्रासि आदरें अर्पी, ।
मग आपणही भक्षी, आधीं तेणें पतीसही [9]तर्पी. ॥ ३०
बैसोनि [10]गोरथावरि, गेली, पावुनि [11]महा, [12]घरा शीला. ।
देतें पुण्य अनंतव्रत हें, नाशुनि [13]महाघराशीला. ॥ ३१
व्रत झालें [14]तद्गेहीं [15]गोधनधनधान्यसंपदा [16]रचितें, ।
वा! उघडलें म्हणाया [17]श्रीचें [18]दुर्गतिस 'संप' दारचि तें. ॥ ३२
एका समयीं [19]स्वस्त्रीवामकरीं दोरकासि तो पाहे, ।
वाहे मनांत शंका, दैवें कौंडिन्य न [20]प्रभो! साहे. ॥ ३३
तीस म्हणे, 'तुज [21]कुस्त्रीमत [22]हितें [23]वश्यप्रयोग कां गमला? ।
कोणें दुष्ट जनें हा कथिला? मूढे! [24]यथार्थ सांग मला.' ॥ ३४
शीला म्हणे, 'शिवशिव! स्वामी! दोरक अनंत हा धरिला, ।
साध्वींच्या उपदेशें [25]कल्याणप्रद म्हणोनि [26]आदरिला. ॥ ३४
हा [27]श्रितकल्पतरु प्रभु [28]दे धनधान्यादिसंपदा [29]साचा; ।
याचा [30]प्रसाद [31]नुरवी [32]संसारत्रासकंप दासाचा. ॥ ३६

---

१. खऱ्या अनंतव्रताचा सुमार्ग स्वीकारणाऱ्याचें. २. स्वीकारी. ३. कृपेच्या सांठ्यातें, अनंताला. ४. उत्तम अन्न. ५. दागिने, भूषणें. ६. धर्मा! ७. (शरीरावर) घाला. **चेतनोक्ति.** ८. वाण. ९. तृप्त करी. १०. बैल जोडलेल्या गाडीवर. ११. आनंदास. १२. घरास. १३. मोठ्या पातकराशीला. १४. तिच्या (शीलेच्या) घरीं. १५. गाई (=गुरें ढोरें), द्रव्य, धान्य यांची विपुलता. १६ रचितें झालें=सांठवितें झालें. १७. लक्ष्मीचें. १८. वाईट अवस्थेस. ह्या अर्धाचा अन्वय—वा! (धर्मा!) दुर्गतिस 'संप' म्हणाया तें (व्रत) श्रीचें दारचि उघडलें. **उत्प्रेक्षा.** १९. आपल्या स्त्रीच्या डाव्या हातांत. २०. धर्मा! २१. वाईट स्त्रीस मान्य असलेला. २२. हितकारक. २३. मंत्रतंत्र, जादूटोणा, इत्यादि. २४. खरें. सर्वसंग्रहाचा 'कथिला मूढें यथार्थ' असा पाठ आहे. २५. हितकर. २६. स्वीकारिला. २७. भक्तांचा कल्पवृक्ष. २८. 'हे' असा पाठ आढळतो. २९. खरा. ३०. कृपा. ३१. न उरवी. ३२. संसारदुःखापासून होणारी भीति.

ऐकुनि असें, विवेक[1], स्त्रीकरगत[2] दोरकहि, बळें सोडी; ।
तोडी, दहनीं[3] टाकी; ऐसें दैवें अभद्र[4] तो जोडी. ॥ ३७
'हा! हा!' म्हणोनि, **शीला**, काढुनि, दुग्धांत दोर ती घाली; ।
झाली खिन्ना, रडली; गेली संपत्ति, आपदा[5] आली. ॥ ३८
त्या अपराधें गोधन, धन, धान्य, समस्त[6] **पां**डवा ! गेलें; ।
नेलें चोरांहीं बा! उरलें, गृह दग्ध अग्निनें केलें. ॥ ३९
बा! त्या **कौं**डिन्याची पाठ[7] पुरविली[7] सदैव कलहांनीं[8]; ।
न लहानीं, थोरींही, स्नेह उरे; होय देहबलहानी[9]. ॥ ४०
**कौं**डिन्य म्हणे, 'झालों दुर्गतितें[10] पात्र, जेविं कीलेतें[11]; ।
नुमजे मज, वद, कारण तर्कें जें या दशेसि[12], **शीले**! तें.' ॥ ४१
**शील**ा म्हणे, 'अनंतप्रभुलंघनरूप[13] मंतुचें[13] फल हें; ।
होतें दुःख प्रतिदिन[14] दारिद्र्यें, बंधुजनकृतें[15] कलहें. ॥ ४२
होय **अनंत**प्रभुचा पुनरपि जेणें प्रसाद, तो यत्न ।
निश्चय करुनि करावा; हारविलें हातिंचें महारत्न[16]!' ॥ ४३
धरिलें सत्युक्त[17] मनीं; सदनीं[18] बहु पोळला, जसा दहनीं[19], ।
म्हणत, '**अनंत**! **अनंत**चि!' बा! शिरला क्षिप्र विप्र तो गहनीं[20].॥ ४४
'भेटेल **अनंत** कधीं? करिन **अनंत**ासि मी कधीं नमन?' ।
ऐसें म्हणत, फिरे तो, ज्याचें स्मृतिच्या[21] सदा अधीन मन. ॥ ४५
निरशन[22] फिरे, म्हणे, 'मी चुकलोंचि, **अनंत**दोरका! पावें; ।
'चुकलों' म्हणतां, नमितां, अपराधीही[23] न पोर कांपावें.' ॥ ४६

---

१ विचार. २. स्त्रीच्या हातांत असलेला. अन्वयः—असें ऐकुनि (तो) (आपला) विवेक (व) स्त्रीकरगत दोरकहि (हे दोन्ही) बळें सोडी. भावार्थ—त्यानें विवेक सोडला व दोराहि सोडला. **तुल्ययोगिता.** ३. अग्नींत. ४. अकल्याण, पातक. ५. दुर्दशा. ६. सर्व. ७. पाठ पुरविणें=पुरेपुरेसें करणें, त्रासविणें. **लोकोक्ति.** ८. भांडणांनीं. ९. शरीरशक्तीचा नाश. १०. वाईट अवस्थेस. ११. ज्वालेतें. १२. अवस्थेस. १३. अनंतप्रभूची अवज्ञा हाच अपराध त्याचें. १४. प्रत्येक दिवशीं, दररोज. १५. आप्तांनीं केलेल्या. याचें विशेष्य 'कलहें.' १६. मोठें रत्न. **रूपकातिशयोक्ति.** १७. सती+उक्त=पतिव्रतेनें (शीलेनें) सांगितलेलें. १८. घरीं. १९. अग्नींत. **उत्प्रेक्षा.** २०. अरण्यांत. २१. (अनंतनामाच्या) स्मरणाच्या. ज्याचें मन सदा स्मृतिच्या अधीन म्हणजे ज्याचें मन सदोदित अनंतनामस्मरणांत गढून गेलें होतें. २२. उपाशी. २३. दोषी. **अर्थान्तरन्यास.**

अवलोकिला[1] रसालद्रुम[2] विप्रें काननांत[3] पिकला[4] हो ! ।
ज्याच्या घेति, रसातें न समर्पुनि आननांत[5], पिक[6] लाहो[7]. ॥ ४७
त्यासि पुसे तो, जेणें श्रेष्ठहि तृणतुल्य[8] लेखिला[9] काय[10], ।
'बा ! चूता[11] ! सांग मला, त्वां देव अनंत देखिला काय ?' ॥ ४८
माकंद[12] म्हणे, 'विप्रा ! मज देव अनंत तो न आढळला.' ।
शोध करित जाय वनीं, त्याचा निश्चय न लेश[13] बा ! ढळला. ॥ ४९
स्वपय[14] प्राशी ऐसी विप्रें विपिनांत[15] पाहिली गाय; ।
पाय नमुनि, तीस पुसे, 'त्वां देव अनंत देखिला काय ?' ॥ ५०
तीहि तसेंच वदे, मग कौंडिन्य क्षोणिसुर[16] म्हणे 'हाय !,' ।
तों शाद्वलीं[17] विलोकी गोवृष[18], त्यासहि पुसावया जाय. ॥ ५१
पुसतां तो वृषहि म्हणे, 'स्वामी ! न अनंतदेव मी जाणें, ।
खाणेंमात्र मज कळे; शोधीत, पुसत, असेंच बा ! जाणें[19].' ॥ ५२
पुष्करिणीद्वय[20] पाहे, ज्यांच्या अन्योन्य[21] मिसळल्या लाटा; ।
त्यातें म्हणे, 'बहु हिता पांथातें[22] मायमावसी[23] वाटां. ॥ ५३
प्रार्थीं, पुष्करिणी हो ! विदित[24] जरि अनंतदेव, सांगावा; ।
उपकार श्रेष्ठ न, तरि कविंनीं होऊनि मुदित[25] कां गावा ?' ॥ ५४
पुष्करिणी त्या वदल्या, 'आम्हांसि अनंत ठावका नाहीं, ।
आम्हीं आयकिलाही त्याचा न स्पष्ट ठाव[26] कानांहीं.' ॥ ५५
त्याउपरि[27] पुढें जातां, द्विज पाहे गर्दभास गा ! राया ! ।
त्यातेंहि तसेंच पुसे, त्या दुःखीं आपणासि ताराया. ॥ ५६

---

१. पाहिला. २. आम्रवृक्ष. ३. वनांत. ४. पिकलेला. ५. मुखांत. ६. कोकिळ. ७. लाभ. या अर्थाचा अन्वय—ज्याच्या रसातें आननांत समर्पुनि पिक लाहो न घेति. ८. गवतासारखा. ९. मानिला. १०. देह. ११. आम्रवृक्षा ! १२. आम्रवृक्ष. १३. थोडाही. १४. आपलें दुग्ध. १५. वनांत. १६. ब्राह्मण. १७. कुरणांत. १८. बैल. १९. जावें. क्रियावाचक धातुसाधित नामें विध्यर्थी क्रियापदाऐवजीं योजितात. उ० कळावें बहुत काय लिहिणें हे विनंति. या वाक्यांत 'लिहिणें' हें 'लिहावें' या शब्दाऐवजीं योजिलें आहे. २०. दोन लहान तळीं. २१. परस्पर. २२. प्रवाशास. २३. माता. या गीतीचा अन्वय—ज्याच्या लाटा अन्योन्य मिसळल्या (असें) पुष्करिणीद्वय (कौंडिन्य) पाहे (व) त्यातें म्हणे, (तुम्ही) पांथातें बहुहिता मायमावसी वाटां. भावार्थ—ज्यांच्या लाटा परस्परांत मिसळत होत्या अशा दोन पुष्करिणी कौंडिन्यानें पाहिल्या व तो त्यांस म्हणाला तुम्ही प्रवाशांस फार हितकारक अशा आई व मावशीच वाटतां म्हणजे आईनें किंवा मावशीनें जसें मनुष्यास सुख द्यावें, तसें तुम्ही प्रवाशांस फार सुख देतां. २४. माहीत. २५. आनंदित. **अर्थान्तरन्यास.** हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. २६. ठिकाण. २७. त्यानंतर.

[1]प्रमुदित काय करिल हो! तो करुनि अनंतकथन [2]रासभ या? ।
नेणे स्वयेंचि, कैसा दाविल भयरहित पथ नरा [3]सभया? ॥ ५७
अवलोकिला [4]तयावरि मोठा गज काननीं, [5]अनंतर तें ।
पुसिलें, इतरांला जें, त्याप्रतिही त्या द्विजें [6]अनंतरतें. ॥ ५८
जो नित्य [7]मदांध वनीं [8]गुरुतरुवररम्यकुंज रगडीतो, ।
सांगुनि अनंत, होइल विप्राचा काय [9]कुंजर [10]गडी तो? ॥ ५९
होउनि निराश दुःखित, निजला, भिजला [11]निजाश्रुनीरांनीं, ।
आला अनंत वृद्धद्विजरूपें [12]द्रवउनियां मनीं रानीं. ॥ ६०
उठवी कौंडिन्यातें [13]करुणावरुणालय स्वयें बा! गा! ।
'मागा वर' [14]म्हणता जो [15]शरणागतरक्षणीं सदा जागा. ॥ ६१
बोले 'अनंत तुज, ये, दाखवितों; त्यजुनि कानना, चाल.' ।
[16]राजाजी! साधु तुम्ही ऐकुनि हें नवल, कां न नाचाल? ॥ ६२
[17]दक्षिणकरीं धरुनि, तो वृद्धें नेला गुहेंत [18]शीलेशं; ।
श्रम, [19]वाल्मीकिकृति जशी, शिरतां नुरवीच [20]ती तशी लेश. ॥ ६३
शिरतां गुहेंत, झाली [21]सुपुरी निववावया मना दिसती; ।
सकळां पुरींत मुख्या जी, स्त्रीमध्यें जसी [22]अनादिसती. ॥ ६४
तींत [23]मणिप्रासादीं विप्रासि अनंतदेव दाखविला ।
त्या वृद्धें, [24]रुग्णातें जेविं [25]सुधार्णवतरंग चाखविला. ॥ ६५
विप्र अनंतप्रभुस प्रेक्षी, जैसा [26]मयूर [27]घनदास; ।
नमुनि, स्तवुनि, समर्पी [28]तच्चरणीं शिर, तसेंचि मन, [29]दास. ॥ ६६
'[30]पोटीं [30]घालावा त्वां, [31]जोडी माझ्या नसेचि अपराधा; ।

---

१. हर्षित. २. गर्दभ. ३. भययुक्तास. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे; **अर्थान्तरन्यास.** ४. त्यानंतर. ५. नंतर. ६. अनंताच्या ठायीं आसक्तानें, अनंतावर ज्याचा अत्यंत भाव आहे अशानें. ७. गर्वानें अंधळा. ८. मोठे वृक्ष व सुंदर वेलींच्या जाळ्या. ९. हत्ती. १०. मित्र. ११. निज+अश्रु+नीरांनीं=आपल्या आसवांनीं. १२. दया येऊन. १३. कृपासागर. १४. म्हणणारा. १५. शरण आलेल्याच्या रक्षणाविषयीं. **पर्यायोक्ति.** १६. धर्मराजा! १७. उजव्या हातांत. १८. शीलेचा पति, कौंडिन्य. १९. वाल्मीकीचें काव्य, रामायण. २०. गुहा. २१. उत्तम नगर. या अर्धांचा अन्वय–गुहेंत शिरतां, मना निववाया सुपुरी दिसती झाली. २२. पार्वती. २३. रत्नांच्या राजवाड्यांत. २४. रोग्यातें. २५. अमृतसागराची लाट. २६. मोर. २७. मेघास. २८. अनंतप्रभूच्या पदीं. २९. भक्त कौंडिन्य. **तुल्ययोगिता.** ३०. पोटीं घालणें=क्षमा करणें. **लोकोक्ति.** ३१. उपमा. **असम.**

त्वत्सम[1] तूंचि प्रभु, बा! त्वदितर[2] अमृतें म्हणेल न पैरा[3] धां[4]. ॥ ६७
शरणागतवत्सल तूं शरणागत मी, म्हणोनि रक्ष मला; ।
जगदीश्वरा! अनंता! त्वदितर दीनावनास[5] न क्षमला[6].' ॥ ६८
ऐसें कौंडिन्य वदे; स्मित करुनि, म्हणे अनंत विनतातें[7], ।
'प्रेम नतीं करितों मी, तैसें करिजेल[8] लेशहि न तातें. ॥ ६९
भय न धरीं विप्रा! तूं, जें तव हृदयीं असेल तें बोल; ।
हो लब्धेप्सित[9], बापा! प्रणतीं[10] मच्चित्त सर्वदा लोल[11].' ॥ ७०
विप्र म्हणे, 'म्यां दोरक तोडुनि दहनांत टाकिला रोषें, ।
मज सोडुनि गेली श्री[12], स्वजनाची प्रीतिही, तया दोषें. ॥ ७१
त्या दोषाची शांति प्रभुवर्या! सांग या, अवन[13] तातें ।
सुज्ञाचेंहि करावें, उद्धरि ती कां गया अवनतातें[14]? ॥ ७२
त्यासि अनंत म्हणे, "जरि आम्हांसि, म्हणसि, 'उपाय हाच वदा,' ।
तरि तूं करीं अनंतव्रत भक्तिकरूनि अब्द[15] बा! चवदा. ॥ ७३
भोगिसिल संपदेतें, पुनरपि तूं पावसील संततितें, ।
नृप वर्णितिल, तसेचि प्रेमें श्रीनारदादि संत, तितें[16]. ॥ ७४
भोगूनि भोग[17] पुष्कळ, माझी स्मृति[18] पावसील तूं अंतीं, ।
परमगतिप्रति[19] वरिसिल, मागावी मज भजोनि जी संतीं[20]. ॥ ७५
ऐकेल हे कथा जो, हें सद्व्रत जो करील, तोहि तमीं[21] ।
न बुडेल, तुला वर घे देतों हा भक्तिशीलमोहित[22] मी; ॥ ७६
जा राज्य करीं, विप्रा! कौंडिन्या! पावसील तूं मजला; ।
सजला[23] वैकुंठा तो जाया, जो भक्तिनें मला भजला.' ॥ ७७
वंदुनि कौंडिन्य पुसे, 'चूतद्रुम[24] कोण? कोण ती गाय? ।
वृष[25], पुष्करिणीद्वय[26], खर, गजवर[27], जे मार्गदृष्ट[28], ते काय?' ॥ ७८

---

१. **अनन्वय.** २. तुझ्याहून अन्य. ३. दुसऱ्यास. ४. तृप्त हो, **व्यतिरेक.** ५. दीनांच्या रक्षणास. ६. समर्थ झाला. ७. नम्रातें. ८. हें 'कर' धातूचें भविष्यकाळीं तृतीय पुरुषाचें कर्मणि-रूप आहे. **व्यतिरेक.** ९. लब्ध+ईप्सित=ज्याचे मनोरथ पूर्ण झाले आहेत असा. १०. नम्राच्या ठायीं. ११. उत्सुक. **काव्यलिंग.** १२. संपत्ति. १३. रक्षण. १४. नम्रातें. अन्वयार्थः—तातें सुज्ञाचेंही अवन करावें; [मग अज्ञाचें तर केलेंच पाहिजे]; [असें नसेल, तर] गया अवनतातें कां उद्धरी? **दृष्टान्त.** १५. वर्षें. १६. संततितें. १७. सुखें, विषय. १८. स्मरण. १९. मोक्षपदास. २०. साधूंनीं. २१. अज्ञानांत. २२. भक्ति हेंच शील ज्यांचें त्यांस लुब्ध, भक्तांना वश झालेला. २३. तयार झाला. २४. आम्रवृक्ष. २५. बैल. २६. पोखरणींची जोडी. २७. हस्तिश्रेष्ठ. २८. मार्गांत पाहिलेले.

देव म्हणे, 'पूर्वं[1] भवीं विद्याधन असुनि वहु, न दे कवडी; ।
झाला असेव्य[2] चूत, प्राप्त सुगतितें[3] अनादरें[4] दवडी. ॥ ७९
मग गाय देखिली त्वां, ती वसुधा[5] बीज[6] पेरिलें भक्षी, ।
प्रसवुनि विविधें सस्यें[7], त्या स्वरसें न प्रजांसि जी रक्षी. ॥ ८०
जो वृष, तो दांभिकवरधर्म[8], असें त्वां यथार्थ जाणावें; ।
मत्प्राप्ति तशा धर्मैं नाहीं, हें त्वन्मनांत बाणावें. ॥ ८१
पुष्करिणी त्या भगिनी, अन्योन्यचि देत घेत होत्या गा! ।
मत्पर[9] जो जन त्याचें वश[10] तैशा[13] त्यां[13] न चेत[11] हो[12] त्यागा[13]. ॥ ८२
खर जो, तो क्रोध समज; बा! मद जो, मूर्त जाण तो गज, गा! ।
ज्यांच्या योगें होतो नानाविधनरकभोग[14] रोग जगा. ॥ ८३
कौंडिन्या! जो वृद्धब्राह्मण, तो मी अनंत बा! समज; ।
मदनुग्रहेंचि[15] पावे मच्चिंतनरत[16] विरक्त[17] दास मज. ॥ ८४
जी पाहिली गुहा त्वां, ती संसृति[18], तत्व हें तुला समजो. ।
तो[19] मत्प्रिय, मातेसम मज मानी, आपणा मुलासम, जो. ॥ ८५
जा स्वगृहातें, व्रत घे चवदा वर्षें, करीं सदाचरण; ।
मज पावसिल सुखें; हे माझे हृदयीं धरीं सदा चरण. ॥ ८६
सांग[20] व्रत उद्यापनविधिनें[21]; न करीं कदापि आळस त्या; ।
येऊं द्यावी न चुकी, सशीं देती जसी न आळ[22] सत्या[23].' ॥ ८७
'ब्राह्मण आधीं चुकला, परि आला शरण, मुक्तिपद[24] लाहो[25],' ।
यापरि मनांत आणुनि भेटुनि, ऐसें अनंत वदला हो! ॥ ८८

---

१. पूर्वजन्मीं. २. सेवण्यास अयोग्य असा आम्रवृक्ष. ३. चांगल्या अवस्थेला. ४. हे लत्तेनें. ५. पृथ्वी. ६. बीं. ७. विविधें सस्यें=पुष्कळ प्रकारचीं धान्यें. ८. ढोंगी लोकांत श्रेष्ठ अशांचा दिखाऊ धर्म; भक्तीचें वेमालूम सोंग आणणाऱ्यांचा बेगडी धर्माचार. ९ माझ्या ठिकाणीं तत्पर. १०. अधीन. ११. चित्त. १२. होवो. १३. त्या प्रकारच्या दानास. १४. नानाप्रकारच्या नरकांचे आहेत भोग ज्यांमध्यें. याचें विशेष्य 'रोग.' १५. माझ्या कृपेनेंच. १६. माझ्या स्मरणाच्या ठायीं आसक्त. १७. वैराग्ययुक्त. १८. संसार. १९. या अर्धाचा अन्वय–जो आपणा मुलासम (व) मज मातेसम मानी, तो मत्प्रिय. २०. यथास्थित. २१. व्रत संपूर्ण करण्याच्या विधीनें. २२. (पातिव्रत्याविषयीं) आरोप. २३. पतिव्रता. २४. मोक्ष. २५. लाभो. द्वितीय चरणाचा अन्वय–परि शरण आला (म्हणून) मुक्तिपद लाहो.

मग अंतर्हित[1] झाला, स्वप्न[2] क्षणभरि मनांत वाटविला; ।
प्रभुच्या प्रसादघटजें[3] शरणागतशोकसिंधु[4] आटविला. ॥ ८९

कौंडिन्य द्विज आला, होउनि अत्यंत हृष्ट, सदनातें. ।
समजे प्रसाद शीला पतिच्या अवलोकितांचि वदनातें. ॥ ९०

शीलेतें कौंडिन्य प्रभुदर्शनवृत्त सर्व आयकवी; ।
सांगे, "विलोकिला म्यां तो, ज्याचे चिंतितात पाय कवी. ॥ ९१

शीले! धन्ये! सुव्रत वरिलें त्वां माझिया स्व उद्धारा[5]; ।
शुद्धा रामा[6] तुजसम तूंचि; तुझी शीलरीति[7] मुद्धारा[8]. ॥ ९२

सत्य 'अनंतप्रभुतें' कवि 'चिंतुन' म्हणति जें 'निवे दून[9]' ।
शीले! प्रसादभाजन[10] झालों, अपराध मी निवेदून[11]. ॥ ९३

शक्य जगज्जन्मस्थितिलयकल्पनगान[12] देववेदा न. ।
प्रभुचरणरेणु[13] दे जें, तें कल्पनगा[14] न देववे दान." ॥ ९४

श्रीकृष्ण म्हणे, "राजा! आयकिली कीं कथा मुखें माज्या? ।
पावसिल व्रत करितां त्या भव्या[15], वांछितोसि तूं बा! ज्या. ॥ ९५

दोरक बांधोनि करीं म्हणति 'गुरुजनीं[16]' महाकवि 'नटावें.' ।
श्रीमदनंतपदाब्जीं, संतीं देतां न हांक[17], विनटावें[18]. ॥ ९६

धर्मा! या व्रतराजें[19] अगणित तरले, पुढेंहि तरतील; ।
सरतील श्रम सारे, प्राणी जन्मुनि पुन्हा न मरतील." ॥ ९७

**उपसंहार.**

क्षुधिता जसें म्हणावें, ताटीं वाढूनियां सुपायस[20], 'खा;' ।
तेविं विपत्तींत कथी धर्माला जिष्णुचा[21] उपाय सखा. ॥ ९८

---

१. गुप्त. २. हा शब्द येथें पुल्लिंगी आहे. ३. कृपारूप अगस्तिऋषीनें. अगस्तिऋषीनें समुद्र शोषून टाकला, अशी कथा आहे. ४. शरण आलेल्याचा शोकरूप समुद्र. ५. माझा व तुझा स्वतःचा उद्धार होण्यासाठीं. ६. स्त्री. **अनन्वय.** ७. स्वभाव व चाल. ८. आनंदाची धार. ९. संतप्त. या अर्धाचा अन्वय—अनंतप्रभुतें चिंतुनि दून निवे, (असें) जें कवि म्हणति, (तें) सत्य (आहे). १०. कृपेचें पात्र. ११. सांगून. १२. विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं घडविणाऱ्याचें वर्णन. १३. अनंतदेवाच्या चरणाचा रजःकण. १४. कल्पवृक्षास. **व्यतिरेक.** १५. कल्याणास. १६. मोठ्या लोकांत. १७. हाक न देतां=साह्य न करितां. १८. रममाण १९. व्रतश्रेष्ठानें. २०. उत्तम क्षीर. २१. अर्जुनाचा मित्र श्रीकृष्ण.

सांगे स्वयें अनंत प्र[1]भुसत्तम कृष्ण असि कथा राया. ।
श्री[2]रामसुतमयूरें लिहिली हरिभक्त, रसिक थी[3]राराया. ॥ ९९
श्रीमदनंतकथा हे श्रीम[4]दनंतांघ्रिपंकजीं भावें ।
वाहिलि भक्तमयूरें, प्रभुचें यश नित्य आदरें गावें. ॥ १००
कवि म्हणाति, 'कीर्तनें या कलिमाजि अ[6]नंतराय स[5]व घडतो, ।
यश गातां, आयकितां, होतोचि अनंतराय स[7]वघड तो.' ॥ १०१
रसिक श्रीहरिभक्त श्रीहरिच, करुनि तयांस मी नमन, ।
मागतसें, 'हें व्हावें श्री[8]रामयशोर्णवांत मी[9]नें मन. ॥ १०२
जो सुरसिक हरिजन, तो भगवच्चरितींच देखिला र[10]मला, ।
म्हणतो 'हरिकीर्तन जें, तें सु[11]रभीचें न दे खि[12]लार मला.' ॥ १०३

---

## ८ निंदकपंचक.

(विविधवृत्त.)

दानस्नानजपोपवासनियमें पापासि जें वारितें,
देतें पुण्य जनासि, 'तीर्थ' म्हणुनी सन्मा[13]निसी वारि तें. ।
जो ऐ[14]तन्निरपेक्ष निंदक, गुणें तै[15]सेंचि पा[16]पापहा,
त्याला साधु न कां मना! म्हणसि? रे! सन्मार्ग बापा! पै[17]हा. ॥ १
पापाचे बहुदाट की[18]ट चढले फारा दिसांचे लया
नेत्ये[19] सर्व, मना पुन्हा मे[20]ळवितां तैसें न सांचेल या, ।
दे[19] आम्हां कुतुकें, परे[21]ष्टकरणोद्योगीं फुका जी भ[19]रे,
सन्मा[22]न्या, चि[22]रंजीविनी, तुझि असो ती निंदका! जीभ रे! ॥ २

---

१. विभुश्रेष्ठ, परमेश्वर. २. रामचंद्रसुत मोरोपंत त्यानें. ३. स्थिर व्हावा म्हणून, भक्तिरसांत रंगून जावा म्हणून. ४. श्रीमत् अनंतचरणकमलीं. ५. निर्विघ्न. ६. यश. अन्वय—कवि म्हणती, या कलिमाजि [प्रभुनांवाच्या] कीर्तनें अनंतराय सव घडतो. ७. सुलभ, सोपा. ८. श्रीराम+यशः+अर्णव=श्रीरामाच्या कीर्तिरूप समुद्रांत. ९. मासा. १०. रमलेला. ११. कामधेनूचें. १२. कळप. या गीतीचा अन्वय—जो सुरसिक हरिजन तो भगवच्चरितींच रमला देखिला; (तो) म्हणतो, जें [सुख] हरिकीर्तन मला दे, तें सुरभीचें खिलार न (दे). **व्यतिरेक.** १३. हे मना! तूं पूज्य समजतेस. अन्वयः—तें वारि (पाणी) तीर्थ म्हणुनी (त्याला तीर्थ हें नांव देऊन) सन्मानिसी. १४. दानस्नानादिकांची ज्याला मुळींच अपेक्षा नाहीं असा. १५. तीर्थाप्रमाणेंच. १६. पापहर. १७. **शार्दूलविक्रीडित** वृत्त. १८. कलंक, मळ. १९. यांचा कर्ता 'जी (जीभ)'. २०. 'मिळवितां' असा पाठ आढळतो. २१. परोपकाराच्या उद्योगांत. २२. हीं 'जीभे'चीं विविविशेषणें.

[1]नेती माथां परांचा दुरितभर बळें, तुल्य थोरीं लहानीं,
देती[1] पुण्यें सुकष्टेंकरुनि मिळविलीं, मानिती ही न हानी[2], ।
एवं ज्यांची परार्थ स्थिति, सदुपकृती सज्जना सोयरी ती[3],
साजे निंदा तिला ही. अजि! कविजनहो! हे बरी होय रीती[4]. ॥ २
आम्हां श्रीरामभक्तां अजितनुतिविणें[5] स्वस्तुती तों न अर्हा[6];
पापघ्नी[7], पुण्यदात्री, करिशिल जरि तूं, निंदका! होय गर्हा[8]. ।
मानूं तोषा न रोषा, परि म्हणति तुम्हां निंदकां वेद, 'वाटे
स्वर्गाच्या चूकले हे पडतिल नरकीं,' हा मना खेद वाटे. ॥ ४
सुमार्गींही हेतु स्खलनपतना जेंवि खळगा, ।
प्रमादी जे, त्यांला अचुकचि मना! तेंवि खळ, गा! ।
न कांटे, धोंडेही, करिति गतिचा रोध डबरे
तयांच्या, जे आंगें कुशळपद चालों धड बेरे[9]. ॥ ५

---

१. यांचा कर्ता 'निंदक' अध्याहृत आहे. २. या अर्धांतील क्रिया सज्जनाला सरळ रीतीनें व निंदकाला औपरोधिक रीतीनें लागू करावयाच्या. ३. अशा प्रकारें ज्या निंदकांची ती राहणी व हितकर क्रिया साधु लोकांची सोयरी (संबंधी, नातेवाईक) आहे. ४. **स्रग्धरा**वृत्त. ५. ईशस्तुती-वांचून. ६. योग्य. ७. हीं 'गर्हे'चीं विधिविशेषणें आहेत. ८. निंदा. ९. उत्तरार्धाचा अन्वयः— जे आंगें (स्वतः) चालों (चालण्याला, चालण्याच्या कामांत) धड बरे कुशलपद, तयांच्या गतिचा रोध डबरे, कांटे, धोंडेही न करिति. **शार्दूलविक्रीडित**वृत्त. या प्रकरणांतील पहिल्या चार श्लोकांत निंदकांची **व्याजस्तुति** म्हणजे दिसण्यांत स्तुति, परंतु वास्तविक निंदा, आहे. या प्रकरणावरून पंतांची औपरोधिक खोंचदार भाषाशैली चांगलीच प्रत्ययास येते. या प्रकरणाशीं पुढील तुकारामी अभंग ताडून पाहण्यासारखा आहे:—"निंदक तो परउपकारी, । काय वर्णूं त्याची थोरी? । तो रजकाहुनी भला, । परी सर्व गुणें आगळा.॥१०. नेघे मोल, धुतो फुका । पाप वरच्या वरी, देखा; । करितसे साधका । शुद्ध सर तिन्हीं लोकीं ॥११. मुखसंदवणी सांगातें, । अवघें सांटविलें तेथें; । जिव्हा सावण निरुते । दोष काढी जन्माचे. ॥१२. तया ठाव यमपुरीं, । वास करणें अघोरीं, । त्यासी दंडण करी । तुका म्हणे न्हाणी ते. ॥१३." तसेंच पुढील एकनाथी रामायणांतील उताराही आदरणीय आहे:—"कथा निंदिती, वंदिती, जनीं । ते माउली माझे दोनी; । तो निंदक सखी जननी । मजलागुनी कृपाळू. ॥२१. जैसे जननीचे करतळ । वरीवरी क्षाळिती बाह्य मळ; । निंदक सबाह्य कळिमळ । करी निर्मळ निजवदनें. ॥ २२. यालागीं निंदकची तत्वता । साह्य सखा परमार्था, । त्या निंदकातें निंदितां, । दोषी सर्वथा स्वयें होय. ॥२३. निंदक म्हणजे परमामृत, । निर्द्वंद्व सुखस्वार्थ; । निंदक न पाहे निजस्वार्थ, । अतिसमर्थ परोपकारी. ॥२४. जेथें निंदा सुस्वरूप समाय, । तेथें मस्तकीं वदूं पाय; । धन्य धन्य त्याची माय । जो निंदा साहे निर्द्वंद्व. ॥२५. (भावार्थरामायण कां० १, अ० १).

## ९ [1]भस्मासुराख्यान.

(विविधवृत्त.)

जो समर्थ [2]भव मोक्षक राया! साधु गाति [3]भवमोक्ष करायाः ।
तत्पदें नमुनि, सादर [4]सारा कीर्ति गा; हरिं असा [5]दर सारा. ॥ १

पूर्वी होता [6]अमर्त्येतर शकुनिसुत क्रूर, त्याची [7]वृकाऽव्हा
हिंस्रत्वें निर्दयत्वें 'त्यजुनि मद' म्हणे 'दूर' सिंहा, [8]वृका 'व्हा.' ।
ऐसा [9]अन्वर्थनामा, असुर, खळमणी, तो पथीं [10]नारदास.
प्रेक्षी, वंदी, [11]प्रबद्धांजळि विनवि, जणों [12]तत्पदाधार दास. ॥ २

देवर्षीस म्हणे, "[13]स्वपादविनतस्वांतप्रमोदावहा!
तूतें या भुवनांत सर्व म्हणती, '[14]पापाटवीदाव हा.' ।

---

१. भस्मासुराची कथा निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळ्या प्रकारानें सांगितली आहे. त्यांतील एक कथा 'विनायकमाहात्म्या'वरील टीपांत आली आहे. (मोरोपंती स्फुट प्रकरणें भाग ३ रा, वि० मा० अ० १ गी० ५.) दुसरी कथा अशी आहे कीं भस्मासुराला 'ज्याच्या मस्तकावर हात ठेविशील तो भस्मरूप होईल' असा शंकरानें वर दिल्यावर, एक दिवस शिवदर्शनार्थ तो गेला असतां पार्वती त्याच्या नजरेस पडली. तिच्या सौंदर्यास भुलून, तिच्या प्राप्तीस्तव शंकराच्याच डोक्यावर हात ठेवून त्यास भस्म करण्यास तो कृतघ्न असुर सिद्ध झाला. तेव्हां विष्णूनें मोहिनीरूप धरून शिवाची त्या संकटांतून सुटका केली. प्रस्तुत प्रकरणांतील कथा या दोन्ही कथांहून भिन्न आहे. हीच कथा मोरोपंतांनीं मंत्रभागवतांत दशम स्कंधांत(गी०१०६९–१०८९)वर्णिली आहे.२.शंकर. ३. भव+मोक्ष=संसारापासून सुटका; जन्ममरणाचा अंत. ४.उत्तम. 'कीर्ति'चें विशेषण.५.सर्व भीति. **स्वागतावृत्त.** ६. देवांहून अन्य, दैत्य, दानव. ७. 'वृक' हें नांव. हा 'म्हणे' या क्रियापदाचा कर्ता. ८. लांडग्याला. अन्वयः—त्याची वृकाऽव्हा हिंस्रत्वें [व] निर्दयत्वें सिंहा [आणि] वृका म्हणे, "मद त्यजुनि, दूर व्हा." येथें 'सिंहा!'आणि 'वृका!' हीं दोन्हीं संबोधनें मानिलीं असतांही चालतील; हा **प्रतीपालंकार** आहे.९. यथार्थ आहे नांव ज्याचें असा, नांवाप्रमाणें करणी करणारा. १०. विनायकमा० अ० २ गी० १६ टीप पहा. ११. अंजलि जोडला आहे ज्यानें असा, हात जोडून. १२. त्याच्या पायाचा आश्रय ज्याला आहे असा सेवक. **स्रग्धरावृत्त.** या श्लोकाच्या शेवटच्या दोन चरणांत **विरोध** व **उत्प्रेक्षा** असे दोन अलंकार आहेत. १३. स्व+पाद+विनत+स्वान्त+प्रमोदावहा!=आपल्या चरणीं नम्र झालेल्याच्या मनास आनंद देणाऱ्या! स्वांत=अंतःकरण, मन. हें विशेषण हेतुगर्भ आहे म्हणून हा **परिकर** झाला. १४. पाप+अटवी+दाव=पापरूपी अरण्याचा वणवा, पापाचा शत्रु. हें **परंपरितरूपक** आहे.

सर्वज्ञा! हरितोसि संशय पळें, तो पाहिला[1] आजि तूं.
आम्ही वांछितसों, तुझ्या सुवचनें संदेहवृंदों[2] जितूं[3]. ॥ ३
देवर्षिप्रवरा[4]! असें पुसतसें कीं, विष्टपाचे[5] धणी
ब्रह्मेशाच्युत हे तिघे स्वभजकां देती सुखाची धणी[6]. ।
यांमध्यें परि आशुतोष[7] सुर तो कोण? प्रभो! हें तुमी
सांगा, जी! भवदंघ्रिला[8] समजलों कामातिचा[9] हेतु[10] मी.” ॥ ४
वृकासुर असें पुसे, नमुनि, जोडुनीयां शयां[11],
क्षणांत समजे मनीं सुरमुनी तदीयाशया[12]. ।
म्हणे मग तयासि तो, “शकुनिनंदना[13]! हा बरा
विचार पुसिला, तरी भज सुखार्थ आशांबरा[14]. ॥ ५
होतो तुष्ट महेश अल्पचि गुणें तत्काळ दासांवरी.
भक्तांला स्वकरें सुतासम शिवाजानि[15] स्वयें सांवरी. ।
कोपेही प्रभु हा तसाचि सहसा स्वल्पाहि दोषास्तव,
याच्या होय न कीर्तिचा तिळ सहस्रास्येंहि[16] शेषा स्तव. ॥ ६
बंदीच्यां[17] परि रावणें निशिचरें[18] केला पदाचा स्तव,
भोळा शंकर हा प्रसन्नचि तदा जाला तया यास्तव, ।

---

१. तो तूं [म्यां] आजि पाहिला. कर्मणि प्रयोग. २. संशयसमूहाला. ३. जिंकूं, दूर करूं. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** येथें तृतीय व चतुर्थ पादांत कारणकार्यभाव स्पष्ट असून, ‘कारण,’ ‘म्हणून’ असा शब्द योजिला नाहीं, म्हणून हा **काव्यलिंगालंकार** आहे. ४. हे देवर्षिश्रेष्ठा नारदा! ५. जग, विश्व. काव्येतिहाससंग्रहांत यावर ‘स्वर्ग’ अशी टीप आहे. परंतु विष्टप याचा आम्हीं दिल्याप्रमाणें अधिक विस्तृत अर्थ होतो. ‘त्रिष्वथो जगती लोको **विष्टपं** भुवनं जगत्।’ (अमरसार). ६. विपुलता. ७. तत्काळ संतुष्ट होणारा. आशु=लवकर. ८. तुमच्या चरणांला. ९. मनोरथसिद्धीचा. १०. कारण, साधन. ११. हातांना. १२. त्याचें मनोगत. १३. हे शकुनिपुत्रा वृका! श्लोक २ पहा. १४. आशा+अंबर!=दिग्+वस्त्र, दिशा आहे वस्त्र ज्याचें त्यास, दिगंबरास, शंकरास. **पृथ्वीवृत्त.** १५. शिवा (=पार्वती) आहे जाया ज्याची तो शिवाजानि [illegible]गस), शंकर. १६. हजार मुखांनीं. शेषाला हजार मुखें असूनही शिवकीर्तीचा [illegible]व त्याला होत नाहीं, इतकी शिवकीर्ति अगाध आहे. येथें कारण असूनही कार्यो[illegible]हीं, असें वर्णन आहे, म्हणून ही **विशेषोक्ति** झाली. **शार्दूलविक्रीडित** [illegible] भाटाप्रमाणें. १८. राक्षसानें. राक्षस रात्रीचे भटकतात, म्हणून त्यांस ‘निशिचर’ [illegible]िचर’ इत्यादि नांवें आहेत.

बाणें[1]ही, स्तवुनि, प्रहृष्ट करुनी, मागीतला हा वर,
'स्वामिन्! मत्पुर रक्ष, हेंच मज दे, हो सिद्ध, पाहा वर.' ॥ ७

बाणाचें पुर रक्षिलें पुरहरें[2], विश्वेश्वरें, श्रीहरें,
केलें तें वरदानवाक्यहि खरें त्या चंद्रमःशेखरें[3], ।
तो दिक्तुंडहि पुंड खंडपरशुंस्थानाचलोत्पाटनीं[4]
झाला सज्ज, परंतु देव निजला होता क्षमापाटनीं[5]. ॥ ८

भक्ताला अतितूर्ण शंकर सुधापूर्णेक्षणें[6] पाहतो,
तद्वांच्छावर द्यावया, वरद[7] तो त्याच्या पुढें राहतो, ।
त्याचा भार समस्तही स्मरहर[8] स्वामी स्वयें वाहतो,
त्यापासूनि[9] सुसंकटें घडति जीं, त्यांला सुखें साहतो. ॥ ९

---

१. बाणासुर हा बळीचा मुलगा व कृष्णाचा नातू जो अनिरुद्ध त्याचा सासरा. यानें शिवास प्रसन्न केलें व जसा 'तूं माझें द्वारपालत्व स्वीकार' म्हणून बळीनें विष्णूजवळ वर मागितला, तसा बाणानें 'तूं माझें पुररक्षण कर' असा वर शिवाजवळ मागितला. २. तारकासुराच्या वधानंतर त्याच्या तीन मुलांनीं तपश्चरणानें शिवास व ब्रह्मदेवास प्रसन्न केलें आणि अंतरिक्षगामी तीन पुरें मिळविलीं. नंतर त्यांनीं देवमानवांस अगदीं त्रासवून सोडिलें. तेव्हां देवांच्या प्रार्थनेवरून शंकरानें पृथ्वीचा रथ केला व मेरु, शेष आणि विष्णू यांची अनुक्रमें धनुष्य, ज्या व शर यांच्या ठिकाणीं योजना केली व पाशुपतास्त्राची स्थापना करून विष्णुबाण सोडिला व त्रिपुरांचा नाश केला. म्हणून शंकरास 'पुरहर' 'त्रिपुरांतक' इत्यादि नांवें पडलीं. येथें **विरोधाभास** असून, 'पुरहर' 'विश्वेश्वर' इ० विशेषणें साभिप्राय असल्यामुळें **परिकर**ही आहे. ३. चंद्र आहे कपाळावर ज्याच्या त्यानें, शंकरानें. हालाहल विष शंकरानें प्राशन केल्यावर, दाहशमनार्थ जे पदार्थ अंगावर धारण केले, त्यांत चंद्र हा एक होता. शंकरानें चंद्र भालप्रदेशीं धारण केला म्हणून त्यास भालचंद्रही म्हणतात. ४. खंडपरशु+स्थान+अचल+उत्पाटनीं=शंकर+निवास+पर्वत+उचलण्यांत=शिवाचा कैलासपर्वत हालविण्याच्या कामांत. खंडपरशु=शंकर. 'भूतेशः **खंडपरशु**र्गिरीशो गिरिशो मृडः ।' (अमरसार). दिक्तुंड=दिक्+तुंड=दशमुख, रावण. दिक् (=दिशा) हा शब्द संस्कृतांत दशसंख्यादर्शक योजिला जातो. ५. क्षमानगरांत. येथें 'शिव रागवला नाहीं' ही गोष्ट वळसा घेऊन सांगितली आहे, म्हणून हें **पर्यायोक्त** झालें. ६. अमृतपूर्ण नयनानें, शांत व प्रेमळ दृष्टीनें. ७. वर देणारा शिव. येथें **काव्यलिंग** आहे. ८. मदनांतक. स्मर=मदन. हिमाचलावर शिवध्यानस्थ असतांना, शिवपार्वतींचें ऐक्य व्हावें या हेतूनें देवांनीं शंकराला कामविव्हल करण्याकरितां मदनाला धाडिलें. तेव्हां समाधिभंगानें क्रोधयुक्त होऊन, शिवानें तृतीय नेत्र उघडून मदनाकडे पाहिलें. त्या डोळ्याच्या तेजानें मदन तत्क्षणीं जळून खाक झाला. तेव्हांपासून 'स्मरहर' 'मदनांतक' 'कामरिपु' इ० नांवें शंकरास पडलीं. ९. भक्तांना वर देऊन, ते पुरे करण्यांत कितीही संकटें आलीं, तरी तो भक्तवत्सल प्रभु संतोषानें सहन करितो. शिवाचे गुण व भोळा

त्या शाकुनेया[1]! विभुला भजावें, घडेल हो सत्वर लाभ, जावें.' ।
सांगोनि ऐसें हित त्या वृकास, गेला स्वयें नारद सावकास. ॥ १०[2]

केदारीं[3] जाउनीयां मग असुर वृक स्वांगमासासि होमी[4];
भेटेना देव तेव्हां, 'निज शिरहि' म्हणे, 'छेदितों आज हो! मी' ।
खंडाया मस्तकातें, स्वधितिस[5] दिवसीं सातव्या वे करानें,
कुंडापासूनि तेव्हां प्रकटुनि, सहसा वारिला[6] शंकरानें. ॥ ११

ज्या काळीं करुणाब्धिधूर्जटिकरस्पर्शामृता[7] लाभला,
तेव्हां तो परिपूर्णदेह पहिल्याहूनीहि जाला भला, ।
होता केवळ अस्थिशेष[8], हवनीं कापूनि घेतां पळा[9],
तो केला क्षतहीनकाय[10] वरदें, लागों न देतां पळा[11]. ॥ १२

मूर्धच्छेदनसाहसांतुनि[12] बळें बाहेर तो काढिला,
मांसाच्या परिकर्तनें[13] करुनियां होताचि जो का ढिला[14], ।
श्रीकंठ[15], त्रिजगच्छरण्य[16], वरद, प्रीतिप्रसन्नेक्षण,
श्रीमच्छंकर हें वदे, करुनियां तत्प्राणसंरक्षण. ॥ १३

'होतों मी वरद प्रसन्न सदयस्वांत[17] प्रपन्नावरी[18],
देतों शीघ्र वरासि धांवुनि सुखें, जो ज्याचि कामा[19] वरी, ।

---

स्वभाव पंतांनीं अनेक ठिकाणीं वर्णिले आहेत. ''तुज 'भोळानाथ' असें म्हणती; कीं मुक्त करिसि अमितांतें । जें शत अपराधाचें, घालिशि पोटांत, पाय नमितां तें ॥ न पहासि आशुतोषा! दोषा दोषाकरा वहाशि शिरीं । तव लीला सर्व जना, जेंवि रविद्युति सुखावहा शिशिरीं॥'' (विश्वेशस्तुति. तसेंच 'शंकरस्तव' व 'केकावलींतील ६८,६९ व ७० या केका यासंबंधें वाचणें इष्ट आहे.

१. शकुनिपुत्रा! २. **उपजातिवृत्त.** ३. बद्रिकेदारीं. हें स्थान हिमालयावर आहे ४. अग्निकुंडांत शिवाला आहुति म्हणून टाकी. ५. कुऱ्हाडीला. 'द्वयोः कुठारः स्वधिति परशुश्च परश्वधः ।' अमरसार. ६. शिरच्छेदापासून त्याचें निवारण केलें. **स्रग्धरावृत्त** ७. दयाघन जो धूर्जटी (=शंकर) त्याच्या हस्तस्पर्शरूप अमृताला. ८. अस्थि (=हाडें) आहेत शेष ज्याचा असा; नुसता हाडांचा सांपळा. ९. मांसाला. १०. क्षत+हीन+काय=क्षतरहित देह; ज्याच्या देहावरील जखमा नाहींशा झाल्या आहेत असा. ११. क्षणा. **शार्दूलविक्रीडित वृत्त.** १२. शिरच्छेदाच्या भयंकर कर्मांतून. १३. छेदानें, कापण्यानें. १४. निःशक्त. १५. शंकर. १६. जगत्रयाचा आधार. येथील सर्व विशेषणें हेतुगर्भ आहेत, म्हणून येथें **परिकर** असून, शिवाय **समुच्चय**ही आहे. १७. दयालु आहे अंतःकरण ज्याचें असा. १८. शरणागतावर १९. इच्छेस वरी(=धरी, घेई). या अर्थांत **काव्यलिंग** आहे.

मांस च्छेदुनि होमिलें शिखिमुखीं[1], हें काय भक्ता वरें ?
आत्मा व्यर्थचि पीडिला, मजहि तां[2] केलें बहू बावरें[3]. ॥ १४
सकृन्नामोच्चारेंकरुनि[4], अथवा केवळ जळें,
फळें, पत्रें, पुष्पें, स्तवननमनें, कीं स्मृतिबळें, ।
भवांभोधीमध्यें मदुपनत[5] तो भाविक[6] तरे;
किती घेती भावें मज विगतलोभा[7] विकत रे[8] ! ॥ १५
जो कांहीं असुलभ होय यांहिमागें[9], आतांही, पुढतिहि, तूं तयाहि[10] मागें[11]. ।
हें माझें वचन मनांत मान साचें; सांगावें 'अभिमत[12] जें स्वमानसाचें[13].' ॥ १६
श्रवण करुनि ऐसें वाक्य, तो पंकराशी[14]
असुर वृक म्हणे त्या दुर्लभा शंकराशी, ।
'स्वकर शिरिं जयाच्या मीचि ठेवीन लोकीं,
लव उशिर न होतां, तो मरावा त्रिलोकीं.' ॥ १७
लोकक्षयावह[15], भयावह, त्या खळानें
मागीतला वर असाचि विशृंखळानें[16]; ।
हांसोनियां, शिव 'तथास्तु' असें वदे तो,
जाणों सुधा विषधराप्रति[17] देव[18] देतो ! ॥ १८
पीती यथेष्ट अमृतासि, तथापि नाकी[19],
जाले भयार्त विमनाचि[20], तथा पिनाकी[21]. ।

---

१. अग्निमुखांत. २. त्वां. 'त्वां'च्या ऐवजीं 'तां' पंतांनीं अनेक वेळां योजिला आहे. 'जिणें गरळ पाजिलें, अमृत पाजिलें तीस तां' (केकावली, ९१). ३. येथें वृकासुरानें आपला आत्मा पीडिला, पण शंकर झाला घावरा, म्हणून ही **असंगति** होय. ४. एकदांच नामाचा उच्चार करून. ५. माझ्याजवळ नम्र झालेला. ६. एकनिष्ठ भक्त. ७. निर्लोभ, लोभरहित. येथें **परिवृत्ति** आहे. ८. **शिखरिणीवृत्त.** सुदामचरितांतही पंतांनीं भक्तिमाहात्म्य असेंच वर्णिलें आहे. 'तिळभरि जरि भक्तें अर्पिलें वस्तु कांहीं। बहुतचि मज होतें प्रेमभावेंचि पाहीं ॥ बहुतहि दिधलें कीं भक्तिहीनें मला जें । अणुचि गमतसें तें चित्त तोषे न माजें ॥ पत्रपुष्प फल तोयहि जो कीं । भक्तिनेंच्चि मज दे जन लोकीं ॥ तें स्वभक्त्युपहृताखिल सेवीं । मी, सुनृतहि सुधारस जेवीं ॥ ( स्फुट काव्यें भाग २ रा ). ९. याच्या पूर्वींही. १०. त्या वराला. ११. माग. १२. इष्ट, आवडतें. १३. **प्रहर्षिणीवृत्त.** १४. पापराशि. **मालिनीवृत्त.** १५. लोकक्षयकारक. १६. उन्मत्तानें. १७. सर्पाला. येथें **उपेक्षा** व **निदर्शना** यांचा संकर आहे. १८. **वसंततिलकावृत्त.** १९. देव. अमृत पिणारे देव अजरामर होत. परंतु तेही भ्याले. येथें **विभावना** आहे. २०. दुःखी, कष्टी. २१. शिव.

हर्षे [१]सुदुर्मति वृकासुर [२]कामलाभें,
'नाहीं' म्हणे, 'सुरमृगै[३]कवृका मला [४]भें.' ॥ १९
ऐसा तो पापरूपी, [५]वृक, असुर, बरें वंचुनी लोकराया,
योजी तत्काळ चित्तीं [६]समधिगतवराची परीक्षा कराया, ।
केला संकल्प लो[७]कत्रयसुभग [८]शिवारत्न त्याचें हराया,
धांवे ठेवावया तो स्वकर शिरिं, तदा भीति जाली हरा [९]यां. ॥ २०
जाळावा जरि लोच[१०]नानळकणें, दुष्कीर्ति भक्तक्षयें.
दे[११]यादेय नसे [१२]वदान्यगुरुला श्रीशंभुला निश्चयें. ।
दासापासुनियां [१३]पराभव बरा, मानूनि ऐसें, स्वयें
तो [१४]मृत्युंजय [१५]मन्मथांतक पळे जाणों तयाच्या भयें. ॥ २१
न सावरति सर्वथा [१६]दशभुजांहि देवा जटा;
[१७]वृषासहित राहिल्या चरण पादुका [१८]वाजटा; ।
[१९]शिरःस्रजहि धावतां त्वरित भंगें[२०] पांवे, गळे;
गळोनि पडले फणी पथिं [२१]भुजंगपावेगळे. ॥ २२

---

१. अत्यंत दुष्ट बुद्धि ज्याची असा. २. इच्छापूर्तीनें, इष्टसिद्धीनें. ३. देवरूप मृगांच्या (=मृगांस मारणाऱ्या) अद्वितीय लांडग्याला. हें **परंपरित रूपक** आहे. ४. भीति. ५. वृकासुरास हा व[र] प्राप्त झाल्यावर त्याला भस्मासुर हें नांव पडलें. ६. प्राप्त झालेल्या वराची. येथें **यतिभंग** दो[ष] आहे. ७. त्रैलोक्यांतही सुंदर, अप्रतिम सुंदर. ८. पार्वती हेंच रत्न. ९. **स्रग्धरावृत्त** १०. [तृतीय]नेत्रांतील अग्नीच्या ठिणगीनें. येथें 'कण' शब्द योजून, लोचनानळाचें अ[ङ्कुर] प्रखरत्व दाखविलें आहे. ११. देण्यासारखें आणि न देण्यासारखें. १२. उदारश्रेष्ठाला. विष्णूचें वर्ण[न] करितांना केकावलींत हेच शब्द योजिले आहेत:—'वदान्यजनसद्गुरो!' येथें 'वदान्यगुरुत्व' व 'देया[-] देय नसणें' यांत कारणकार्यभाव आहे, म्हणून हा **काव्यलिंगालंकार.** १३. अनिष्ट गोष्टह[ी] बरी म्हणून पत्करिली आहे, तेव्हां ही **अनुज्ञा** होय. ह्याचें लक्षण:—दोषस्यैवार्थनानुज्ञा तत्रैव गुणदर्शनात्। मम दारिद्र्यमेवास्तु याचको यत्र बाधते. १४. मृत्यूस जिंकणारा, शंकर. परमशि[-] वभक्त मार्कंडेय ऋषीला अकाल मृत्यूपासून मुक्त करण्यासाठीं, शिवानें त्रिशूलाचा प्रहार यमावर केला व त्यास जिंकिलें. त्यावरून त्यास प्रस्तुतचें नांव पडलें. १५. श्लोक ९ पहा. येथें शंकराची दोन्हीं विशेषणें हेतुगर्भ आहेत म्हणून **परिकर** झाला, आणि संभावनादर्शक 'जाणों' शब्द **उत्प्रेक्षा** दाखवितो. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** १६. दहा हातांनीं. 'दशभुजाहि देवा' अस[ा] पाठ घेतला, तर 'दहा हात ज्याला आहेत अशाहि देवाला'.—असा अर्थ होईल. येथें **विशे[-] षोक्ति** आहे; कारण साधनसामग्री असूनही कार्याची अनुत्पत्ति वर्णिली आहे. १७. नंदीसहित. १८. चटचट वाजणाऱ्या. १९. डोक्यावरील माळ. २०. तुटे. २१. [अंगावर] भुजंग पाळणाऱ्यापासून निराळे, शंकरापासून वियुक्त होऊन, **पृथ्वीवृत्त.**

गळाल्या गळांतूनि रुद्राक्षमाला, नसे निर्भयस्थान रुद्रा[1] क्षेमाला[2]. ।
पळे विष्टपीं[3] ऊघडा नागवा, जी! । पैदालाचि[4] मानी प्रभू नागवाजी! २३
काष्ठांचे नाथ[5] सारे निरखुनि म्हणती, "हृत्तमाच्या अहर्पा[6]!
बोलावें काय आम्हीं? अजि अमृत कसें पाजितां दुष्ट सर्पा?[7] ।
ज्यांतें देतां[8] वरांतें, खळमति धरिती ते महापाप दर्पा[9],
त्याचें कांहींच नाहीं स्मरण, अणि पुन्हां दुर्जनालाचि तर्पा[10]. ॥ २४
नाहीं दुष्कीर्ति कांहीं, अलिकदृगनळें[11] जाळितां दैत्यटोळा[12],
केला[14] कीं[13] या खळानें सुविमळमहिमा सर्वही आज गोळा[14]. ।
ध्यानावांचूनि कीं हो न उघडि ईलुसा[15] कामदाहोग्र[16] डोळा;
या औदार्यें सुरांचें घर[17] बुडवितसे[17] हा महाराज भोळा. ॥ २५
याणें देऊनि पूर्वी प्रवरवर[18], जनीं तर्पिला पंक्तितुंड[19],
तो अंतीं श्रीमदानें[20] निशिचर कुमती माजला फार पुंड. ।
कैलासाच्याचि जाला स्वभुजबळमदें[21] सिद्ध उन्मूळनाला[22],
घाली हस्तासि[23] जैसा समद[24] गजपती पद्मिनीमूळनाला[25]. ॥ २६

---

१. शंकराला. २. समर्थाला. ३. विश्वांत. मागें श्लोक ४ पहा. ४. त्या ईश्वरानें आपल्या पायांनाच हत्तिघोडे मानिलें; पायांचेच हत्तिघोडे केले; येथें **विषमालंकार** आहे. श्लोक २२ व २३ हे **स्वभावोक्ती**चीं सुंदर उदाहरणें आहेत. **भुजंगप्रयातवृत्त.** ५. दिशांचे पति, अष्ट दिक्पाल. ६. हृदयांतील अज्ञानमोहरूप अंधकाराच्या (=अंधकाराचा नाश करणाऱ्या) सूर्या! अहर्पा!=अहर्+पा!=दिन+ईशा!=सूर्या! ७. ही **निदर्शना** आहे. ८. 'देवा' असा काव्येतिहाससंग्रहाचा पाठ आहे. परंतु तो असाधु दिसतो. ९. गर्वाला, उन्मत्ततेला. १०. संतुष्ट करितां, वर देतां. **स्रग्धरावृत्त.** ११. भालनेत्रांतील अग्नीनें. अलिक=कपाळ. १२. दैत्यरूप टोळाला. हें **निरंगरूपक.** १३. कारण. १४. गोळा केला=गुंडाळला, नाहींसा केला. ही **लोकोक्ति** आहे. या दोन पादांत **हेतु** नांवाचा अलंकार आहे. याचें लक्षण:— कार्येण साकं हेतोश्चेद्वर्णनं हेतुरुच्यते । १५. एवढासा, किंचित्. १६. मदनदाहांत उग्र, मदनाला जाळण्याइतका प्रखर. १७. घर बुडविणें=नाश करणें. ही **लोकोक्ति** आहे. येथें औदार्यानें घर बुडतें, म्हणजे इष्ट कारणापासून अनिष्ट कार्याची उत्पत्ति होते असें वर्णन आहे, म्हणून हें एक प्रकारचें **विषम** होय. लक्षण:—इष्टार्थोद्यमतोऽनिष्टप्राप्तिश्च विषमं मतम् ॥ १८. उत्तम वर. १९. दशमुख, रावण. पंक्ति=दश, दहा. २०. लक्ष्मीपासून उत्पन्न झालेल्या मस्तीनें. २१. आपल्या बाहुबळाच्या गर्वानें. काव्येतिहाससंग्रहाचा 'स्वभुज**मळ**मदें' असा पाठ आहे, पण तो अपपाठ दिसतो. २२. उपटण्याला (मागें श्लोक ८ पहा). २३. सोंडेला. २४. माजलेला हत्ती. २५. कमलाच्या आधारभूत देंठाला. येथें **वाक्योपमा** आहे.

हा तैसाचि स्वपादस्तवरतनमनें[१] थैयैतत्थेय[२] नाचे.
जाला **बा**णासुराही वरद, पुरविलें इष्ट त्याच्या मनाचें. ।
पाळावें लागलें तत्पुर, मग सुटला स्वीय[३] **कै**लासवास.
सांगावें स्पष्ट कोणीं हित अहित असे या जगद्वासवास[४] ?" ॥ २७

असें देव स्वांतीं[५] वदति, मनिं कोपेंचि[६] जळती[६],
जयीं भोळेनाथ **त्रि**नयन महाराज पळती[७], ।
सुचेना ती युक्ति, द्रुत[८] हरिल जी संकट; पती[९]
दिशांचे[९] ते तूष्णी[१०] सभयदय[११] साशंक[१२] टपती[१३]. ॥ २८

निर्भीकस्थानकामें[१४] **पु**रहर[१५] भुवनें हिंडला सर्व, आशा
नाहीं संपूर्ण झाली, म्हणउनि निरखी घाबरा सर्व आशा[१६]. ।
**श्वे**तद्वीपासि गेला मग **नि**गमनुत[१७] **त्र्य**क्ष[१८] तो, भागला जो.
भक्तापासूनि जाला परिभव, म्हणुनी कां महाभाग[१९] लाजो ? ॥ २९

आला धांवत तूर्ण[२०] तेथहि महा उत्पातकारी[२१] **वृ**क,
जैसा वारणमारणस्पृह[२२] हरी, किंवा मृगारी[२३] वृकें[२३]. ।
तों वेगें बटुवेश **शे**षशयन **श्री**कांत ये आडवा,
जो[२४] दुष्टां **यम**, सज्जनांस **द**सरा, **दी**पावळी, **पा**डवा. ॥ ३०

---

१. आपल्या (=शिवाच्या) पायाचें जें स्तवन त्यांत गढलेल्या भक्तानें केलेल्या नमनानें. काव्येतिहाससंग्रहांतील 'स्वपादस्तवनतनमनें' हा पाठ घेतल्यास 'आपल्या पायाचें स्तवन व नताचें (=भक्तानें केलेलें) नमन यांनीं.' असा अर्थ होईल. २. थैथै. हा अनुकरणवाचक शब्द आहे. ३. आपला. ४. जगत्+वासवास=जगदिंद्रास, विश्वेश्वरास. काव्येतिहाससंग्रहाचा 'जगद्वास खास' असा पाठ आहे. परंतु अर्थ व यमक या दोहोंवरून, तो अपपाठ असावा, असें स्पष्ट दिसतें. ५. मनांत. ६. कोपानें कढती, रागानें चरफडती. ७. येथें **विरोधाभास** आहे. ८. लवकर. ९. दिशांचे पति=दिक्पाल. १०. स्वस्थ, निमूट. ११. भय वाटून, व शिवाविषयीं मनांत कींव येऊन. १२. संशययुक्त. १३. लक्ष्य लावून [काय होतें तें] पहात बसले. **शिखरिणीवृत्त.** १४. निर्भीक+स्थान+कामें=निर्भय+स्थल+इच्छेनें. १५. मागें श्लोक ८ पहा. १६. दिशा. १७. वेदस्तुत. १८. त्रिनयन, शिव. १९. श्रेष्ठजन. भाग=भाग्य. **स्रग्धरावृत्त.** २०. लवकर. २१. अनर्थ करणारा. २२. वारणाच्या (=हत्तीच्या) मारणाची स्पृहा (=इच्छा) आहे ज्याला असा, हत्तीला मारूं इच्छिणारा. २३. मागें श्लोक १९ वरील टीप पहा. २४. जो दुष्टांना मृत्यू देतो व सज्जनांस महोत्सव देतो. या पादांत **उल्लेखालंकार** आहे. लक्षण:—अनेकधोल्लेखनं तु विषयैर्वा ग्रहीतृभिः । एकस्य वस्तुनोऽनेकैरुल्लेखालंकृतिर्मता ॥ म्हणजे एकाच वस्तूचा अनेक प्रकारें उल्लेख केला असेल, किंवा निरनिराळ्या प्रेक्षकांस ती वस्तू निर-

अजिन[1]दंडकमंडलुमेखळाकुशधर द्विजबाळ गमे खळा. ।
पेथिं[2] तयाशि करूनि 'नमो' हरी मधुरवाक्पटु तो, मन मोहरी. ॥ ३१

"बैसावें शाकुनेया[3]! क्षणभरि, परमश्रांत जालासि, वाटे.
कां जालें दूर येणें? बहुत लगबगां चालिलां फार वाटे. ।
आत्मा सर्वार्थ दाता सकळबुधमतें पूरुषाला निकाम[4],
साधावें सर्व कांहीं, अनुदिन[5] चतुरें यासि रक्षूनि, काम[6]. ॥ ३२

आलां अत्यंत दूर, श्रमउनि तनुला ज्या स्वकार्यानिमित्त,
सांगावें, हो! विभो! तें, श्रवाणें[7] जरि मला योग्य मानील चित्त. ।
प्रायः स्वार्थाप्तिसाठीं[8] वरिति निपुण[9] ते लोक आशा सहाया[10].
बाळाच्या भाषणातें, नयपथनिपुणा[11]! प्रार्थितों मी, सहा या." ॥ ३३

हरा[12]ही वंचाया बहुगति जया पाठ कवि तो
असाही जो कीं, त्या प्रभु कपटिभूपा ठकवितो. ।
हरीनें युक्तीनें पथि शकुनिचा पाक[13] वळिला[14].
महापाशा[15] विस्तारुनि कपटरूपी[15], कवळिला[16]. ॥ ३४

---

निराळी भासली असें वर्णन असेल, तर उल्लेखालंकार होतो. उदाहरणें:—"वाणीस तो गुरु, रिपुप्रति उग्र रुद्र, । अर्थीस देवतरु, चक्षुंस चंद्र भद्र, ॥ रूपीं मनोज धृतदेह, घनाभ कृष्ण, । प्रेमें जयास भजतात मुनी वितृष्ण. ॥" "तो शत्रुजनां गमला काल अदय, कामिनीगणां काम, । नृपति प्रजेस, अर्थिस कल्पतरू निखिल पुरविता काम. ॥" **शार्दूलविक्रीडित**वृत्त.

१. अजिन=मृगचर्म. मेखळा=कटिसूत्र. २. अन्वयः—तो मधुरवाक्पटु (=गोड बोलण्यांत पटाईत) हरी पथिं तयाशि (=भस्मासुरास) 'नमो' करून (=नमोनमः म्हणून, नमस्कार करून) मन मोहरी (=आकर्षी, हरण करी). **द्रुतविलंबित**वृत्त. ३. शकुनिनंदना! वृका! ४. अत्यंत. ५. प्रतिदिवस, नेहमीं. ६. कार्य, इच्छा. हें श्लोकार्थ उत्तम **सुभाषित** आहे. 'शरीरमाद्यं खलु सर्वसाधनम्' हें संस्कृत वचन याशीं समानार्थक आहे. **शार्दूलविक्रीडित**वृत्त. **अर्थान्तरन्यासालंकार.** ७. जर तें ऐकण्यास मी योग्य आहें असें तुमच्या मनाला वाटत असेल तर. ८. आपला इष्ट हेतू साधण्याकरितां. ९. व्यवहारचतुर, सुज्ञ. १०. संगसोबरे व इष्टमित्र यांना. हा चरण सुंदर **सुभाषित** असून, येथें **अर्थान्तरन्यास** आहे. ११. नीतिमार्गचतुरा! हे नीतिमंता! १२. जो तो (=वृक) असाही कवि (=शाहणा, हुशार), कीं जया [वृकाला] हराही (=शिवालासुद्धां) वंचाया (=फसविण्या) बहु गति पाठ (=अनेक युक्ती पूर्ण अवगत होत्या), त्या कपटिभूपा (=वंचकश्रेष्ठाला, अत्यंत कपट्याला, वृकाला) प्रभु ठकवितो (=फसवितो). १३. मुलगा. पोतः **पाको**ऽर्भको डिंभः पृथुकः शावकः शिशुः । (अमरसार). १४. फिरविला, त्याची बुद्धि वळविली. काव्येतिहाससंग्रहांत येथें 'अडिविला' अशी टीप आहे. १५. मायावी व लाघवी शब्दांनीं मोहाचें जाळें पसरून. १६. पकडला, गोंवला, अडकविला. **शिखरिणी**वृत्त.

पीयूषवर्षिवचनें[1] परिसोनि कानें, होऊनियां श्रमविवर्जित,[2] त्या वृकानें ।
सांगीतलें सकळ वृत्त बटुप्रती तें, जो ओपिला वर हरें भुवनप्रतीतें.[3] ३५
सारें ऐकोनि वृत्त, स्मित करुनि, म्हणे, "दक्षशापें[4] पिसाची
झाला, वाचा तयाची निजमनिं गणितां काय अद्यापि सांची[5]? ।
राहे प्रेतीं, पिशाचीं; गतविभव वसे नित्य नग्न स्मशानीं.
त्याचा विश्वास कैसा तुम्हि दृढ धरिला शाहण्यांनीं अशांनीं[6]? ॥ ३६
आहे विश्वगुरुत्रिनेत्रवचनीं विश्वास तूजा जरी,
ठेवावा स्वशिरीं तरी कर; परीक्षा हे करीं साजरी. ।
होतां वाक्य मृषा,[7] वृषासन[8] रणीं त्वां दानवेंद्रें[9] तदा
जिंकावा; भंजकप्रतारक[10] पुढें बोले न मिथ्या कदा." ॥ ३७
ऐसे भ्रामक[11] रम्य बोल बटुचे तद्योगमायाबळें[12]
हातोंहातचि[13] बुद्धिला भ्रमविती त्या दानवाच्या पळें. ।
मोहे, मानुनि तें खरें, सुरगुरुद्रोही[14] महापातकी,
ठेवी हस्त शिरींच, होय कुमती तो आपुला घातकी. ॥ ३८
हस्तस्पर्शविभिन्नमस्तकहि[15] तो दे[16] भीति लोका; पवि-[17]
च्छिन्नप्रोच्चनगासमान पडतां, सारी धरा[18] कांपवी. ।
आनंदें सुर पुष्पवृष्टि करिती श्रीजानिच्या[19] मस्तकीं,
गाती, नाचति, वर्णिती यश, पदें वंदूनियां हस्तकीं. ॥ ३९

---

१. अमृताचा वर्षाव करणारे शब्द, अत्यंत गोड व मोहक शब्द. २. श्रमवियुक्त. ३. विश्ववंद्यें. प्रतीत=पूज्य, वंद्य. **वसंततिलक**वृत्त. ४. दक्षानें दिलेल्या शापानें वेडाच झालेला. दक्ष हा ब्रह्मपुत्र सतीचा पिता व शिवाचा सासरा होय. एकदा तो शिवाकडे आला असतां, शिवानें उठून त्याला नमन केलें नाहीं. तेव्हां त्याला दक्षानें रागावून शाप दिला. पुढें एकदा दक्षानें एक यज्ञ केला असतां शिवास आमंत्रण दिलें नाहीं. परंतु सती आमंत्रण नसतांही आली, व दक्षमुखानें शिवाची निंदा ऐकून तिनें रागानें अग्निकुंडांत उडी घेतली. हें ऐकतांच शिव क्रोधसंतप्त झाला व आपल्या जटेंतून भैरव उत्पन्न करून, त्याच्या हातून शिवानें दक्षयज्ञनाश व दक्षशिरश्छेद करविला. ५. खरी. ६. येथें **व्याजस्तुति** व **समुच्चय** असे दोन अलंकार आहेत. **स्रग्धरा**वृत्त. ७. खोटें. ८. वृषभवाहन, शिव. ९. दानवराजानें. १०. [मग] भजकप्रतारक (=भक्तवंचक, दासांस फसविणारा) [शिव] पुढें कदा [ही] मिथ्या न बोले. **शार्दूलविक्रीडित**वृत्त. ११. भ्रम उत्पन्न करणारे. १२. त्याच्या (=विष्णूच्या) योगशक्तीच्या जादूनें. १३. बोलबोलतां, देखतांदेखत. १४. देव व वडिल आणि पूज्य जन यांचा शत्रू. १५. [स्वतःच्या] हस्तस्पर्शानें चिरलें आहे मस्तक ज्याचें असा. १६. येथें **विभावना** आहे. १७. वज्रानें फुटलेल्या उंच पर्वताप्रमाणें. १८. प्राणिमात्रास धरते ती, पृथ्वी. १९. विष्णूच्या. ६ व्या श्लोकांतील 'शिवाजानी' शब्द पहा.

ऐसें संकट वारिलें, मग हरी गेला महेशाकडे.
हें बोले, “जन जे विभो! वि[1]चरती पूज्यापुढें वांकडे, ।
ते होती नि[2]जभद्रजीवनयशस्नेहक्षयीं कांकडे.
सर्वज्ञ प्रभुजी! तुम्ही हैं[3]गिरडे घेतां असे कां कैं[4]डे?” ॥ ४०

**उपसंहार.**

महेशाचें देवें त्वरित हरिलें संकट बटु-
स्वरूपें, हे लीला मधुर; अमृताचा रस कटू[5]. ।
र[6]सन्यूनाधिक्यग्रहणविषयीं जे जन पटू,
पिती श्रोत्रा[7]स्यें ते हरिजन सुखेला घटुघटू[8]. ॥ ४१

श्रीशानें संकटातें हरुनि सकरुणें, मुक्त केला गिरित्र[9];
संसा[10]राराति भीतिप्रति परिहरितें हें हरीचें चरित्र. ।
गातां आकर्णितांही भवभय शमवी, यास्तव स्वा[11]दरानें
भा[12]वार्थे गाइलें, हो! स[13]दुदितरत जो, त्या म[14]यूरेश्वरानें. ॥ ४२

---

## १० दत्तदयोदय.

(गीतिवृत्त.)

दत्तात्रेयस्वामी! नमितों मी, दीनबांधवा! देवा! ।
तुमचें स्तवन कराया किति माझ्या मंदबुद्धिचा केवा[15]? ॥ १
तूं या संसारवनीं भ्रांतां जीवांसि लाविसी वाटे[16], ।
दुःखित दीन पहातां, करुणासिंधो! तुझा गळा दाटे. ॥ २
त्वां तारिले असंख्य प्राणी संसारसागरीं, दत्ता! ।
लोकत्रयांत नांदे, देवा! अ[17]व्याहता तुझी सत्ता. ॥ ३

---

१. वागतात. २. आपलें हित, जीवित आणि यश हेंच स्नेह (=तैल) त्याचा नाश करण्यांत. **परंपरितरूपक.** ३. मलयुक्त, पापमय. ४. कडेवर. येथें द्वितीय व तृतीय चरण **सुभाषित**रूप आहेत. येथें सामान्य गोष्ट सांगून, प्रस्तुत विशिष्ट गोष्ट सुचविली आहे, म्हणून ही **अप्रस्तुतप्रशंसा.** ५. कडू. **प्रतीपालंकार.** ६. रसाचें न्यून व आधिक्य (कमी-अधिकपणा) जाणण्यांत जे पटु(=हुशार, कुशल); जे खरे रसज्ञ. ७. कर्णरूप मुखानें. **रूपक.** ८. घटाघट. अनुकरणवाचक शब्द. **शिखरिणी**वृत्त. ९. शिव. १०. संसाररूप अरातीची (=शत्रूपासून होणारी) भीति, तिला. ११. सु (=चांगल्या, मोठ्या) आदरानें. १२. अत्यंत भाविकपणानें. १३. संतांच्या वचनांत रमलेला. १४. मोरोपंत कवीनें. **स्रग्धरा**वृत्त. १५. शक्ति, आहार. १६. वाटेला. १७. अगदीं मोकळी, अप्रतिहत, अनियंत्रित.

तूं तीर्थांचें तीर्थ, [1]ज्ञान्यांचें ज्ञान, योग योग्यांचा; ।
धार्मिक, सदय, [2]चिकित्सक [3]दुःसहसंसाररोगरोग्यांचा. ॥ ४
जे जे लोकीं [4]पुत्री, त्यांमध्यें धन्य तव पिता [5]अत्री; ।
कीं त्वां नित्य [6]उभविली ब्रह्मांडशिरीं [7]स्वकीर्तिसुच्छत्री. ॥ ५
[8]अनसूयेचा [9]कुक्षि क्षीरधिहुनि कोटिगुण गुणें [10]महित, ।
कीं [11]तज्ज [12]अमृतकर तूं [13]जाड्यकलंकक्षयादिकीं [14]रहित. ॥ ६
जें अनसूया पावे सुख, विधिची शंभुचीहि न [15]वधू तें, ।
[16]जननीजनकसुहृन्मन हर्षविलें बा! तुवांचि [17]अवधूतें. ॥ ७
एक गुणग्राहक तूं, [18]सारग्राही दुजा नसेचि कवी, ।
[19]अगनगखगादिकां गुरु कोण म्हणे? स्वहित कोण हें शिकवी? ॥ ८

---

१. गीतेंत श्रीकृष्णांनीं असेंच ह्मटलें आहेः—"आद्यंत तत्त्व सृष्टीचा तेव्हां मध्यहि मीच कीं । अध्यात्मविद्या विद्यांत, तत्त्ववेत्त्यांत तत्त्व मी. ॥" (वा० पं० समश्लोकी. अ० १० श्लो० ३२). २. वैद्य. ३. संसाररूप असह्य रोगानें पीडिलेल्या रोग्यांचा. येथें **परंपरितरूपक** आहे. ४. ज्यांना मुलगे आहेत असे बाप. ५. अत्रि हे सप्तर्षींपैकीं एक आहेत. दत्तात्रेय यांचा पुत्र. (मागें दत्तचरित्र पहा). ६. उभारिली. ७. आपली [शुद्ध पांढरी] कीर्ति हीच [ब्रह्मांडाचा ताप हरण करणारी] छत्री. **निरंगरूपक.** ८. अत्रिपत्नीचा. ९. कुसवा. या गीतीशीं समानार्थक गीतिः—मुनि कैलासीं जाउनि दुर्गेसि म्हणे, 'यशें उमे! रुचिर । क्षीरधिहुनि कुक्षि तुझा, गाइल तव कीर्तितें सुमेरु चिर.' ॥ (विनायकमाहात्म्य ४।२४). १०. स्तुत, प्रसिद्ध. ११. त्या (कुक्षी)पासून जन्मलेला. १२. अमृताचे [=मुक्तिप्रद; (पक्षीं) सुधापूर्ण] आहेत कर [=हस्त; (पक्षीं) किरण] ज्याचे तो. दत्त, (पक्षीं) चंद्र. १३. जाड्य=जडत्व, बुद्धिमंदत्व. चंद्रपक्षीं 'ड' आणि 'ल' यांचा अभेद समजून, 'जाड्य' म्हणजे 'शीतत्व' घ्यावें. कलंक=पाप, (पक्षीं) चंद्रावरील डाग. क्षय=रोग, नाश; (पक्षीं) चंद्राच्या बिंबाचा संकोच. 'आदि' शब्दानें कुटिलत्व, दोषाकरत्व, नक्तंचरत्व, हे गुण घ्यावयाचे. १४. येथें **श्लेषमूलक व्यतिरेक** आहे. १५. पत्नी. **व्यतिरेक.** १६. आईबाप व मित्र यांचें चित्त. येथें दोन अर्धांत कार्यकारणभाव असून, 'म्हणून' शब्द अध्याहृत आहे. तेव्हां हा **काव्यलिंगालंकार** होय. १७. विरागयानें, (=दत्तानें). 'तुवांचि अवधूतें' म्हणण्याचें कारण असें कीं, वैराग्य घेऊनही ज्यानें आपल्या आईबापांना आनंदित ठेविलें आहे, असा पुत्र आढळत नाहीं. पुत्राचें वैराग्य—घरदारांचा त्याग—आईबापांना अत्यंत शोककारक होतो. परंतु दत्ताची गोष्ट याला अपवाद आहे. अवधूत शब्दाची व्याख्या अशी करितातः—यो विलंघ्याश्रमान्वर्णानात्मन्येव स्थितः पुमान् । अतिवर्णाश्रमी योगी **अवधूतः** स उच्यते. ॥ या शब्दाची अशीही व्युत्पत्ति देतातः—अक्षरत्वाद्वरेण्यत्वा**द्धुतसंसारबंधनात्** । तत्त्वमस्यर्थसिद्धत्वाद् **अवधूतो**ऽभिधीयते ॥. १८. सत्य समजणारा, सत्तत्त्व जाणणारा. येथें **असमालंकार** आहे. १९. वृक्ष, पर्वत, पक्षी इत्यादिकांस. स्थावरजंगमात्मक सर्व सृष्टीपासून आपल्याला पुष्कळ धर्मतत्त्वें शिकण्यासारखीं आहेत, हें दत्तात्रेयांचें मत. (मागें दत्तचरित्र पान ९६, साकी ५२ व टीप १७ पहा.)

तूं लोकसंग्रहार्थ[1]चि योगा[2]चा करिसि नित्य अभ्यास, ।
तुज अन्य काम[3] कोण स्वलाभपूर्णा[4]स भक्तिलभ्यास[5]? ॥ ९
एकांततीर्थभिक्षासेवन जनसंग्रहार्थ करितोस, ।
चरितें सुकीर्तिभरितें[6] निर्मुनि, बा! लोकशोक हरितोस. ॥ १०
भजला अर्जुन[7] भावें, त्यावरि केली दयासुधावृष्टि, ।
शरणागतीं अलर्कीं वत्सीं[8] सुरधेनु होय तव दृष्टि. ॥ ११
दिधले बहु वर देवद्रुमदर्पघ्न[9] त्वदंघ्रिकंजरजें[10], ।
होतां प्रसन्न, होतें शरणागतदीनवज्रपंजर जें[11] ॥ १२
देवा! दयासमुद्रा! दत्ता! दासांसि देसि अपवर्ग[12], ।
तुजला भजोनि, जाले कृतकृत्य असंख्य विप्रनृपवर्ग[13]. ॥ १३
यीं[14] विषयवासना विषलिप्ता, तप्ता, सुदुःखदा, जाणो ।
मन सूया; अनसूयापुत्रा! वैराग्य चांगलें बाणो. ॥ १४
अर्जुनहि भ्रम पावे जेणें, देऊं नकोचि दत्ता! तें[15]; ।
कीं त्वत्प्रियजन दूर त्यागिति त्या भाग्य[16]मद्यमत्तातें. ॥ १५
सत्कीर्ति पावलाचि स्तुत्य सहस्रार्जुन त्वदीय जन, ।
सद्गति कसी घडेना, भावें केल्या तुझ्या पदीं यजन[17]? ॥ १६

---

१. लोकांना नीट वळण लागावें म्हणून; लोकरहाटीकरितां. २. 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' म्हणजे मनोवृत्ति आवरणें हाच योग, अशी पतंजलीची व्याख्या आहे. 'समत्वं योग उच्यते' व 'योगः कर्मसु कौशलम्' असें श्रीकृष्णांनीं गीतेंत म्हटलें आहे (अ०२). ३. इच्छा. ४. ज्याला आत्मज्ञानाचा श्रेष्ठ लाभ पूर्णपणें झाला आहे अशास. ५. भक्तीला मिळणारा जो तूं त्यास. ६. सुयशानें थबथबलेलीं. ७. सहस्रार्जुन, कार्तवीर्य. सहस्रार्जुन, अलर्क नृप व यदु हे दत्तात्रेयाची सेवा करून त्याचा प्रसाद मिळविते झाले. पुढें गी० २५ पहा. 'अपि च कृतं खलु दशशतभुजमर्जुनभूपम् । श्रुत्वालर्कं च सकृन्नमनात्सुखरूपम् । भजति जनस्त्वां सिंधुं मुक्त्वान्यं कूपम् । शूलं वोग्रं त्यक्त्वा सौवर्णं यूपम् ॥ (मोरोपंतकृत दत्तात्रेयाची आरती). ८. वांसरावर. येथें **परंपरितरूपक** आहे. ९. कल्पवृक्षाचा [दातृत्वाविषयींचा] गर्व हरण करणाऱ्या. **प्रतीपालंकार.** १०. तुझ्या पादकमलाच्या धूलीकणानें. रज=मातीचा कण, (पक्षीं) पराग. ११. अंघ्रिकंजरज. १२. मोक्ष. या गीत्यर्धांतील **अनुप्रास** उघड आहे. १३. ब्राह्मण व क्षत्रिय यांचे समुदाय. १४. अन्वयः—मन या विषयवासना (=इंद्रियभोगांच्या इच्छा) विषलिप्ता (=विषानें माखलेल्या), तप्ता, सुदुःखदा, सूया जाणो (समजो); [आणि मग अशा रीतीनें] हे अनसूयापुत्रा! वैराग्य (=ऐहिक सुखाविषयीं पराङ्मुखत्व) चांगलें बाणो. येथें **रूपक** व **समुच्चय** आहेत. १५. ऐश्वर्य, भाग्य. दत्तवरानें ऐश्वर्य प्राप्त झाल्यावर सहस्रार्जुन मत्त होऊन, दुसऱ्यांस पीडा करूं लागला, या गोष्टीवर येथें कटाक्ष आहे. १६. ऐश्वर्यरूप मद्यानें माजलेल्या सहस्रार्जुनास. या गीतींत **हेत्वलंकार** आहे. १७. पूजन. येथें **प्रश्न** व **काव्यलिंग** आहे.

शरणागतीं अलर्कीं[1] प्रसाद जो, तोचि सज्जना रुचला, ।
कृतवीर्यनंदनींचा[2] विषयविरक्तांसि[3] भासला कुंचला[4]. ॥ १७
वैराग्य, योगभाग्य, श्रेष्ठ, प्राज्ञप्रिय,[5] प्रभो! साचें, ।
इक्षुक्षेत्र[6] उपेक्षुनि, कोण रसिक वन वरील भोसांचें[7]? ॥ १८
जे वरिति विषयभोगा, योगाभ्यासप्रसंग ज्यां न रुचे, ।
ते सुरस इक्षुचेहि त्यागुनि सुग्रास, चोखिती बेरुचे[8]. ॥ १९
दत्ता! त्वत्पदपद्मच्छाया तापत्रयार्तविश्रांति[9]; ।
तत्काळ अलर्काची गेली शोकप्रदा भवभ्रांति[10]. ॥ २०
दत्ता! सत्तापघ्ना[11]! बहु शरणागतजनासि वागविसी; ।
बोधकरें[12] संसारस्वप्नभ्रमपरवशांसि जागविसी. ॥ २१
दत्तात्रेया! तुमचा नाशाया दीनताप कर वीर, ।
भेटा मला, हरील क्षणपाणिस्पर्श[13] पाप करवीर[14]. ॥ २२
पडतांचि दृष्टि तुमची, होइन निष्पाप, ताप हा लटिका, ।
संसारभ्रम जाया नलगे, त्वच्चरण पाहतां, घटिका. ॥ २३
सुविशुद्ध, बुद्ध, मुक्त, क्षणमात्रें तो अलर्क नृप झाला, ।
तुमचा प्रसाद होतां, बोधाच्या[15] क्षण नकोचि उपजाला[15]. ॥ २४

---

१. मागें मदालसोपाख्यान, अध्याय ६ पहा. २. कृतवीर्यपुत्राचा, सहस्रार्जुनाचा. ३. विरक्तांस. ४. कडू काजरा. या गीतींत **विरुद्धगुणन्यास** आहे. ५. हीं वैराग्याचीं विशेषणें. ६. उसांचें शेत. ७. भोस नांवाच्या बोरूचें. हें सुंदर **सुभाषित** असून, येथें **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. ८. बोरूचे. ही **निदर्शना** आहे. ९. तापत्रयानें त्रासलेल्यास श्रम हरून संतोष देणारी. मनुष्याला जगांत होणारे ताप (=दुःखें) तीन प्रकारचे आहेत. (१) आधिदैविक; विद्युत्पात, ग्रहपीडा, भूतबाधा इ० (२) आध्यात्मिक; खरूज, ताप, भूक, शोक इ० (३) आधिभौतिक; भूकंप, अतिवृष्टि, समुद्रमर्यादोल्लंघन इ०. १०. संसारापासून होणारा भ्रम, मोह. येथें **काव्यलिंगालंकार** आहे. ११. सज्जनांचा ताप हरण करणाऱ्या! १२. संसाररूप स्वप्नांतील भ्रमांत गुंतून जे दुर्बळ झाले आहेत, त्यांस तूं उपदेशरूप हातानें [हालवून] जागे करितोस. हें **रूपक** आहे. १३. क्षणमात्र झालेला आपल्या हाताचा स्पर्श. १४. तरवार. आपल्या हाताचा नुसता स्पर्श हीच तरवार माझें पाप नाहींसें करील, मग मी निष्पाप होईन. 'क्षणपापिस्पर्शपाप करवीर' असा काव्येतिहाससंग्रहाचा पाठ आहे. १५. बोधाच्या उत्पत्तीला, ज्ञान होण्याला. येथें **काव्यलिंगालंकार** आहे.

भक्त **अलर्कार्जुनयदु** इत्यादि असंख्य तारिले, **दत्ता**! ।
त्वत्पदबळेंचि मुनिंनीं संसृतिकृत्येसि[1] मारिली लत्ता[2]. ॥ २५
म्हणुनि तुला कर जोडुनि, **दे**वा! मी दीन विनवितों भावें; ।
घन जेंवि चातकाला; करुणौदार्यव्रतीश्वरा[3]! पावें. ॥ २६
सोडवितें भवपाशापासुनि निजदास्य[4] सादरा[5] जीवा, ।
म्हणवुनि मुमुक्षु[6] भावें विनविति तुझियाचि पादराजीवा[7]. ॥ २७
'बा! गा! मागा, देतों,' हे तों वाणी निघे तुझ्याचि मुखें, ।
अभयार्थिकृपणशरणागतकटकें[8] त्वां न पाहिलीं विमुखें[9]. ॥ २८
त्वां भक्तांसि निजात्मा दिधला, आतां तुझी नसे सत्ता, ।
**दे**त्ताख्याचि[10] वदे हें, सत्यव्रत, सत्यसंध[11], तूं **दत्ता**! ॥ २९
तम[12] नाशी, ताप हरी, **कळानिधी**, **अ**मृतकर, **म**हेशमत, ।
श्रम तत्काळ निवारी, जन्हि जगदवना असे सदा भ्रमत; ॥ ३०
तन्हि न बघे मन तुमच्या जगदाल्हादप्रदोदया भावा; ।
भावानें[13] हें वदतों; भावाल[14] मलाचि मूढ, तरि भावा[15]. ॥ ३१

---

१. संसाररूप कृत्येला; संसाररूप पिशाचीला. २. या गीतींत दत्ताच्या पदबळानें मुनि लाथ मारतात, म्हणजे एकाच्या पायांत बळ व लाथ मारितो दुसराच, असें वर्णन आहे, म्हणून ही **असंगति** होय. ३. दया व औदार्य हेंच ज्यांचें ब्रीद आहे, अशा लोकांतील श्रेष्ठा! ४. आपली सेवा. ५. आदरपूर्णा, भाविका. ६. मुक्तीची इच्छा धरणारे. ७. चरण-कमलाला. या गीतींत **हेत्वलंकार** आहे. ८. अभय मागणाऱ्या, दीन व आश्रयार्थ आलेल्या लोकांच्या टोळ्या. कटकें=टोळ्या, समूह. ९. फिरविलीं आहेत तोंडें ज्यांनीं अशीं, परत फिरलेलीं, हताश, हिरमोड झालेलीं. १०. दत्त हें नांव. येथें, तूं आपला आत्माहि भक्तांना दिला, म्हणूनच तुला 'दत्त' हें नांव पडलें, असें वर्णन आहे, म्हणून हें **निरुक्ति** नांवाच्या अलंकाराचें उदाहरण आहे. याचें लक्षणः–हेतुना येन केनापि योगेनान्वर्थता यदि । नाम्ना चेत्कल्प्यते यत्र निरुक्तिस्तत्र कीर्तिता ॥ म्हणजे कोणत्याही हेतूनें एकाद्या वस्तूचें नांव यथार्थ आहे असें वर्णन असलें म्हणजे निरुक्ति हा अलंकार होतो. ११. सत्य आहे संधा ज्याची तो, सत्यप्रतिज्ञ. १२. गीति ३० व ३१ यांचें युग्म आहे. अन्वयः–जन्हि कळानिधी [व] महेशमत [असा] अमृतकर (=चंद्र) तम नाशी, ताप हरी, श्रम तत्काळ निवारी [आणि] जगदवना (=विश्वरक्षणार्थ) सदा भ्रमत असे, तन्हि माझें मन [त्या चंद्राचे ठिकाणीं] तुमच्या जगदाल्हाद-प्रदोदया (=सर्व विश्वास उल्हास देणारा आहे उदय ज्याचा अशा) भावा (=गुणा) न बघे (=पाहात नाहीं). तुमचे सर्व गुण त्याच्यांत दिसत नाहींत, हा भावार्थ. **व्यतिरेकालंकार.**
१३. खरेपणानें; पूर्ण विश्वासानें. १४. मानाल. १५. माना. येथें **अनुज्ञा** आहे.

मूढ[1] कसा मी? स्वामी! कांति तयाची असो निकाम[2] हिमा[3], ।
भूतपति[4] शिरिं धरू द्या; तुमचा विधुला[5] न ये निका[6] महिमा. ॥ ३२
न गुहागत तम नाशे चंद्रकरांहीं, न तापही सर्व, ।
माथां पिशाचपतिनें[7] धरिलें, म्हणऊनि कां वृथा गर्व? ॥ ३३
अमृतकर[8] कळानिधि[9] तो कैसा? न हरी निजक्षयव्याधी[10], ।
वंद्य[11] कसा तो? ज्याची गुरु[12]दाराधर्षणीं अभव्या[13] धी[14]. ॥ ३४
स्वामी! क्षमा करा; हा निंदक, पापी, असें न मानावें; ।
घेतों तुमचीं शुद्धें पुण्य[15]श्लोकोत्तमोत्तमा! नांवें. ॥ ३५
श्रीदुर्वासा[16] भगवान् बंधु तुझा, सर्ववरदगुरु[17] दक्ष, ।
त्रिभुवनवंद्यपदांबुज[18]; वर देउनि दास सुखविले लक्ष. ॥ ३६
हें विश्वाला ठावें, वेदपुराणप्रसिद्ध परि कोपी, ।
तो पीतपट[19] प्रभुला[19] वळला, तद्भक्ति न इतरा सोपी. ॥ ३७

---

१. पुढील तीन गीतींत **श्लेषा**चा अंगीकार करून, वरील गीतींतील दत्ताचें चंद्रावरील श्रेष्ठत्व स्पष्ट दाखवून, कवि **व्यतिरेक**सिद्धि करितात. २. अत्यंत. ३. थंड. ४. शिव. ५. चंद्राला. ६. चांगला. ७. भूतपति शंकरानें. हें पद **श्लिष्ट** असून सहेतुक आहे, म्हणून येथें **परिकरांकुर** आहे. ८. अमृताचे किरण ज्याचे तो चंद्र, (पक्षीं) अमृत हातांत ज्याच्या तो. ९. कळांचा (=बिंबाकृतिभेदाचा) निधि=चंद्र. (पक्षीं) कलाकौशल्य ज्याला माहित आहे असा. येथें हीं दोन्हीं विशेषणें सहेतुक असल्यामुळें **परिकर** झाला. १०. आपला क्षयरोग. ११. या गीतींत **प्रश्न** व **काव्यलिंग** आहेत. १२. गुरूच्या पत्नीशीं दुर्वृत्तपणानें वागण्यांत. धर्षण=दांडगेपणा. देवगुरु बृहस्पति ह्याची पत्नी तारा हिला चंद्रानें एकदा पळविली; व गुरूनें तिला परत करण्याविषयीं सांगितलें असतां, चंद्रानें तसें करण्याचें नाकारलें. तेव्हां त्यांचें मोठें युद्ध झालें; शेवटीं ब्रह्मदेवानें मध्यस्थी करून, तारेला गुरूकडे धाडून दिली. चंद्रसंबंधानें तारेला बुध नांवाचा मुलगा झाला. हाच चंद्रवंशाचा आदिपुरुष होय. १३. अकल्याणकर, पापी. १४. बुद्धि. १५. पुण्य आहे श्लोक (=कीर्ति) ज्याचा तो पुण्यश्लोक. हे पुण्यश्लोकश्रेष्ठश्रेष्ठा! या गीतींत **काव्यलिंग** आहे. १६. दुर्वासा हा अत्रि आणि अनसूया यांचा मुलगा, आणि म्हणून दत्तात्रेयाचा बंधु. हा फार कोपिष्ट असून, याची मर्जी संभाळणें परम दुर्धर असे. त्यानें हजारों स्त्रीपुरुषांना शाप देऊन धुळीस मिळविलें, परंतु कृष्ण, द्रौपदी, अंबरीष इत्यादि ज्या मनुष्यांनीं आपलें सत्त्व राखून त्याची एकनिष्ठ सेवा केली, त्यांजवर सुप्रसन्न होऊन, त्यांस ईप्सित वर देऊन सुखी केलें. जमदग्नीप्रमाणें हाही रागाविषयीं लोकप्रसिद्ध आहे. (मागें दत्तचरित्र साकी ४९ वरील टीप पहा). १७. उदारश्रेष्ठ. १८. त्रिजगानें वंदन करण्यास योग्य आहे चरणकमल ज्याचें असा. १९. पीतांबरधारी कृष्णाला. ही कथा मोरोपंतांनीं मंत्रभागवतांत, महाभारतांत (अनुशासनपर्व, अ० ७) व एका स्वतंत्र ओवीबद्ध स्फुट प्रकरणांत वर्णिली आहे. एकदा दुर्वासा द्वारकेंत येऊन कृष्णसत्त्वपरीक्षार्थ त्याच्याकडे चार महिने राहिला. कृष्णानें व रुक्मिणीनें त्याची एकनिष्ठपणें सेवा करून

मुष्टींत[1] धरिल कोणी तरि, जरि दुर्धर असे, असो, पारा, ।
परि हा सुदुर्धर प्रभु, इंद्रप्रमुखांसही न सोपारा[2]. ॥ ३८
आराधाया त्याच्या अमरद्रुमगर्वहरपदासि[3] कसीं ।
सामर्थ्यें पुरतीं? बा! कैसा उतरेल[4] दीन दास कसीं? ॥ ३९
सोसाया त्याचे छळ, बळ कैचें आज पामरा[5] मातें? ।
कांपे हृदय, पुराणीं आइकतां चरित रामरामा[6]! तें. ॥ ४०
जोडुनि रथीं सदार[7] प्रभुसि, पुरीं चालवि प्रतोदानें[8], ।
छळितो, परि बहु देतो इष्टार्थांचीं सुविप्र तो दानें. ॥ ४१
तो श्रीमदंबरीष[9] च्छळिला, तें व्यसन केव्हढें भारी! ।
करितां श्रवण, थरारां कांपे अद्यापि सत्सभा सारी. ॥ ४२
वनवासव्यसनांत च्छळकाम धरी; परंतु पांचाळी[10] ।
गेली शरण प्रभुला, तोचि अकालक्षयासि त्या टाळी. ॥ ४३
छळितो, परंतु सद्यश वाढवितो; ज्यासि चाटितो दहन, ।
तें पहिल्याहुनि पावे, पुष्कळ संपत्ति मालतीगहन[11]. ॥ ४४
छळ साहतां, गुरुकृपें पाप जळे, होय भद्र बहु मोटें, ।
हें मृदुयत्नें घडतां, चतुरें व्हावें जनांत कां खोटें? ॥ ४५
'छळ न करितां, नव्हे शिवें[12] दासांचें,' जरि म्हणाल जी! स्वामी! ।
छळिला अलर्क केव्हां? हें पुसतो तुज निजाश्रितस्वा[13] मी. ॥ ४६

---

कांहीं एक उणें पडूं दिलें नाहीं. अखेरच्या दिवशीं त्यांना चांगलें कसोटीस लाविण्याकरितां दुर्वास्यानें त्यांस रथास जोडिलें व रथ राजमार्गानें धांवत काढिला. वाटेंत थकून रुक्मिणी पडली, तेव्हां मुनिराज रागवून जाऊं लागले. कृष्ण व रुक्मिणी त्यास समजावण्याकरितां त्याच्या मागें धांवत जाऊन, त्यांनीं त्याचे पाय धरिले. तेव्हां दुर्वासा प्रसन्न झाला. ही कथा या पुढील पांच गीतींत अनुसंधेय आहे.

१. मुठींत. २. [धरण्यास, वळविण्यास] सोपा. येथें **श्लेषमूलक व्यतिरेक** आहे. ३. कल्पवृक्षाचा [औदार्यासंबंधीं] गर्व हरणाऱ्या पायाला. ४. कसोटीस उतरेल, परीक्षेंत टिकेल. ५. सत्वहीन दुर्बळाला. ६. शिवशिव! हरहर! ७. पत्नीसह, रुक्मिणीसह. ८. चाबुकानें. ९. मागें साकीबद्ध अंबरीषाख्यान पहा. १०. पांचाळ राजाची कन्या द्रौपदी. पांडव वनवासांत असतां, दुर्योधनाच्या सांगण्यावरून दुर्वासा एकदम हजारों ब्राह्मण बरोबर घेऊन रात्रीचा भोजनार्थ आला. या संकटांत द्रौपदीनें कृष्णाचा धांवा केला. तेव्हां कृष्ण आला व द्रौपदीनें वांसून ठेविलेल्या पाकस्थालींतील चुकून राहिलेलें एकच शाखदल सेवून प्रसन्न झाला व आपल्या मायेनें सर्व ऋषींना पुरेसें अन्न त्यानें उत्पन्न केलें. (महाभारत वनपर्व). ११. मालतीलतावन. येथें **दृष्टांत** व **विरोधाभास** असे दोन अलंकार आहेत. १२. कल्याण. १३. आपल्या आश्रितांचें (=दासांचें) धन जो (तूं) त्याला.

[1]छळ न करितां कराल प्रभुजी! जी, तीच मज दया मोटी, ।
अपमान, श्रम नसतां, जें जोडे स्वल्प, तेंचि धन कोटी. ॥ ४७

असतां [2]अघहर [3]गंगाहृद, [4]शिखिकुंडीं शिरेल कोण कवी? ।
आरोग्य शर्करा दे, तरि [5]कटुकीची न घे रसज्ञ चवी. ॥ ४८

तूं भक्तवत्सल प्रभु, करुणालय, [6]शुद्धसत्वमयकाय; ।
तुजलाचि आठवीतां, मजला संसारदुःखभय काय? ॥ ४९

[7]भगवंताला त्याला करितों दूरूनि भीरु मी नमनें, ।
[9]दुग्धाब्धिकीर्ति परिसो, परि सोडी [10]मानसा न मीन मनें. ॥ ५०

[11]लक्ष्मण काय विचक्षण नव्हता सत्पात्रही प्रसादास? ।
त्याहि दुराराध्य मुनी; मग आराधील [12]हा कसा दास? ॥ ५१

ज्यांज्यांवरि सेवेनें झाला मुनि सुप्रसन्न, ते धन्य ।
तरले [13]सिंधु भुजांहीं, दैवें संप्रति नसे तसा अन्य. ॥ ५२

---

१. या गीतींत **अर्थान्तरन्यास** आहे. २. पापनाशक. ३. गंगाडोह. ४. अग्निकुंडांत. ५. एक काजन्यासारखी कडु वनस्पती. ही गीति व वरील गीत्यर्ध हीं सुरेख **सुभाषितें** आहेत. प्रस्तुत गीतींत **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. ६. निर्मळ सत्वगुणानें भरलेला आहे देह ज्याचा असा. या गीतींत **काव्यलिंगालंकार** आहे. ७. दुर्वास्याला. ८. ही **लोकोक्ति** आहे. ९. क्षीरसागराची कीर्ति. १०. मानस सरोवराला. 'मानसा' हा अपपाठ असावा असें वाटतें. कारण जशी हंसाची मानसप्रीति प्रसिद्ध आहे, तशी माशाची नाहीं. 'मानस' याचा अर्थ 'कोणतेंही सरोवर' असा घेतला, तरीही अडचण आहेच, कारण मासे सरोवरापेक्षां समुद्रांतच जास्ती असतात. कदाचित् 'सागरा' असा मूळचा पाठ असावा. शिवाय 'सागरा' हा शब्द 'दुग्धाब्धि' शब्दाशीं सुसंगत दिसतो. येथें **प्रतिवस्तूपमा** आहे. ११. लक्ष्मणछळाची कथा अशी आहे:—रामावताराची समाप्ति जेव्हां जवळ आली, तेव्हां रामाला समाप्तिकालाची सूचना देण्यासाठीं प्रत्यक्ष काळ ब्राह्मणरूपानें आला. राम एकांतांत त्याची भेट घेत असतां, लक्ष्मण पहाऱ्यावर होता. तेव्हां 'आतां कोणींही—लक्ष्मणानेंही—आंत येतां कामा नये. येईल त्याला देहांत शिक्षा करीन;' असें रामानें ब्राह्मणास वचन दिलें होतें. असो. लक्ष्मण पहाऱ्यावर असतां, दुर्वास ऋषीची स्वारी रामाच्या भेटीला आली. लक्ष्मणानें एकंदर हकीकत सांगून त्यास भेट होणें शक्य नाहीं म्हणून सुचविलें. परंतु या शीघ्रकोपी ऋषीस तें पटेना व त्यानें लक्ष्मणाला आपलीं वर्दी लावण्यास आंत धाडलेंच. रामानें दुर्वास्याची भेट घेतली, परंतु 'इतःपर तुझें मुखावलोकन नको,' असें त्यानें लक्ष्मणास बजाविलें. तेव्हां लक्ष्मण वैतागानें अयोध्येंतून निघाला व त्यानें आपला देह सरयूंत अर्पण केला. (वाल्मी० रामायण. उ० कांड). १२. मी, मोरोपंत. १३. संसारसागर. ही **रूपकातिशयोक्ति** आहे.

[1]तुमचें होतें, [2]त्याचें दुर्लभ **क**लिमाजि दर्शनचि आधीं, ।
त्यांत दुराराध्य, तसें उग्रत्व नसे [3]हरीं, [4]मृगव्याधीं. ॥ ५३
श्रीमं[5]**न्ना**रदबावा तेहि [6]**क**लीमाजि भेटतो न जना, ।
कलहप्रिय म्हणति म्हणुनि भी मन, परि पाय योग्य ते [7]भजना. ॥ ५४
न टिके मुहूर्तभरिहि [8]कचित् [9]कथंचिदपि, तत्पद भ्रमती, ।
दर्शन घडतें, तरि ते करितेचि दया गुरू [10]अदभ्रमती. ॥ ५५
**वा**ल्मीकि**व्यासशुकप्र**ल्हादध्रुवमुखांसि तो तारी, ।
हरिभक्तिज्ञानरसें ओती जो शिष्यमूर्ति [11]ओतारी. ॥ ५६
कंटाळे मायहि बहु, हरितां शिशुचाहि [12]बाह्य [12]मळ हातें, ।
[13]बाह्यांतर [13]नतमळ तो गुरुवर हरि, करि [14]शिवार्थ कळहातें. ॥ ५७
**वा**ल्मीकिचें दुरित किति होतें हो! तें, [15]तरी न धरि वीट, ।
स्वकरें हरि; [16]हरिहुनि मुनिसिंह प्रणताघकरिवधीं धीट. ॥ ५८
या गुरुराजें अगणित जीव [17]भवदवानळांत वांचविले, ।
सोडविले बहुत, जिहीं ममतापाशीं स्वकंठ [18]कांचविले. ॥ ५९
[19]भवकारागृहमुक्त प्राणी करितो, [20]हठेंचि हरि ताप, ।
बाप प्रेम[21] खरें तें, बद्धविमोक्षीं सुखेंचि वरि शाप. ॥ ६०

---

१. तुमचें (दत्ताचें) दर्शन. २. दुर्वास्याचें. ३. सिंहांत. ४. श्वापदें मारणारा शिकारी, पारधी, त्यांत. येथें **व्यतिरेक** आहे. शिवाय दर्शनदुर्लभत्व, दुराराध्यत्व व उग्रत्व असे एकाहून एक वरचढ गुण दाखविले आहेत, म्हणून हा **सारालंकार** आहे. लक्षणः–उत्तरोत्तरमुत्कर्षः सारालंकार उच्यते । उत्तरोत्तरमश्लाघ्यगुणोत्कर्षोऽप्यसौमतः. ॥ ५. मागें 'नारदाभ्युदय' पहा. ६. कलियुगांत. ७. सेवेला. नारदासंबंधें मोरोपंतकृत महद्विज्ञापनेंतील गीति ४८–६८ वाचनीय आहेत. ८. कोठेंही. ९. कसेंही. १०. उदारमति. अदभ्र=विपुल, विशाल. ११. धातूंचें ओतींव काम करणारा. येथें **श्लेषमूलक रूपक** आहे. १२. मूत्र, विष्ठा इत्यादि. १३. नम्रांचा (=दासांचा, शरण आलेल्यांचा) दरोबस्त पापरूप मळ. येथें **श्लेषमूलक व्यतिरेक** आहे. १४. कल्याणासाठीं (वि० मा० अ० ४ गी० ३ पहा). येथें **विरोधाभास** आहे. १५. येथें **विशेषोक्ति** आहे. १६. सार्थान्वयः–मुनिसिंह (=मुनिश्रेष्ठ नारद) प्रणताघकरिवधीं (=नम्र दासांचें जें पाप तोच हत्ती त्याला मारण्यांत) हरिहुनि (=सिंहापेक्षांही) [अधिक] धीट (=शूर). येथें 'मुनिसिंह'–मुनिश्रेष्ठ, व मुनिरूप सिंह, असे दोन्हीही अर्थ इष्ट आहेत. हें **रूपक** असून यांत **व्यतिरेकही** आहे. १७. संसाररूपी वणव्यांत. १८. आंवळून घेतले. १९. संसाररूप तुरुंगांतून मोकळे. 'करितो' 'हरि' या क्रियापदांचा कर्ता 'गुरुराज नारद' अध्याहृत. २०. [पापी मनुष्य 'नको नको' म्हणत असतांही] हट्टानें. २१. अन्वयः–[जें] बद्धविमोक्षीं (=जखडलेल्यास सोडविण्याच्या कामीं) सुखेंचि शाप वरी, तें खरें प्रेम बाप [होय]. हें सुंदर **सुभाषित** आहे. येथें **अर्थान्तरन्यास** असून 'बद्धविमोक्षीं शाप वरी' यांत एक प्रकारचें **विषम** आहे.

कोठेंहि आढळेना मुनि तो, भ्याला असेल या **क**[1]ळिला, ।
कीं[2] अद्भुत सच्छिष्यप्रेमगणांहीं[3] बळेंचि आकळिला. ॥ ६१
भ्याला म्हणतों, त्वद्यश जरि कीं त्याच्या मनीं सदा नसतें[4], ।
भवभयहर भवदंघ्रिध्यानहि न विशुद्ध मानसीं ठसतें[5]. ॥ ६२
काय **नृ**[6]सिंहोपासक कीं शरभमनुज्ञ[7] भीईल[8] **वे**ताळा? ।
**जं**[9]भें उगारिल्या कीं वज्रकर[10] स्वर्पती लवे तोंळा[11]? ॥ ६३
यदनुग्रहें[12] अनळविधु ज्या दुःसह, त्याहि अंधकारा ती ।
धाकेल चंडकररुचि? किंवा **का**मासि **अं**धकाराति? ॥ ६४
सद्वृत्तीस खळाच्या धाकें न कदापि साधु सोडील, ।
चोरभयास्तव लोभी जन कोण बरें धनें न जोडील[13]? ॥ ६५
धरिलें नसेचि चित्तीं **क**ळिचें भय एकवल्ल[14] भागवतें[15], ।
जिंकावें केविं कधीं **स्वा**हेच्या[16] प्राणवल्लभा गवतें[17]? ॥ ६६

---

१. पापमय कलियुगाला. येथें **अनुमान** आहे. २. किंवा. ३. व्यासप्रल्हादध्रुवप्रभृति चिरंजीव सच्छिष्यांनीं. ४. येथें **आक्षेपालंकार** आहे. लक्षण:—'आक्षेपः स्वयमुक्तस्य प्रतिषेधो विचारणात् ।' म्हणजे एकदा एका गोष्टीचें विधान करून, पुन्हां विचारपूर्वक आपणच ती खोडून टाकितों, तेव्हां आक्षेपालंकार होतो. मोरोपंतकृत संशयरत्नमालेंत हा अलंकार पदोपदीं आढळतो. ५. जर नारद तुमची कीर्ति निरंतर स्मरत नसता, व अभय देणाऱ्या तुमच्या चरणाचें चिंतन त्याच्या हृदयांत बिंबलें नसतें, तर तो कलीला भ्याला असें मी म्हणतों (=मला म्हणतां आलें असतें). ६. नृसिंहाचा भक्त. ७. शरभासारखा [व म्हणून नृसिंहापेक्षांही पिशाचबाधादूरीकरणांत अधिक समर्थ असा] मंत्र जाणणारा, पिशाच दूर करण्यांत नृसिंहाहून जास्ती उपयोगी असा शरभमंत्र जाणणारा. मनु=मंत्र. शरभ=आठ पायांचें सिंहाहून बलिष्ठ असें कविकल्पित जनावर. पिशाचबाधेवर नारसिंहमंत्र अगदीं रामबाण आहे. "जाणों त्या अत्युग्रा मूर्त **श्रीनारसिंहमंत्रास ।** पाहूनि पावले ते रिपुभटभूपाळ**भूत** संत्रास ॥" कर्णपर्व. ८. भिईल. ९. इंद्रानें मारलेला एक असुर. १०. वज्र आहे हातांत ज्याच्या असा स्वर्गाधीश (=इंद्र). ११. तरवारीच्या मुठीला. या गीतींत **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. १२. सार्थान्वय—यदनुग्रहें (=ज्या रविकांतीच्या प्रसादानें) ज्या [अंधकाराला] अनळविधु (=अग्नि व चंद्र) [सुद्धां] दुःसह [होतात], त्याहि अंधकारा ती चंडकररुचि (=प्रखर सूर्यकांति) [धाकेल काय]? ही **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. गीति ६३,६४ व ६५ **सुभाषित**मय आहेत. काव्येतिहाससंग्रहाचा 'यदनुग्रहें अनळविधुजा' असा पाठ आहे. १३. मिळवील, संचय करील. काव्येतिहाससंग्रहाचा 'सोडील' हा अपपाठ आहे. येथें **दृष्टांत अलंकार** आहे. १४. एक वालभर सुद्धां. १५. भगवद्भक्तानें. १६. स्वाहेच्या (=अग्निस्त्रीच्या) प्राणनाथाला=अग्नीला. १७. गवतानें. हें पंतांचें ठराविक यमक आहे. "हें प्रेमाश्रुस्नपितस्मितविकसितपुलकाढ्य भागवत । शुक गाय, जया भी अघ जैसें स्वाहासुवल्लभा गवत ॥ (मोरोपंतकृत **भक्त**भूषण). येथें **प्रतिवस्तूपमा** आहे.

तरि कां नुगवे [1]भगवच्छुद्धयशःपुंडरीकसुहृदर्क? ।
[2]बहुधा दिधलें कळिला अभय, असा हा कसा बरा [3]तर्क? ॥ ६७
दुष्टजना, शरणागत व्हावें साधूंसि, हें रुचेनाच; ।
[4]दैवें रुचतां, न रुचे स्वगुण; रुचे सत्कथा, रुचे नाच. ॥ ६८
देते जरि भलत्याला भलतें, जें ज्यास [5]अर्थजात रुचे, ।
[6]तरि कां कवी न म्हणते कीं 'संत सखे समुद्रजा तरुचे'? ॥ ६९
संत विवेकी, करिती पाहुनि अधिकार जी दया साजे; ।
ऐसे प्रसाद त्यांचे, देती अन्योन्य न प्रयासा जे. ॥ ७०
म्हणउनि अभय कळीला दिधलें म्हणतां नयेचि; तरि तो कां ।
सांप्रत कळींत न दिसे [7]भगवान् मुनि [8]अस्मदादिकां लोकां? ॥ ७१
बहुधा अस्मद्दृष्टि स्वच्छ नसे अमित पातकीं मळली, ।
[9]घूकेक्षणासि रविसा मुनि न दिसे, तर्क मति असा फळली. ॥ ७२
मति वाखाणी मानुनि सुंदर या तर्कबाळकाला जे, ।

---

:. आपलें शुद्ध यश हेंच कमळ, त्यास अनुकूल [फुलविणारा] सूर्य (=तुमचें शुद्ध यश ाणारा तुमचा भक्तजनांवरील प्रसाद). पुंडरीक=कमल. सुहृद्=मित्र. अर्क=सूर्य. येथें **ारितरूपक** आहे. २. समानार्थक गीतिः—"कीं संप्रति अभय दिलें कलिला, चालावया राज्य; । परि कोण प्राणि सदय शिंपील बळें दवानळीं आज्य? ॥ मोरोपंत—संशय-ाला. ३. अनुमान. या गीतींत **अनुमान** व **आक्षेप** असे दोन अलंकार आहेत. ाार्थान्वयः—दैवें (=दैवयोगानें) साधूंस शरण जाणें [दुष्टांस] रुचतां, [त्या दुष्टांस] स्वगुण ाला दुष्ट गुण] न रुचे, [परंतु] सत्कथा (=सज्जनांची व परमेश्वराची कथा) रुचे, [व था गात, भजन करीत,] नाच (=नाचणें) रुचे. हें **सुभाषित** आहे. येथें कलीविषयीं ा गोष्ट प्रस्तुत असतां, केवळ सामान्य सिद्धांत घालून दिला आहे, म्हणून ही **स्तुतप्रशंसा** आहे. ५. द्रव्यसमूह. ६. तरि 'संत समुद्रजा तरुचे (=समुद्रोत्पन्न ाचे, कल्पवृक्षाचे) सखे (=मित्र)' असें कवि (=ज्ञाते) कां न म्हणते? कल्पवृक्ष हा पाहिजे :, पाहिजे तें देतो, म्हणजे त्यास विवेक नाहीं; आणि संतांनाही जर पात्रापात्रविचारणा ी तर ते कल्पवृक्षाप्रमाणेंच झाले असते. परंतु संत सारासारविचारहीन नाहींत व म्हणून ते वृक्षाहून श्रेष्ठ होत, हा भावार्थ. ही कल्पना पंतांच्या काव्यांत वारंवार आढळते. "तं जडम-केनमगमस्वाधीनं समाश्रयिष्यति कः? । त्वां प्रभुमपास्य सर्वगमादिकविं करुणमखिल-करम् ॥" (मोरोपंत—कृष्णस्तवराज). येथें **व्यंग्य व्यतिरेक** आहे. समुद्रोत्पन्न चतुर्दशरत्नांत वृक्ष आहे. गीति, ६९ व ७० सुंदर **सुभाषित** आहेत. ७. नारद. ८. आमच्या सार-स. ९. घुबडाच्या डोळ्यास. येथें **उपमा** व **अनुमान** हे अलंकार आहेत.

हांसे [१]वाल्मीकिकथा, म्हणउनि ती विश्वपाळका! लाजे. ॥ ७३
करुणा कराल, तरि बा! तारालचि शुद्ध तर्क हा मात्र. ।
केले पुष्कळ [३]पामर पापी प्राणी तुम्ही कृपापात्र. ॥ ७४
पाहुनि मनिं रेखावे भवदंघ्रि दयानदा! सदा पावा. ।
हा षड्रिपुंनीं तुमचा, न धरूनि भया, न दास [४]दौपावा. ७५
ऐसें भक्त मयूर प्रार्थी तुजला, दयाघना! दत्ता! ।
नमनेंहि कोप न शमे, तरि हाणीं या शिरावरी लत्ता. ॥ ७६
[५]व्यसनीं दीन तुलाचि प्रार्थिति, देऊनि हाक, दादास; ।
रक्षिसि, धांवुनि आंगें, सदया! तैसाचि हा कदा दास? ॥ ७७
शरणागत पि[६]तृसखजमदग्निकुलज राख विप्र, तापाला ।
पावे, [७]बा! वेगानें स्वजनीं जन दाखवि प्रतापाला. ॥ ७८
आंगीं असोनि अद्भुत सामर्थ्य, प्रेमही यशीं मोटें, ।
प्रभुजि! जिरविले असतां [८]अमितप्रणतापराधही पोटें, ॥ ७९

---

१. वाल्मीकि अत्यंत पापी असूनही त्यास नारद भेटले व त्यांच्या उपदेशानें तो निष्पाप होऊन निःसीम भगवद्भक्त झाला, ही कथा. २. आम्ही पापी म्हणून नारद आम्हांस भेटत नाहीं, हा तर्क माझ्या मतीला सुंदर वाटला. परंतु हा विक्षिप्त तर्क पाहून वाल्मीकिकथा हंसू लागली, म्हणून ती (माझी मती) फार शरमली आहे. या गीतींत **रूपक** व **चेतनोक्ति** असे दोन अलंकार आहेत. ३. दुर्बळ, हीन. येथें **काव्यलिंगा**लंकार आहे. ४. दरडवावा, भेडवावा, चेपावा. ५. दीन [जन] व्यसनीं (=संकटांत) तुलाचि दादास (=बापास, किंवा मोठ्या भावास) हाक देऊन (=हांक मारून) [रक्षणार्थ] प्रार्थिती; [मग] तैसाचि (=इतर दीनांप्रमाणें] हा दास, हे सदया! तूं आंगें धांवुनि कदा रक्षिसि? आंगें=स्वतः. ६. [आपल्या] वडिलांचे (=अत्रीचे) मित्र जमदग्नि यांच्या कुळांत जन्मलेला. या गीतीवरून मोरोपंतांचें गोत्र जामदग्न्य होतें हें सिद्ध होतें, महद्विज्ञापनानामक स्फुट काव्यांत मोरोपंतांनीं आपलें गोत्र असेंच सुचविलें आहे. नमितों पाय वसिष्ठा! शरणागत **जामदग्न्य** हा वा! मी। कामी, क्रोधी, लोभी, सांगुनि शिष्यास उद्धरा स्वामी! ॥ ७ ॥ "वा! पाव **जामदग्न्या!** रामा! तूं शत्रुमृगकुळीं हरिसा । **मज तव गोत्रोत्पन्ना** पीडिति कामादि नित्य हे अरि सा ॥ १२ ॥ प्रस्तुत गीतींत 'पितृसख' हें पद साभिप्राय आहे म्हणून **परिकर** झाला. ७. 'Charity begins at home' या इंग्लिश म्हणीशीं हें गीत्यर्थ समानार्थक आहे. या गीतींत सुरेख **अर्थान्तरन्यास** आहे. ८. पोटानें अनेक दासांचे अपराध जिरविले, तुम्हीं अनेक दासांचे अपराध पोटांत घातले. ही **लोकोक्ति** आहे. अर्थसादृश्यः—तुझ्या जिरविले बहु प्रणततंतु पोटें, पण । त्यजी मदपराध हें मजकडेचि खोटेंपण ॥ (केकावली १८.)

किंच स[१]कृन्निजनामोच्चारश्रवणें जळे म[२]हापंक, ।
सर्वेंहि अवगत असतां, कां हो! सदया! न उद्धरा रं[३]क? ॥ ८०
व्यसनीं नत रक्षावे, निस्तु[४]ळें सर्वज्ञनायका! यश तें. ।
इतरां विभूषणांचीं प्रभुचा शोभविति [५]काय काय शतें? ॥ ८१
माते! **अनसूये!** सति! तूं तरि पुत्रासि आपुल्या बोधीं. ।
बुडतों मज कर नेदी, जवळि असोनिहि, भवाब्धिच्या रो[६]धीं. ॥ ८२
हा पं[७]कजपत्रेक्षण **अत्रे!** क्षण न भरतांचि तारील; ।
भवदाज्ञा लंघीना, दीनांचें व्यसन सर्व वारील. ॥ ८३
[८]काय उणा करुणार्णव होइल? मज एक अर्पितां बिंदु. ।
जग तर्पी अमृतरसें, धन्य [९]जडप्रकृति [१०]संक्षयहि इं[११]दु. ॥ ८४
पुत्रासि विश्वहित उपदेश करायासि तूं म[१२]हाविंदु. ।
सर्व[१३]स्वामृतदानें पुनरपि वृद्धीस पावतो इंदु. ॥ ८५
**अत्रिस्वामी!** काय स्वमुखें स्वसुतासि पढविलें युक्त? ।
नमुनि विनवितों भावें, न करीं अद्यापि कां मला मुक्त? ॥ ८६
ऐका, हो! संत! तुम्ही सदय, कसा हो नतासि [१४]होगलितां? ।
अजि सांवरा, गुरूची [१५]गुर्वी बि[१६]रुदावली न हो गलिता! ॥ ८७
नित्य परोपकृतिव्रत संत तुम्ही, म्हणुनि एकदा [१७]भोगा. ।
[१८]कांहींच न मागा, परि उपकृतिधर्मार्थ एवढें मागा. ॥ ८८
तुमचें वचनोल्लंघन न करील **प्रभु**, पहा बरें, हटका. ।
वागवितो भीड सदा, संशय आणूं नका मनीं लटका. ॥ ८९

---

१. आपल्या नामाचा उच्चार व त्याचें श्रवण एकदांच केल्यानें. २. मोठें पाप. गीति ७९–८० ांचें युग्म आहे. ३. हा दीन जन, हा पामर. या गीतींत **विशेषोक्ति** आहे. ४. अ-ुपम. ५. देह. ६. तीरावर. येथें **रूपक** आहे. ७. कमलदलनयन (=दत्त). गीति ८२ ८३ यांशीं समानार्थक गीतिः—अत्रे! अनसूये! मजविषयीं दत्ता सुतासि सांगावें; । ज्यां ोउनि मुक्त सुखें नित्य तुम्हां सदयमानसां गावें. ॥ ८. येथें **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. . मंदप्रकृति, (पक्षीं) जलप्रकृति=शीत. १०. क्षयरोगी, (पक्षीं) ज्याचें बिंब लहान लहान ोतें असा चंद्र. ११. येथें **विरोधाभास** अलंकार असून **काव्यलिंग**ही आहे. १२. मोठा ाता. १३. येथें **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. १४. सोडतां, झिडकारितां. १५. मोठी. ६. कीर्ति. येथें **हेत्वलंकार** आहे. १७. [माझ्या करितां] तसदी घ्या. १८. याचना न रणें हा तुमचा स्वभाव आहे, तरी पण दीनावर उपकार करण्यासाठीं म्हणून एवढें (=माझें क्षण) [दत्ताजवळ] मागा.

[1]वेंचिति परोपकारीं सर्वस्व, अनित्य जीवितहि, संत. ।
वचनाची काय कथा? जोडिति सद्यश अनंत मतिमंत. ॥ ९०

[2]पहिलें, तों आम्हां जड जीवांसि तुम्हांचि संतरायांचें ।
चरणस्मरण सदोषध, बुधसंमत, संपदंतरायांचें. ॥ ९१

मी केवळ मूढचि, कीं देव तुम्हांहूनि वेगळा म्हणणें, ।
तें हें तैसें, जैसें कूपातें [3]सुरसरित्तटीं खणणें. ॥ ९२

'[4]नह्यंमयानि' हा ये श्लोक, परि जसा [5]खरासि पाटीरें[6], ।
काळाची ही [7]कांपे, तुमची होतां उणी कृपा, टीरें[7]. ॥ ९३

[8]तुमचा वरप्रसाद ब्रह्मा, हरि, शंभु; देव यापरता ।
[9]सृष्टिस्थितिलयकर्ता नाहीं; [10]श्रद्धेय हें न [11]पापरता. ॥ ९४

सत्पदरजीं जसा जन, [12]गांगींहि न होय पट तसा [13]धुवट, ।
[14]यां भवसिंधूंत तुम्ही [15]प्रभुचे आधारभूत साधु वट. ॥ ९५

[16]क्षीरधि संतसमाधिहि शेषरुचि; प्रभुपदासमीप रमा ।

---

१. ही गीति **सुभाषित**मय असून, हींत **काव्यार्थापत्ति** व **काव्यलिंग** हे अलंकार आहेत. २. सार्थान्वयः—आम्हां जड जीवांस (=बुद्धिहीन जनांस) तों (=तर) तुम्हांचि संतरायांचें (=संतश्रेष्ठांचें) चरणस्मरण [हें] संपदंतरायांचें (=ज्ञान व मोक्ष या संपत्तीच्या आड येणाऱ्या विघ्नाचें) बुधसंमत (=ज्ञात्यांना आवडलेलें) पहिलें (=उत्तम) सदोषध (=रामबाण औषध) [होय]. "सत्संगाची देती तशि इतराची कधीं न तोख दया । दुःसह चिरकालामय भव, हा सत्संग होय ओखद या ॥" (सत्संगस्तव. ११.) ३. देवनदीच्या (=गंगेच्या) तीरावर. येथें **उपमा** आहे. ४. नह्यंमयानि तीर्थानि, न देवा मृच्छिलामयाः, । ते पुनंत्युरुकालेन, दर्शनादेव साधवः ॥—भागवत. ५. गाढवाला. ६. चंदन ७. टीर कांपे=कुला [भयानें] कांपे, तिरपीड उडे, भयानें गाळण होते. ८. हें **रूपक.** ९.विश्वाची उत्पत्ति, रक्षण व नाश करणारा. १०.विश्वसनीय. ११.पापांत गुंतलेल्यांस. १२.गंगाजळांत. हा **व्यतिरेक** आहे. १३. स्वच्छ. 'पदरजांत धुवट होणें' या कल्पनेंत **विभावना** आहे. १४. या भवसिंधूंत प्रभुचे (=प्रभुभक्त) तुम्ही साधु [दीन जनांचे] आधारभूत (आश्रय देणारे) वट (=वडाचे वृक्ष) [आहां]. हें **परंपरितरूपक** आहे. अर्थसादृश्यः—भाग्यें भेटे, असतां या भवसिंधूंत अटत, साधु वट, । होतो सच्चरणरजीं जन, दहनीं दिव्य पट, तसा धुवट. ॥—(साधुसत्कार १३). १५. येथें 'प्रभुची' हा पाठ अधिक सरळ होईल. 'या भवसिंधूंत आधारभूत वट, तुम्ही साधु प्रभुची (=केवळ ईश्वरच, ईश्वराहून अणुमात्र न्यून नाहीं). १६. अहो ! बाप ! शेषरुचि [शेषाची (=मुक्तीची, मोक्षाची) आवड ज्याला, (पक्षीं) शेषाची (=ज्यावर विष्णु शयन करितात त्या वासुकी सर्पाची) आवड ज्याला असा] संतसमाधि [हाच] क्षीरधि (=क्षीरसागर) [होय]; [आणि] प्रभुपदासमीप रमा (=रमेप्रमाणेंच जी) तुमची परमा कीर्ति [ती] मी दास कसि वाखाणूं? येथें

कसि वाखाणूं तुमची कीर्ति अहो! बाप! दास मी परमा? ॥ ९६
करुणेचें वतन तुम्ही, शांतीचें भाग्यवंत माहेर, ।
सुघनज्ञानरसाचे संत रवे मधुर आंत बाहेर. ॥ ९७
[1]स्मरभूतभूतवैद्य, [2]स्पर्शमणी सर्वपापिलोहाचे, ।
[3]ब्रह्मग्रह संत तुम्ही प्रणतजनाच्या [4]अनादिमोहाचे. ॥ ९८
सुरभि[5]स्वर्द्रुमचिंतामणि शिष्याचे दयानिधी पंत[6]; ।
[7]निजबिंब प्रतिबिंबा अमृतकराचे खरे तुम्ही संत. ॥ ९९
[8]साधुगुणग्राहकता, भूतीं सर्वत्र सर्वदा समता, ।
गुरुरीति वसे संतांपाशीं, हे उक्ति सर्वदासमता. ॥ १००
विमळ सफळ गुण तुमचे कां न सुधाधिक म्हणों? निवे दास ।
ज्यांच्या [9]श्रवणेंचि; असे अद्भुत, रुचले म्हणोनि वेदास. ॥ १०१
श्रीदत्तात्रेयातें, [10]तत्तुल्यांतें समस्त संतांतें, ।
साष्टांग नमन आहे, सांभाळा जी! [11]मयूरपंतातें. ॥ १०२

---

मूलक **परंपरितरूपक** आहे. क्षीरसमुद्रांतून लक्ष्मी उत्पन्न झाली व तिला विष्णुसां-
च्या लाभ झाला; त्याप्रमाणें संतांपासून सत्कीर्ति उत्पन्न झाली आहे व ती प्रभूला मान्य
तेव्हां तिची थोरवी काय वानावी?—हा या गीतींतील भावार्थ होय.

. स्मर(=मदन)रूपी भूताचे पंचाक्षरी. २. परीस. ३. ब्रम्हराक्षस, प्रबळ शत्रु, घातक.
निःसीम अज्ञानाचे. या गीतींत **परंपरितरूपक** आहे. ५. कामधेनु, कामवृक्ष व चिं-
ण. ही धेनु, वृक्ष, व रत्न लोकांचे इष्ट हेतु पुरवितात अशी कल्पना आहे. ६. पंतोजी.
अमृतकराचे प्रतिबिंबा (=अमृतकररूप प्रतिबिंबाला, चंद्ररूप प्रतिमेला) तुम्ही संत खरें
बिंब (=मूलबिंब, मूलरूप) [आहां]. अमृतकर [चंद्र] केवळ तुमचें प्रतिबिंब आहे, हा
. येथें **व्यंगव्यतिरेक** आहे. ८. सद्गुण जाणण्याची व ते घेण्याची शक्ति. ९. ऐ-
नेंच. येथें **व्यतिरेक** आहे. १०. दत्तात्रेयाइतकेच सदय व वंद्य असे जे त्यांस. ११. कवि
त, यास. गीति८७–१०२ यांत संतमहिमा सुरेख वर्णिला आहे. या संबंधानें ‘साधुस्तव’,
ास्तव,’ ‘साधुरीति,’ ‘साधुसत्कार,’ ‘सद्वर्णन,’ ‘महद्विज्ञापना,’ व ‘केकावली’ हीं स्फुट
पाहण्यासारखीं आहेत. या प्रकरणांतून अर्थसादृश्याचे नमुने अगणित आढळून येतील.
तुत प्रकरण वरील प्रकरणांच्या तोलाचें असून, हें पंतांनीं उतार वयांतच लिहिलें असावें,
अनुमान करितां येतें.

# ११ सप्तशती.[1]

(गीतिवृत्त.)

## प्रथम चरित.

### अध्याय पहिला.

श्रीमान् चैत्रकुलोद्भव[2] सुरथ स्वारोचिषांतरीं[3] होता; ।
तो सार्वभौम पोषी आत्मयशा, हंसखग[4] जसा पोतां[5]. ॥ १
औरस[6] पुत्रासि जसा तात, तसा तो प्रजांसि परिपाळी, ।
दैवें धांवी[7] लागे कुंदशेची त्या तशाहि परि[8] पाळी[9]! ॥ २
रिपु कोलांविध्वंसी[10], ते होउनि हीनबळहि[11] एकवट, ।
भंगिति; परसैन्यार्णव[12], वाटे तद्देश[13] त्यांत एक वट. ॥ ३
आक्रमिला[14] त्या अरिंनीं जेथें[15] तो सुरथ, वेढिलें पुर तें, ।
क्रूरत्व प्रकट असें केलें दैवें तया नृपीं पुरतें! ॥ ४
दुर्बळ होता, फिरतां विधि, हरिलें कोशबळ[16] अमात्यांहीं; ।
पतिकुदशा[17] दुष्टांहीं, जे तस्कर इच्छिजे अमा[18] त्यांहीं. ॥ ५
स्वामित्व सेवकांहीं हरितां, अश्वीं चढोनि एकाकी[19] ।
मृगयामिषें निघे, कीं श्रीहंसी[20] स्पष्ट होय ते कोकी[21]. ॥ ६
नृप आश्रमासि गेला, जेथ वसे मूर्त योग[22] मेधा, त्या; ।

---

१. हें प्रकरण पंतांनीं मार्कंडेय पुराणांतून घेतलेलें आहे. यांत देवीच्या अवतारांचें वर्णन आहे. २. चैत्रकुळांत जन्मलेला. ३. स्वारोचिष मन्वंतरांत. ४. हंसपक्षी. ५. बालकास, पिल्यास. ६. स्वतःच्या. ७. दुर्दशेची. ८. परंतु. या गीतींत **विषमालंकार** आहे. ९. पाळी देणें=फेरी मानणें, पत्करणें. १०. नामविशेष रिपु ११. दुर्बळ असूनही. १२. शत्रूंचें अपार सैन्य हाच समुद्र. १३. सुरथाचा देश. या गीतीचा अन्वय–ते हीनबळही कोलाविध्वंसी रिपु एकवट होउनि भंगिति (पराभव करिती); परसैन्यार्णव त्यांत तद्देश एक वट वाटे. १४. गांठलेला, ग्रासलेला. याचें विशेष्य 'सुरथ.' १५. ज्या पुरांत. १६. भांडारगृह व सैन्य. १७. धन्याची दुर्दशा. १८. अमावास्या. या गीतींत पूर्वार्धांत विशेष गोष्ट सांगून, उत्तरार्धांत प्रथम सामान्य व पुन्हा विशेष गोष्ट सांगितली असल्यामुळें **विकस्वर अलंकार** आहे. १९. एकटा. २०. राज्यलक्ष्मीरूपी हंसी. २१. कावळी. २२. प्रत्यक्ष योग, परम योगी.

[1]ज्ञानतपःसामर्थ्येंकरुनि स्वसमान जो गमे [2]धाता. ॥ ७
मेधा बहु सत्कारी; गहनवनीं आश्रमीं वसे [3]साधी, ।
जरि तो सुरथ श्रीमुनिचरण [4]श्रितकल्पतरुतसे [5]साधी. ॥ ८
त्या आश्रमीं फिरे तो, चित्तीं चिंता करी, म्हणे, "हाय! ।
न कळे, [6]मत्पूर्वजपरिपाळितपुरगति असे कसी काय? ॥ ९
[7]दुर्वृत्त भृत्य माझे; पावावें स्वास्थ्य काय [8]मन्नगरें? ।
झालें मजही राज्य त्याज्य [9]खलजनें, जसेंच अन्न [10]गरें. ॥ १०
सगुण, [11]सदामद, माझा हस्ती, जो मुख्य [12]संगरसहाय, ।
कैसा असेल? न कळे; मज त्याचा [13]म्हणवि [13]संगरस '[13]हाय!' ॥ ११
मत्सचिव करित असतिल [14]अनुवृत्ति मदीय[15]शत्रुभूपाची, ।
हाय! कसी आवडली सेवा [16]मानसखगांसि कूपाची? ॥ १२
[17]कोश क्षय पावेलचि, जो अतिकष्टें जपोनि सांचविला, ।
म्यां, आपणासि समयीं कार्या येइल, म्हणोनि वांचविला. ॥ १३
नित्य बहु [18]व्यय करितिल, त्यांचें ठावें असे जना शील[19], ।
[20]सम्यग्व्ययस्वभाव न जो, तो [21]निधि [22]नवहि कां न नाशील?" ॥ १४
[23]ममताकृष्टमति नृपति चिंता नानाविधा असी वाहे; ।
तों एका वैश्यातें भ्रमतां त्या आश्रमींच तो पाहे. ॥ १५
त्यासि पुसे तो नृप 'तूं कोण? दिससि [24]दुर्मना सशोक मला, ।
येथें कां आलासि? [25]स्वजनगृहवियोग [26]कार्य कां गमला? ॥ १६
वैश्य म्हणे, 'धनिक[27] कुलज मी वैश्य असें समाधि या नांवें, ।

---

१. ज्ञान व तप यांच्या बळानें. २. ब्रह्मदेवास. ३. स+आधि=चिंताक्रांत. ४. आश्रितांना वृक्षासारखे. ५. मिळवी. ६. माझ्या पूर्वजांनीं पाळिलेल्या नगराची अवस्था. ७. दुराचारी. माझ्या पुरानें. ९. दुष्ट लोकांमुळें. १०. विषानें. ११. गंडस्थळांतून सदोदित मद स्रवतो . १२. युद्धांत साहाय्यकर्ता. १३. सहवासप्रेम [विरहामुळें] रडवितें. १४. सेवा. १५. माझा जो राजा त्याची. १६. मानस सरोवरावर वास करणाऱ्या पक्षांस, हंसांस. **वस्तुप्रतिवस्तूपमा अलंकार.** १७. खजिना. १८. खर्च १९. स्वभाव. २०. शिस्तवार खर्च करण्याचा स्वभाव ज्याचा. २१. द्रव्याचे खजिने. २२. नऊ. त्यांचीं नावें—महापद्म, पद्म, शंख, , कच्छप, मुकुंद, कुंद, नील, खर्व. **अर्थान्तरन्यास.** २३. ममतेनें आकर्षिली आहे ज्याची. २४. दुःखग्रस्त, कष्टी. २५. आप्त व घर यांचा विरह. २६. करण्यास योग्य. . श्रीमंत व कुलीन.

१७
आलों वनासि दु:खें, स्वमुखें काय स्वदैन्य वानावें[1]? ॥
सर्वस्व हरुनि मजला स्त्रीपुत्रांहीं वनासि पाठविलें; ।
केलें म्यां परिपालन जें कांहीं, तें तिंहीं न आठविलें? ॥ १८
स्त्रीपुत्रस्वजनांची कुशलाकुशल[2] प्रवृत्ति[3] मी नेणें, ।
या आश्रमासि बापा! अतिदु:खित जाहलों असें तेणें.' ॥ १९
भूप म्हणे, 'केलें ज्या लुब्धांहीं[4], त्यजुनि धर्म, अत्याग[5], ।
त्यांच्याही स्नेहाचा कां रुचला[6] त्वन्मनासि[7] अत्याग[8]?' ॥ २०
'काय करूं? हृदय नव्हे निष्ठुर, येतें' म्हणे समाधि, 'रडें, ।
जरि लाजे त्वद्वाक्शरविद्धा[9] या चालनीसमा[10] धिरडें[11]. ॥ २१
मज गांजिलें निजांनीं[12], अरिनीं भंगोनि[13] जेविं गांजीवें[14]; ।
न कळे, प्रेमें[15], सुतस्त्रीस्वजनातें त्यजुनि, हें[15] न[15] कां[15] जीवें[15].' ॥ २२
ऐसें बहु वैश्य वदे, त्या समदु:खासह स्वयें राजा ।
जाउनि मेध्यासि नमी, प्रणतांच्या[16] सिद्ध[17] जो सदा काजा. ॥ २३
भूप म्हणे, "गुरुजी! जें कांहीं पुसतों, द्रवोनि सांगा तें, ।
गेलें राज्य, तरिहि मन 'माझें, माझें,' म्हणोनि कां गातें[18]? ॥ २४
युक्तचि अज्ञानाचें विषयीं असतें सदैव हें बा! जें; ।
जाणें मी दोष, तरिहि गतराज्यपदीं ममत्व कां माझें? ॥ २५
सुतदारांनीं[19] लुटिला, तच्चिंताकुळ[20] सदा परि समाधी ।
हा वैश्यहि, मीहि पहा, दोघे आम्ही महीवरि समाधी[21]. ॥ २६
ज्ञान्यासहि मोह असा कां आहे? काय हें? वदा, स्वामी! ।
आम्ही दोघे आलों शरण, पुरे अर्थिकाम[22] या धामीं[23].' ॥ २७

---

१. पा० भे०—सांगावें. **विषमालंकार.** २. बरी वाईट. ३. वर्तमान. ४. द्रव्यलोभ्यांनीं. ५. मोठा अपराध. ६. आवडला. ७. तुझ्या मनाला. ८. स्वीकार, न टाकणें. ९. तुझ्या वाणीरूप बाणांनीं टोचलेल्या. १०. चाळणीसारखें. ११. एक प्रकारचें छिद्रयुक्त पक्वान्न. या गीतीचा अन्वय—समाधि म्हणे, जरि त्वद्वाक्शरविद्धा या चालनीसमा [हृद्रयाला] धिरडें लाजे [तरी] रडें येतें, हृदय निष्ठुर नव्हे, काय करूं? उत्तरार्धांत **प्रतीपालंकार.** सर्व गीतींत **विशेषोक्ति** अलंकार. १२. आप्तांनीं. १३. मोड करून. १४. अन्य पाठ—माजावें. १५. या प्रेमानें कां जाऊं नये, हें प्रेम कां नाहींसें होऊं नये. १६. नम्रांच्या. १७. तयार. १८. या उत्तरार्धांत **विशेषोक्तिलंकार.** १९. मुलांबायकांनीं. २०. त्यांच्या काळजीनें व्याकुळ. २१. समदु:खी. २२. याचकांच्या इच्छा. पाठभेद.—अर्थकाम. **काव्यलिंगालंकार.** २३. आश्रमीं.

**मे**धा मुनिराज म्हणे, '**दे**वी श्री**वि**ष्णुची **म**हामाया, ।
बा! या संसाराची स्थितिकर्त्री[1], तत्प्रभाव हा राया! ॥ २८
ज्ञात्याचेंही ओढुनि करि मोहाच्या अधीन[2] हे मन गा! ।
उडविल, चाळविल[3] नृपा! त्याहि, चलन[4] ज्या कधीं न हे मनगा[5]. २९
हे विश्वहेतु[6] देवी **जगदं**बा, बंधहेतु[7] हेचि, नृपा! ।
जीवांतें मुक्त करी जी विद्या[8] काय, ती इचीच कृपा.' ॥ ३०
**सु**रथ म्हणे, 'मुनिनाथा! जीतें म्हणतोसि तूं **म**हामाया, ।
झाली उत्पन्न कसी? कर्म तिचें काय? सांग हें बा! यां[9].' ॥ ३१
**मे**धा म्हणे, 'कराया देवांची सर्वकामनापूर्ती[10], ।
प्रकटे, तेंचि[11] उपजणें, परि बा! नित्याचि ती जगन्मूर्ती[12]. ॥ ३२
एकार्णव[13] करुनि अखिल जग, **ज**गदीश्वर **फ**णींद्रतनुतल्पीं[14] ।
भजला स्वयोगनिद्रेप्रति[15] पति सकळाहि शक्तिचा कल्पीं[16]. ॥ ३३
प्रभुकर्णमळापासुनि[17] **म**धुकैटभ असुर जन्मले दोघे, ।
ते खाया येती, तैं भय भगवन्नाभिपद्मभव[18] तो घे. ॥ ३४
असुर स्ववधोद्यत[19], निजजनक **प्र**भुहि प्रसुप्त पाहोनी, ।
चतुरास्य[20] योगनिद्रास्तुति[21] करि नाभ्यंबुजींच[22] राहोनी. ॥ ३५
**द्रु**हिण[23] म्हणे, "**पर**मेश्वरि! तूं स्वाहा, तूं स्वधा, सुधा, शांती, ।
श्री**सा**वित्री, सृष्टि[24], स्थिति[25], संहृति[26], तुष्टि[27], पुष्टि[28], धी[29], क्षांती[30]. ॥ ३६
सृष्टिस्थितिलयकरही[31] केले निद्रेसि वश तुवां व्यक्त, ।
**स**र्वेश्वरेश्वरि[32]! तुतें आहे कोण स्तवावया शक्त? ॥ ३७

---

. अस्तित्वांत आणणारी. २. ताब्यांत. ३. 'नाचविल' हा अन्य पाठ. ४. हालचाल. ५. मे-
ास. ६. विश्वाचें कारण. ७. बंधनाचें कारण. ८. या अर्धाचा अन्वय—जी काय
जीवांतें मुक्त करी, ती इचीच कृपा [होय]. ९. मला, सुरथाला. १०. सर्व इच्छांची
. ११. तें प्रकट होणेंच. १२. विश्वरूप मूर्ती. १३. एकच जलमय. **'जग' 'जग**दीश'
**ाटानुप्रासालंकार.** १४. शेषाच्या शरीररूप विछान्यावर. १५. आपल्या योगनिद्रेस.
कल्पाच्या वेळीं, प्रलयान्तीं. अन्वय—अखिल जग एकार्णव करुनि, कल्पीं सकळाहि शक्तिचा
जगदीश्वर फणींद्रतनुतल्पीं स्वयोगनिद्रेप्रति भजला. १७. श्रीविष्णूच्या कानांतील मळापासून.
विष्णूच्या नाभिकमलापासून ज्याची उत्पत्ति आहे असा ब्रह्मदेव. १९. आपला वध करण्यास
. २०. ब्रह्मदेव. २१. योगनिद्रेची स्तुति. २२. नाभिकमळांतच. २३. ब्रह्मदेव. २४. उत्पत्ति.
रक्षण. २६. संहार. २७. संतोष. २८. पुष्टपणा. २९. बुद्धि. ३०. क्षमा.
ब्रह्मदेव, विष्णु व शंकर हेही. ३२. सर्व श्रेष्ठांत श्रेष्ठ !

हरि, हर, विधि, ऐशांही कोणाहि तुझी न वर्णवे लीला, ।
त्रिभुवन अवलंबुनि तुज, जैसें फळ, पुष्प, पर्ण, वेलीला. ॥ ३८
भगवति! करुनि दया त्वां मधुकैटभ असुर शीघ्र मोहावे, ।
म्हणसि जसी तूं, न म्हणे सुरभी[1], 'इष्टार्थ[2] सर्व दोहावे[3].' ॥ ३९
मद्वधकाम[4] असुर हे मधुकैटभ खळ करावया चूर्ण ।
प्रभुला प्रबोध[5] द्यावा त्वां जगदीश्वरि! दयानिधे! तूर्ण." ॥ ४०
ऐसी स्तविली भावें पद्मभवें[6] हस्तपद्म जोडूनी; ।
देवी निघे प्रभूत्तमनेत्रमुखादिस्थळांसि[7] सोडूनी. ॥ ४१
प्रकटे यापरि, दर्शन दे, ये कार्या, परासु[8] धात्यातें[9] ।
होऊं[10] न देचि; झाली देवी आर्या परा[11] सुधा त्यातें. ॥ ४२
प्रकटुनि म्हणे, भगवती, 'हूं, विधिस त्यजुनि, असुरभी[12]! जा, गे!' ।
त्या वत्सा तों चिंता, जों निजेली[13] मायसुरभी[14] जागे[15]. ॥ ४३
श्रुतिगुरु[16] म्हणति, 'जयातें, न कळे, जडजीव हो! परि सजा[17], गा;' ।
करुणार्णव[18] दासहृदयलोहाचा[19] होय तो[20] परिसें जागा. ॥ ४४
मत्त[21] प्रभुतें देखति ते, कां भिडतील मग न बाहूंनीं[22]? ।
बाहूंनीं[23] रण करिती, भरिती क्रोधांधें[24] गगन[25] बा! 'हूं'नीं[26]. ॥ ४५
उत्साह नव्हेचि उणा, न म्हणे कोणीहि 'हाय' नवें[27] देहें, ।
श्रीमुनि[28] युद्ध प्रभुसीं तें पंचसहस्रहायन[29] वदे हें. ॥ ४६

---

१. कामधेनु. २. इच्छित पदार्थ. ३. प्राप्त करून घ्यावे. यांत **व्यतिरेकालंकार** आहे. ४. माझ्या वधाविषयीं आहे इच्छा ज्यास. याचें विशेष्य 'असुर.' ५. जागा करावा. ६. ब्रह्मदेवानें. ७. विष्णूचे डोळे, मुख इत्यादि स्थानांस. ८. मृत. ९. ब्रह्मदेवाला. १०. अन्यपाठ–होउनि देती. ११. श्रेष्ठ. १२. राक्षसांचे भीति! या अर्धाचा अन्वय–भगवति प्रकटुनि म्हणे, गे! असुरभी! हूं, विधिस त्यजुनि जा. १३. झोंपीं गेलेली. १४. आई हीच कामधेनू. १५. जागी होते. १६. वेद व गुरु. १७. तयार व्हा. १८. दयासागर. १९. भक्तहृदयरूप लोखंडाचा. २०. विष्णु. या गीतीचा अन्वय–श्रुतिगुरु म्हणती 'जडजीव हो! सजा [व] न कळे परि जयातें गा', तो दासहृदयलोहाचा परिस करुणार्णव जागा होय. २१. माजलेले. २२. बोलावून. २३. हातांनीं. २४. क्रोधानें आंधळे झालेले. २५. आकाश. २६. हुंकारांनीं. २७. नवीन, पूर्वी कधींही न उच्चारलेलें [हाय]. २८. मार्कंडेय. २९. पांच हजार वर्षें. या अर्धाचा अन्वय–श्रीमुनि वेद, तें हें युद्ध प्रभुशीं (विष्णूशीं) पंच सहस्रहायन [झालें].

यत्पदरजासि[1] लाजति चिंतामणि, कामधेनु, परमाग[2], ।
त्या माये मोहितें[3] ते म्हणती, 'झालोंच तुष्ट, वर माग.' ॥ ४७
भगवान् म्हणे, 'असुर हो! देतां होउनि सुतुष्ट आजि वर, ।
व्हा वध्य, काय अन्यें[4]? वरिला म्यां इष्ट हाचि आजिवर[5].' ॥ ४८
ते वंचित असुर म्हणति, 'जेथें उदकें परिप्लुता[6] न मही, ।
तेथें आम्हांसि वधीं, हो विजयी तूंचि समपराक्रमही[7].' ॥ ४९
ऐसें असुर ठकविले घालिति त्या ईश्वरेश्वरा[8] कोडें, ।
इतरांसि समुद्र, परी प्रभुला गोष्पदतसेंचि[9] तें[10] थोडें. ॥ ५०
केले हरिनें, अरिनें[11] ते तोडुनि मस्तकासि, असुरहित[12]; ।
न सुरहि तद्धतिभाजन[13]; केलें वंचुनिहि फार असुरहित[14]. ॥ ५१
ब्रह्म्यानें संस्तविली ती पूर्वीं प्रकटली असी देवी; ।
परिस प्रभाव अणिकहि, अमृतरसा तेविं रसिक या सेवी. ॥ ५२
यावरि महिषासुरवध, मग शुंभनिशुंभवधहि, आयकवी; ।
ती वर्षाश्री[15] भेटे, न करिल, निश्चय करूनि, काय कवी? ॥ ५३
गत राज्य सुरथ पावे, होय मनुहि, तदभिधान[16] सावर्णी, ।
जगदीश्वरीप्रभाव श्रीमार्कंडेयमुनि असा वर्णी. ॥ ५४
होय समाधिहि युक्त श्रीजगदंबेसि भजुनि सुज्ञानें, ।
व्हावें कृतकृत्य श्रीहरिमायेतेंहि त्यजुनि सुज्ञानें[17]. ॥ ५५
प्रथमचरित्र मयूरें लिहिलें हें किमपि[18] सुरसिकां गाया; ।
अमृतप्राशनकामा[19] सकरुण कवि म्हणति, 'झुरसि कां? गा! या.' ॥ ५६

१. जिच्या पायधुळीस. २. परम+अग=श्रेष्ठ+वृक्ष=कल्पवृक्ष. **प्रतीप.** ३. विष्णूच्या मोहिनीनें ामविलेले. ४. दुसऱ्या वरानें. ५. समरभूमीवर, लढाईंत, रणांत. ६. पूर्णपणें व्यापलेली. ७. आाच्या बरोबरीचाच पराक्रमी असूनही. ८. विष्णूस. ९. गाईच्या पावलाएवढ्या डबक्यासारखेंच. १०. कोडें. ११. चक्रानें. 'रिने' याच्या आवृत्तीमुळें **यमक.** १२. प्राणहीन. १३. त्या राक्षसास नेळालेल्या गतीस पात्र. अन्य पाठ—असुर हितहि हतिभाजन. १४. राक्षसांचें कल्याण. १५. वर्षाऋतूंतील शोभा, विपुल जलसंपत्ति. १६. त्याचें नांव. १७. ज्ञात्यानें. १८. थोडेंसें. १९. अमृतप्राशनाची इच्छा आहे ज्यास त्याला. या अर्धाचा अन्वय—सकरुण कवि अमृतप्राशनकामा म्हणति, गा! झुरसी कां? या.' येथें 'झुरसि' एकवचनी असून, 'या' अनेकवचनी आहे. ही रचना जरा अव्यवस्थितच होय. 'या' म्हणजे 'यासाठीं, अमृतलाभासाठीं' असा अर्थ घेतल्यास, ही अडचण दूर होईल.

माया तुझी, मुकुंदा! पावो तच्चरित वर्णिलें तुज, तें ।
रुजतें[1] तुजमाजी, स्थिति करितें[2], तैसेंहि शेवटीं बुजतें[3]. ॥ ५७

---

### द्वितीय चरित्र.

---

### अध्याय पहिला.

श्रीमद्विष्णुप्रभुची नमिली वरदा[4] असी महामाया, ।
ब्रह्मांडशतांत जिचा योग्य न महिमा असीम[5] हा माया[6]. ॥ १
देवांचा शक्र अधिप, असुरांचा महिष, करिति हे कलहा, ।
शतवर्षांतीं पावुनि परिभव, शतमन्युचें[7] म्हणे बल[8] 'हा[9].' ॥ २
झाला इंद्र स्वबळें समरीं पावोनि सैरिभ[10] यशातें. ।
शक्रप्रमुख[11] सुरांचीं[11] विलया[12] ने[12] उग्र[13] वैरिभय[14] शातें[15]. ॥ ३
सुर कथिति दुःख विधितें; तो त्यांसह जाय हरिहरांजवळ, ।
यच्चरणांहीं केला[16] शरणागतजनविपत्तिचा[17] कवळ[16]. ॥ ४
ते कथिति 'इंद्र झाला महिष, हरुनियां सुराधिकारा[18] हो! ।
प्रभुजी! असुरीं न श्री[19] बहुमोहकरी सुराधिका[19] राहो. ॥ ५
लोकत्रयपति झाला, बहु मोठ्यां[20] महिष तो कपोळाचा, ।
विधिचाहि करितसे अधिकार, न शक्रादि लोकपाळांचा. ॥ ६
आलों शरण तुह्मां, कीं भवदितर[21] न यश, उपाय चिंतुनि, घे, ।
तुमच्याचि दयेनें नतहृदयींचा[22] क्षिप्र[23] सर्व किंतु[24] निघे.' ॥ ७

---

१. उत्पन्न होतें. २. पुष्ट होतें. ३. लय पावतें. या गीतीचा अन्वय—मुकुंदा! [ही] तुझी माया, [ग्यां] वर्णिलें तच्चरित तुज पावो; तें तुजमाजी रुजतें, स्थिति करितें, तैसेंहि शेवटीं बुजतें. ४. वर देणारी. ५. अमर्याद. ६. मावण्यास. उत्तरार्धांत **अधिकालंकार**. ७. इंद्राचें. ८. सैन्य. ९. हाय. १०. महिषासुर. ११. इंद्र इत्यादि देवांचीं. १२. नाश करी. १३. मोठें. १४. शत्रु महिषासुर त्याचें भय. १५. सुखें. हें 'शात' (=सुख) या शब्दाचें अनेकवचन. या गीतीचा अन्वय—सैरिभ स्वबळें समरीं यशातें पावोनी इंद्र झाला; उग्र वैरिभय शक्रप्रमुख सुरांचीं शातें विलया ने. १६. नाश केला. १७. शरण आलेल्या लोकांच्या संकटाचा. १८. देवांच्या अधिकाराला. १९. दारूपेक्षांही अधिक मादक अशी लक्ष्मी. २०. मोठ्या नशीबाचा, सुदैवी, फार दैवशाली. पाठभेद.—मोठा. २१. तुम्हांवेगळा दुसरा कोणीही. या अर्धाचा अन्वय—तुम्हां शरण आलों, कीं भवदितर, उपाय चिंतुनि, यश न घे. २२. नम्र झालेल्याच्या अंतःकरणांतील. २३. लवकर. २४. दुःख.

सुरदीनोक्तिश्रवणें[1] हरिहरहृदयांत कोप ये राजा! ।
प्रभु साहतिल कशा श्रितजनकुदशा[2]? सोसती न येरां[3] ज्या. ॥ ८
प्रभुवरहरिहरवदनें[4] झालीं सुरपरिभवें भ्रुकुटिकुटिलें[5], ।
कीं महिषतस्करें[6] यशसर्वस्व[7] हरुनि बळें स्वबळ[8] कुटिलें[9]. ॥ ९
प्रकुपित हरिहरशतधृति[10] जे[11], या[11] सुरनायकाननांतून[12] ।
सुमहातेज[13] निघालें, दहनाचें[14] काय काननांतून. ॥ १०
शक्रादि सुरांच्याही देहांतुनि दिव्य तेज बाहेर ।
तैसेंचि निघे, जें शुचि कीर्तीचें भाग्यवंत माहेर. ॥ ११
तें एकवटे, त्याची होय हराया सुरारिमद[15] नारी, ।
तीतें पाहुनि, 'जय, जय,' वदले विधिविष्णुवृत्रमदनारी[16]. ॥ १२
तीचें मुख हरतेजें, यमतेजें केश मस्तकीं झाले, ।
हरितेजें भुज, ज्यांच्या सज्जन सेवुनि यशोमृता धाले. ॥ १३
स्तनयुग्म[17] सोमतेजें[18], मध्यहि[19] ऐंद्रें[20]करूनियां होय; ।
तत्तेजें जंघोरू[21], ज्यांच्या[22] स्वाधीन सर्वही तोय. ॥ १४
गुरुतर[23] नितंब[24] भौमें[25]; ब्रह्मयाच्या दिव्य चरण तेजानें; ।
तें सौरें[26], शोभति करुनि रक्तांगुलिदशक[27] चरण ते ज्यानें. ॥ १५

---

१. देवांचें दीन भाषण ऐकून. २. आश्रित लोकांची दुर्दशा. ३. दुसऱ्यास, सामान्यास. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. ४. प्रभुश्रेष्ठ विष्णु व शिव यांचीं तोंडें. ५. क्रोधानें ज्यांच्या भोंवया वांकड्या झाल्या आहेत अशीं. याचें विशेष्य 'प्रभुवरहरिहरवदनें.' या गीतींत ध्वनि व अर्थ यांची फार मनोरम सांगड घातलेली आहे. ६. महिषासुररूपी चोरानें. यांत **रूपकालंकार** आहे. ७. यश हेंच द्रव्य. येथें छंदसुखार्थ विसर्गलोप केला आहे. ८. आपलें सैन्य. ९. अन्य पाठ 'लुटिलें.' १०. विष्णु, शिव व ब्रह्मदेव. ११. 'जो' व 'हा' या सर्वनामांची जोड पंत वारंवार घाल-तात. १२. देवश्रेष्ठांच्या मुखांतून. १३. मोठें तेज. १४. अग्नीचें. या अर्धांत **उत्प्रेक्षा-लंकार.** या गीतीचा अन्वय—जे प्रकुपित हरिहरशतधृति, या सुरनायकाननांतून सुमहातेज निघालें; [जणूं] काय दहनाचें [तेज] काननांतून [निघालें]. १५. देवशत्रु महिषासुराचा गर्व. १६. ब्रह्मदेव, विष्णु, वृत्रशत्रु इंद्र व मदनशत्रु शिव. १७. दोन्ही स्तन. १८. चंद्राच्या तेजानें. १९. कटिही. २०. इंद्राच्या तेजानें. २१. जंघा व मांड्या. २२. ज्या वरुणाच्या. या अर्धांत **पर्यायोक्ति** आहे. वरुण असें न म्हणतां, 'ज्याच्या स्वाधीन सर्वही तोय' असें म्हटलें आहे. २३. लठ्ठ, पुष्ट. २४. कटिपश्चाद्भाग, ढुंगण. २५. मंगलाच्या तेजानें. २६. सूर्याचें [तेज]. २७. तांबड्या बोटांची दसकडी ज्यांस आहे, असे पाय. या अर्धाचा अन्वयार्थ—ज्यानें करुनि (जेणें करून) रक्तांगुलिदशक चरण शोभति, तें सौर तेज [होय]. भावार्थ—सूर्याच्या तेजानें चरण अरुणांगुलि झाले.

हस्तांगुलि[1] वसुतेजें; जीसम[2] अवयव न आन, नासा[3] जे, ।
झाली[4] कुबेरतेजें ते, बहु शोभवुनि आनना,[5] साजे.[6] ॥ १६
प्राजापत्यें[7] झाले[8] रुचिनें[9] लाजविति अमृतरस दंत, ।
पावकतेजें[10] नयनत्रय,[11] होय, करावयासि असदंत.[12] ॥ १७
भ्रूयुग[13] संध्यातेजें; मारुततेजेंकरूनि[14] कर्ण, 'न हो' ।
जे ह्मणति, 'श्रितदुःखश्रवण,[15] सदा तत्सुकीर्तिवर्णन[16] हो!' ॥ १८
यापरि पावे तेजें अन्य सुरांच्याहि संभवा,[17] राया! ।
जीचें क्षम[18] यश पंका,[19] गंगेचें जेविं अंभ,[20] वाराया. ॥ १९
जें धरित्याच्या अरिला न स्वप्नामाजिही शिवें[21] शिवे,[22] तें ।
निजशूलप्रभव,[23] विजयमूल,[24] अतुल, शूल दे शिव शिवेतें.[25] ॥ २०
प्राणव्यसनीं[26] जेणें गजवर[27] रक्षूनि, निवटिला नक्र, ।
त्या निजचक्रापासुनि निर्मुनियां, चक्रपाणि दे चक्र. ॥ २१
त्या भगवतीस भावें गोक्षीरधवल[28] जलेश[29] दरवर[30] दे; ।
प्रार्थुनि म्हणे, 'अरीचा बाधो धावा न लेश दर[31] वरदे[32]'. ॥ २२
दहनहि[33] दे शक्ति[34] तिला,[34] जी तेजेंकरुनि लाज[35] दे वीजे; ।
विनवुनि[36] म्हणे, 'तुझे ते, वांच्छील पदार्थ आज देवी जे.' ॥ २३
दे दिव्य चाप मारुत, शरपूर्ण तसेच देव तो भाते; ।

---

१. हातांचीं बोटें. २. दुसरा. **असमालंकार** आहे. ३. नाक. ४. झालेली, बनलेली. ५. मुखास. ६. शोभे. ७. ब्रह्मदेवाच्या [तेजानें.] ८. बनलेले. ९. [शुभ्र] कांतीनें. या अर्थात **प्रतीपालंकार** आहे. अमृताचा रंग पांढरा आहे, असा कविसंकेत आहे. १०. अग्नितेजानें. ११. तीन डोळे. १२. दुष्टांचा नाश. १३. दोन्ही भोंवया. १४. वायूच्या तेजानें. १५. आश्रितांचें दुःख ऐकणें. १६. त्या आश्रितांच्या सुयशाचें वर्णन. या गीतीचा अन्वय–संध्यातेजें भ्रूयुग [झालें]; जे [कर्ण] म्हणति, 'हो! श्रितदुःखश्रवण न हो, सदा तत्सुकीर्तिवर्णन हो (=व्हावें),' ते कर्ण मारुततेजेंकरूनि झाले. १७. उत्पत्तीस. १८. समर्थ. १९. पातकास [पक्षीं] चिखलास. **श्लेषालंकार.** २०. जल. २१. कल्याण. २२. स्पर्शे. २३. आपल्या शूळापासून ज्याची उत्पत्ति आहे असें. २४. विजयाचें मूळ. २५. भवानीला. या गीतींत 'शूल' शब्द नपुंसकलिंगी योजिला आहे. २६. प्राणसंकटांत. २७. गजेंद्र. २८. गाईंच्या दुधाप्रमाणें शुभ्र. २९. वरुण. ३०. उत्तम शंख. ३१. भय. ३२. उदार देवीला. ३३. अग्नि. ३४. पाठभेद–शक्तीला. ३५. या अर्थात **प्रतीपालंकार** आहे. ३६. अन्वयः–[दहन शक्तीला] निववुनि म्हणे, 'आज देवी जे पदार्थ वांछील, ते (पदार्थ) तुझे (तुझ्या स्वाधीन आहेत); [तरी तिला कसलीही वाण पडूं न द्यावी]. पाठभेदः–देवि न म्हणें, 'तुझे ते, वांछीत पदार्थ आज देवी जे.' ।

स्वीकारितां **शि**वेनें, बहु धाले, पावलेचि शोभा ते. ॥ २४
[1]प्रतिपक्षकरिघटेला ज्याचा, 'दूरूनि [2]भावि,' [3]वास वदे, ।
त्या स्वगजाची घंटा, [4]निजवज्रोत्पन्न वज्र, [5]**वा**सव दे. ॥ २५
**य**मधर्म **का**ळदंडापासुनि दे दंड, **व**रुण पाशातें, ।
जे [6]आपणासि [7]दुर्जय दुर्जन, त्या [8]सर्वशत्रुनाशातें. ॥ २६
माळा **प्र**जापतीही दे त्या जग**दं**बिकेसि [9]अक्षांची, ।
[10]**ब्र**ह्मार्पित सुकमंडलु घे राज्ञी [11]दुष्टदमनदक्षांची. ॥ २७
निजकिरणांतें स्थापी **भा**नु तिच्या [12]सर्वरोमकूपांत; ।
दे [13]खड्ग चर्म **का**ळ, क्षय व्हाया [14]देवशत्रुभूपांत. ॥ २८
[15]**क्षी**रोदधि दे [16]अजरें वस्त्रें, तैसाचि [17]अमल हार, तिला; ।
म्हणवी, '[18]रुचिनें जिंकुनि, बहु जीचें वदनकमल '[19]हां' **र**तिला. ॥ २९
जो देव **वि**श्वकर्मा, त्या चतुरें [20]दिव्यं वस्तुंच्या घटकें, ।
दिधलीं चूडामणिसह [21]सुमणिकनकखचित कुंडलें, [22]कटकें. ॥ ३०
[23]धवलार्धचंद्रकंठाभरण [24]चरणबाहुभूषणें दे [25]हीं, ।
[26]मणिमुद्रिकाहि; [27]आनखशिख भावेंकरुनि भूषवी देहा. ॥ ३१
विमल परशु, [28]विविधास्त्रें, तैसेंचि कवच अभेद्य, देवीतें, ।
जीचें [29]कृपानिरीक्षण [30]अत्यद्भुतसर्वसंपदे [31]वीतें. ॥ ३२
[32]अम्लानपद्ममाळा दे **सिं**[33]धु उरीं, शिरीं, धरायास, ।
तो आपणासि [34]दुस्तरजाड्यांभोधींत उद्धरायास. ॥ ३३

---

१. शत्रूरूप हत्तिसमुदायास. २. पहा, बघ. ३. मदाचा गंध. ४. आपल्या वज्रापासून उत्पन्न झालेलें. ५. इंद्र. ६. यमवरुणादि देवांस. ७. जिंकण्यास कठीण. **यमकालंकार.** ८. सर्व शत्रूंच्या नाशासाठीं. ९. रुद्राक्षांची. १०. ब्रह्मदेवानें दिलेलें. ११. दुष्टांचा नाश करण्याविषयीं चतुर अशांची राणी (पुढारीण). १२. सर्व केशरंध्रांत. अन्य पाठ 'सर्व रोमकूपातें.' १३. तरवार व ढाल. १४. राक्षसराजांत. अन्य पाठ—देवशत्रुभूपातें. १५. क्षीरसमुद्र. १६. जीर्ण न होणारीं. १७. मळरहित. १८. कांतीनें. १९. हाय हाय. **प्रतीपालंकार.** २०. उत्तम वस्तु घडविणारानें. २१. उत्तम रत्नें व सोनें यांनीं जडलेलीं. २२. गोट, कडीं. २३. स्वच्छ व अर्धचंद्रासारखें कंठांतील भूषण, चंद्रहार. २४. पाय व हस्त यांत घालावयाचे अलंकार. **यमकालंकार.** २५. विश्वकर्मा. २६. रत्नखचित आंगठ्या. २७. नखांपासून केशापर्यंत. २८. निरनिराळीं अस्त्रें. २९. कृपादृष्टि. ३०. अलौकिक अशा सर्व संपत्तीला. ३१. प्रसवतें. ३२. प्रफुल्लित कमलांची माळ. ३३. समुद्र. ३४. तरण्यास कठिण अशा जाड्यरूप (जलरूप [पक्षीं] अज्ञानरूप) समुद्रास. या गीतीचा अन्वय—तो सिंधु आपणासि दुस्तरजाड्यांभोधींत उद्धरायास, [तिला] अम्लान पद्ममाळा उरीं (=वक्षस्थळावर) [व] शिरीं (=मस्तकीं) धरावयास दे.

रत्नें देउनि, दिधला मृगराज बसावया हि[1]मनगानें, ।
जाया जाड्य, यशाच्या चरणींच वसावयाहि मन गानें. ॥ ३४
दे [2]पानपात्र धनपति, वीर्यो[3]त्साहें वधावया अरितें, ।
न रितें व्हावें तिळहि, प्राशन केलें क्षणक्षणीं, तरि तें.[4] ॥ ३५
अर्पी, परमप्रेमें पूजुनि, [5]सविशेष नागहार तितें, ।
[6]भूभारासुरशमनें मागे कवि शेष नाग हा [7]रतितें. ॥ ३६
अन्य त्रि[8]दशांनींही सर्व[9]स्वविभूषणायुधांनीं ती ।
सन्मानिली बहुमता, जैसी [10]प्राणाधिका बुधां नीती. ॥ ३७
मग [11]साट्टहास वारंवार शिवा गर्जना करी, राजा ! ।
म्यां किति वर्णाव्या त्या? बहु कांपविती वि[12]राट्शरीरा ज्या. ॥ ३८
त्या सिं[13]हवाहिनीतें 'जय,' ऐसें सर्व देवता म्हणती. ।
स्तविती मुनिवर, करिती, बहु [14]भक्तिविनम्र होउनि, [15]प्रणती. ॥ ३९
ऐकोनि '[16]आः ! किमेतत्[17] ?' कुपित खळ म्हणे, ससैन्य तो धांवे, ।
आले, सर्व न लगती [18]दीपद्युतिला पतंग शोधावे. ॥ ४०
महिषासुरें भगवती, धांउनि येऊनि, देखिली हो ! ती. ।
[19]सुरविभवचित्रकारें जी [20]गगनपटांत [21]रेखिली होती. ॥ ४१
जीनें श्री[22]चरणांहीं करितां आक्रमण, भूमिका लवली; ।
गगनीं जिच्या किरीटें [23]सग्रहनक्षत्रराजि [24]कालवली; ॥ ४२

---

१. हिमालयपर्वतानें. या गीतीचा अन्वयः—जाड्य (शीतत्व, थंडपणा; [पक्षीं] मंदपणा, अज्ञान) जाया [व] यशाच्या गानें मन चरणींच वसावयाहि, हिमनगानें रत्नें देउनि [तिला] मृगराज बसावया दिधला. २. मद्य पिण्याचें भांडें. ३. पराक्रमाच्या उल्हासानें. ४. पानपात्र. 'प्राशन करणें' हें कारण असून 'रितें होणें' हें कार्य होत नाहीं, म्हणून **विशेषोक्ति अलंकार.** ५. अलौकिक. ६. पृथ्वीस भार झालेल्या महिषासुराच्या वधानें. ७. सुखानें, प्रीतीतें. असुरवधानें पृथ्वीधारण करणाऱ्या शेषाच्या डोक्यावरील ओझें कमी होणार, हें उघडच आहे. ८. देवांनींही. ९. आपलीं सर्व भूषणें व शस्त्रें यांनीं. १०. प्राणांहून अधिक प्रिय. ११. मोठ्यानें आरोळी ठोकून. १२. सर्व सृष्टीचें उपादानकारण जो ईश्वर त्याच्या शरीरास, विश्वाला. या अर्थांत **काव्यार्थापपत्ति अलंकार** आहे. १३. सिंह आहे वाहन जीचें तीस. १४. भक्तीनें नम्र. १५. नमस्कार. १६. क्रोधार्थी अव्यय. १७. काय हें. १८. दिव्याच्या ज्योतीला. या गीतींत वस्तु**प्रतिवस्तूपमा** आहे. १९. देवांच्या वैभवरूप चितारानें. २०. आकाशरूपी वस्त्रावर. २१. लिहिली. या अर्थांत **रूपकालंकार** आहे. २२. पूज्य व सुंदर चरणांनीं. २३. ग्रहांसुद्धां नक्षत्रांची पंक्ति. २४. लोपवून टाकिली, अस्पष्ट केली; किंवा घाबरवून सोडिली, कासावीस केली.

जीच्या [1]बाहुसहस्रें व्यापुनि [2]दिक्‌चक्र सर्व शोभविलें; ।
क्षोभविलें चापरवें [3]कांड, यशें [4]देववृंदें लोभविलें. ॥ ४३
मग त्या श्रीदुर्गेशीं [5]असुरभटांशीं प्रवर्तलें युद्ध; ।
होय [6]दिगंतर [7]शस्त्रास्त्रविदीपित ज्यांत, [8]तें असें युद्ध. ॥ ४४
[9]**म**हिषासुरसेनानी [10]**चि**क्षुरनामा महासुर, तसाच ।
[10]**चा**मर [11]चतुरंगबळें [11]युक्त [12]रणमखीं [13]महा [14]सुरतें साच. ॥ ४५
तैसाच **ई**श्वरीशीं [15]षडयुतरथयुत [16]उदग्र युद्ध करी, ।
परि तो आला, व्हाया **दे**वी[17]शरनिकरसिंहरुद्ध [18]करी. ॥ ४६
असुर [19]**म**हाहनुहि करी समर [20]रथायुतसहस्र आणून, ।
[19]**अ**सिलोमा [21]रथपंचाशन्नियुतयुत, स्वविजय जाणून. ॥ ४७
[19]**बा**ष्कळहि, निजजयाचीं श्रवण करित [22]बंदिगणमुखें गाणीं, ।
रथ एक कोटि, षट्‌शत अयुतें गजहय, असेचि बहु आणी. ॥ ४८
[23]पंचाशत्कोटिमितस्यंदनपरिवृत सुरारि मत्त महा ।
वीर **बि**[24]डालाख्य करी **दु**र्गेशीं युद्ध [25]असुरसत्तम हा. ॥ ४९
[26]रथगजहयपरिवृत सुररिपु अन्यहि [27]अयुतसंख्य जे क्रूर, ।
ते **चंडमुंडशोणितबी**जादिक करिति रण महाशूर. ॥ ५०
तुरग परार्ध, परार्ध स्यंदन, गजही परार्ध, [28]यापरि तें ।
निजबळ आणी समरीं, पाडाया, तो [29]लुलाय [29]पापि, रितें. ॥ ५१
करिते झाले, सोडुनि शस्त्रास्त्रें [30]स्वैर, असुर समरा या, ।

---

१. हजार हातांनीं. २. दिशांचें मंडळ, सर्व दिशा. ३. ब्रह्मांड. ४. देवसमुदाय. ५. राक्षसयोध्यांशीं. ६. दिशांमधील अवकाश. ७. शस्त्रें व अस्त्रें यांनीं उजळ झालेलें. ८. युद्ध. ९. महिषासुराचा सेनापति. १०. नामविशेष दैत्य. ११. गजदळ, रथदळ, घोडदळ व पायदळ, अशा चार प्रकारच्या सैन्यानें युक्त. १२. युद्धरूप यज्ञांत. १३. आनंदार्थ, उत्सवासाठीं. १४. गढलेला. १५. साठ हजार रथांनीं युक्त. 'युत' याची आवृत्ति झाल्यामुळें **यमक.** १६. नामविशेष राक्षस. १७. देवीच्या बाणसमुदायरूप सिंहानें आडविलेला. १८. हत्ती. **रूपकालंकार.** १९. असुरविशेष. २०. दहा दहा हजार रथांच्या हजार टोळ्या. २१. पञ्चाशन्नियुत=पन्नास लक्ष. २२. भाटांच्या समुदायाच्या मुखानें. २३. पन्नास कोटी रथांनीं वेष्टिलेला. २४. बिडाल नांवाचा दैत्य. पाठभेदः—बिडालाक्ष. २५. राक्षसश्रेष्ठ. पाठभेदः—असुर सत्य महा. २६. रथ, हत्ती व घोडे यांनीं वेष्टिलेला. २७. दहा हजार ज्यांची संख्या आहे असे. या गीतींचा अन्वय—अन्यहि जे रथगजहयपरिवृत अयुतसंख्य क्रूर सुररिपु ते महाशूर चंडमुंडशोणितबीजादिक रण करिती. २८. अशा प्रकारचे. २९. पापी महिषासुर. ३०. अप्रतिबंध.

त्यजुनि भजन[1] सुरस[1], कुमति[2] ते प्याले वैर[3] असुरस[3] मराया. ॥ ५२
तोमर, मुद्गर, मुसल, प्रास, परशु, पट्टिशासि[4], शर, शक्ति, ।
परशस्त्रें[5] निजशस्त्रें खंडी लीलेंकरूनि पर[6] शक्ति[6]. ॥ ५३
तम रविरुचितें[7], किंवा सद्विद्येतें महाघ[8] न शिवे, तें ।
तैसें त्या असुराचें शस्त्रपटळ[9] जितमहाघन[10] **शि**वेतें. ॥ ५४
तोहि **शि**वावाहन हरि[11] बहु कोपे, कंपवुनि सटा[12]; याला ।
साहे न, दवा[13] वनसें, सैन्य, कसें संपवु निसटायाला? ॥ ५५
जे सोडिले **शि**वेनें, संगर करितां, सुगंध निश्वास; ।
तेचि अमितगण[14] झाले रक्षाया, असुर वधुनि, विश्वास. ॥ ५६
करितील परनग[15]शिर[16]:शिखरीं ते अशनि[17] कां गण न टांचीं[18]? ।
वाढवि हर्ष तयांचा तें, प्रभुचें[19] जेविं आंगण नटांचा. ॥ ५७
कितिएक युद्ध करिती ते गण, वाद्यें कितीक वाजविती, ।
गाजविति ब्रह्मांड[20], ध्वांतहराच्या[21] करांसि लाजविती. ॥ ५८
**प**रमेश्वरी विदारी, जो त्यजि ना योध[22] आयुधा[23], त्यातें; ।
ते काय तीपुढें? जी देणारी बोध, आयु[24], **धा**[25]त्यातें. ॥ ५९
खड्गेंकरूनि तोडी अरिस फळसमान बा! धसाधस ती, ।
ज्यात्यास म्हणे चित्तीं, 'जा, लोक सुखें अबाध[26] साध[27],' **स**ती[28]. ॥ ६०
शूलें, चक्रें, वज्रें, करि परमारण[29] महागदाघातें[30], ।

---

१. भक्तिरूप अमृतरस. २. कुबुद्धि. ३. वैररूप विषरस. असुरस=अ+सु+रस. **रूपकालंकार.** ४. पट्टिश व तरवार. ५. शत्रूंचीं शस्त्रें. ६. श्रेष्ठ, अनादि, माया देवी. ७. सूर्याच्या तेजास. ८. मोठें पातक. ९. शस्त्रांचें आच्छादन. १०. [काळोखी पाडण्याच्या कामांत] जिंकले आहेत मोठे मेघ ज्यानें. याचें विशेष्य 'शस्त्रपटल.' ११. सिंह. १२. आयाळ. १३. वणव्याला. या गीतीचा अन्वय–तोहि शिवावाहन हरि सटा कांपवुनि बहु कोपे, दवा वनसें याला सैन्य न साहे, [मग तें] निसटायाला (=संकटांतून सुटून जाण्यास) [सिंहाला] कसें संपवु (=नाशील)? १४. अगणित अनुचर, असंख्य पार्षद. १५. शत्रुरूप पर्वताच्या मस्तकरूप शिखरावर. १६. परनगशिर=शिखर. १७. वज्र. या अर्धाचा अन्वय–ते (गण) परनगशिर:शिखरीं टांचा अशनि कां न करितील? १८. पायांच्या खोटा. १९. राजाचें. २०. विश्व. २१. सूर्याच्या. **प्रतीपालंकार.** २२. योद्धा. २३. शस्त्रास. २४. आयुष्य. २५. ब्रह्मदेवास. **काव्यार्थापपत्ति** अलंकार आहे. २६. अप्रतिबंध. २७. प्राप्त करून घे. देवीच्या हातून मेले, ते मोक्षपदाला गेले.–हा भाव. २८. देवी. २९. शत्रुक्षय. ३०. मोठी गदा मारून.

विश्वाच्या वाराया, वरि परमा[1] रणमहा, गदाघातें[2]. ॥ ६१
असुर वधुनि रणरंगीं, शोणिततटिनी[3] उदंड वाहविल्या, ।
त्यांत[4] खळचमू, त्यांतहि[5] नच कांहीं पापमतिहि राहविल्या. ॥ ६२
लावी सतत शरांचीं[6] घायास परा[7] शरासना[8] दानें, ।
खळ किति? निज घंटेच्या मोहितिच **परा**शरास नादानें. ॥ ६३
उगवी[9] महाभयतिमिरसागरपरपारदा दिनां[10]; कर्षी[11], ।
पाशें बांधोनि, असुर; बहु सुखवी **ना**रदादि नाकर्षी[12]. ॥ ६४
पाडी ढासळुनि विशिखवर्षें[13] ती घनघटा[14] कितेकांतें, ।
सल्लंघनें[15] घातक जरि नसतें, तरि अनघ[16] टाकिते कां तें? ॥ ६५
पाहति रणीं कराया त्या **दे**वीशीं बराबरि कबंध[17], ।
नाचति हर्षें, जाणों म्हणती, 'तुटला बरा बरिक[18] बंधें[19].' ॥ ६६
बाळभय हरुनि, ऐशी कोणीही हर्षली प्रसू[20] नाहीं, ।
त्या श्री**ज**गदंबेवरि सुरसंहति[21] वर्षली प्रसूनांहीं[22]. ॥ ६७
क्षणमात्रें सर्व **म**हिषसैन्य[23] **शि**वागणसमूहहरि[24] खरेंची[25], ।
घन जेविं **म**यूरमनीं, देवमनीं तो प्रताप हरिखें[26] रची. ॥ ६८

---

१. अत्यंत युद्धोत्साहाला. २. व्याधीला व पातकाला. या अर्धाचा अन्वय–विश्वाच्या गदाघातें वाराया, परमा रणमहा वरी. ३. रक्ताच्या नद्या. ४. रक्तनद्यांत. ५. खळचमूंत. या गीतीचा सार्थान्वय–[त्या देवीनें] रणरंगीं असुरवधुनि (=रणभूमीवर दैत्य मारून) शोणिततटिनी उदंड वाहविल्या (रक्ताच्या नद्या पुष्कळ वाहविल्या). [व] त्यांत खळचमू (=त्या नद्यांत दुष्टाचें सैन्य वाहविलें). [आणि] त्यांतहि (=त्या चमूंतही) कांहीं पापमतिहि नच राहविल्या (=त्या वाहणाऱ्या दुष्टांचे सैन्यांत थोडीही पापबुद्धि शिल्लक राहूं दिली नाहीं). घनघोर युद्ध झालें व असंख्य राक्षस देवीच्या हातून गतीस जाऊन पावन झाले.–हा भाव.' ६. बाणांचीं. ७. शत्रूस. ८. धनुष्यास. या गीतीचा अन्वय–[देवी] परा शरांचीं दानें सतत घायास, [शर] शरासना लावी; [ती] निजघंटेच्या नादानें पराशरास मोहितिच (खास देहभान विसरावयास लाविती), [मग] खळ किती? उत्तरार्धांत **काव्यार्थापत्तिअलंकार** आहे. ९. उत्पन्न करी. १०. महाभयरूप अंधकारमय समुद्राच्या दुसऱ्या तीरास पोंचविणाऱ्या दिवसाला. ११. ओढी. १२. देवर्षि. १३. बाणांच्या वर्षावानें. १४. मेघसमूह. घनघटा व देवी यांतील साधारण धर्म 'वर्षाव करणें' हा होय. १५. साधूंचें अतिक्रमण. १६. पवित्र लोक. या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. उत्तरार्ध **सुभाषित** आहे. १७. धडें. १८. मात्र. १९. संसाराचा व पापकर्मांचा गुंता. उत्तरार्धांत **उत्प्रेक्षालंकार** आहे. २०. माता. **असमालंकार** आहे. २१. देवसमुदाय. २२. पुष्पांनीं. २३. महिषासुराचें सैन्य, (पक्षीं) टोणग्यांचा कळप. २४. देवीच्या पार्षदांचा समुदाय हाच सिंह. २५. नाशी. २६. आनंद.

## अध्याय दुसरा.

**दे**वीवरि [१]बळनाशें धांवे कोपोनि म्हणत **चिक्षुर**, 'हा !' ।
जाणो [२]करेणुसि म्हणे '[३]भंगाचा [४]काम धरुनि' [५]इक्षु 'रहा' ॥ १
[६]**मे**रुशिरीं [७]तोयदसा, **दे**वीवरि तो [८]महेषुवृष्टि करी. ।
सिंहीतें माराया, वाटे, झटतो [९]मदांधदृष्टि [१०]करी. ॥ २
**दे**वी, ते शर तोडुनि, सोडुनि [११]निजे [१२]शत्रुकायहानिकर, ।
लीलेनेंचि अरिसि करि [१३]विरथ म्हणति देव, 'काय हा [१४]निकर !' ॥ ३
[१५]हयसारथिचापध्वजनाशें अत्यंत पाप तो खवळे, ।
[१६]अपराधकरीं जैसा, द्याया [१७]आशीस साप तोख, वळे. ॥ ४
तीव्रत्वें [१८]क्षुर **चिक्षुर** तो घेउनि [१९]खड्गचर्म नव धावे; ।
[२०]**दे**वी म्हणे, 'असे म्यां, न विलोकुनि शूरकर्म, न वधावे. ॥ ५
आधीं करी [२१]हरिशिरीं तो समरीं **चिक्षुर** प्रहारातें, ।
जरिही त्याला होता [२२]हो ! [२३]समरीचि [२४]क्षुरप्रहारातें. ॥ ६
मग जो [२५]वर तेजाचा, लावण्याचाहि, [२६]सव्य भुज [२७]गाभा, ।
खड्गेंकरूनि हाणी **चिक्षुर** त्या [२८]परमभव्यभुजगाभा. ॥ ७
**दे**वीबाहुस्पर्शें गेला तत्काळ उडुनि [२९]करवाल, ।

---

१. सैन्यनाशामुळें. २. हत्तिणीस. ३. नाशाचा. ४. इच्छा. ५. ऊस. या अर्धांत **उत्प्रेक्षालंकार** आहे. उसानें हत्तिणीला दवकावणें जसें आत्मविघातक होय, त्याप्रमाणेंच चिक्षुराचें देवीच्या अंगावर चालून जाणें होतें.—हा भाव. ६. मेरु पर्वताच्या शिखरावर. ७. मेघासारखा. ८. मोठ्या बाणांचा वर्षाव. ९. गर्वानें अंध झाले आहेत नेत्र ज्याचे. १०. हत्ती. या अर्धांत **उत्प्रेक्षालंकार** आहे. ११. आपले बाण. १२. शत्रूच्या देहाचा नाश करणारे. १३. रथहीन. १४. भयंकर युद्ध. १५. घोडे, सारथी, धनुष्य व पताका यांच्या नाशानें. १६. अपराध करणारावर. १७. दाढेला. या अर्धांचा अन्वय—जैसा आशीस तोख (=संतोष) द्याया, साप अपराधकरीं वळे. १८.वस्त्रा. १९.तरवार व ढाल. २०.या अर्धांचा सार्थान्वय—देवी म्हणे(=देवी म्हणाली), 'शूरकर्म न विलोकुनि असे (=शूराचें कर्म न बघतां असे चिक्षुरासारखे शूर योद्धे) म्यां न वधावे (=मीं मारूं नयेत). भावार्थ— देवी म्हणाली चिक्षुरासारख्या शूरांचें शूरपणाचें कर्म बघून, मग त्यांस मी मारावें. २१.सिंहाच्या मस्तकावर. २२.पाठभेदः—या. २३. सूर्याच्या प्रतिमेसह. २४. सुळ्यांच्या माळेला. देवीच्या सिंहाच्या मस्तकावर एक आच्छादन होतें. त्यावर सूर्यप्रतिमा असून सुळ्यांच्या रांगा होत्या. २५. श्रेष्ठ. २६. [देवीचा] डावा हात. २७. गर्भ, नार, साड. २८. मोठ्या सर्पासारख्या (हाताला). २९. तरवार.

तरुण[1] रवि ज्यांत लोपे, त्या तेजीं काय उडुनिकर[2] वाल[3]. ॥ ८
सोसे न तिची त्या, जसि काशीची नीच मद्रका[4] लीला, ।
क्षेपी शूल क्षोभें, लक्षुनि तो क्षुद्र भद्रकालीला. ॥ ९
अहिवरि गरुड, तसा ती त्यावरि निजशूल अंबिका धाडी,
ताडी त्या शूलातें, भस्म करुनि चिक्षुरासिही पाडी. ॥ १०
महिषचमूपति[5] मरतां, त्रिदशार्दन[6] मत्तसिंधुरारूढ[7] ।
चामर पामर[8] टाकी शक्ति महाशक्तिवरि महामूढ. ॥ ११
शक्ति पडे, कीं तीचा मद हुंकारेंचि चंडिका उतरी; ।
वाटे[9], मूर्च्छित पडली ती सिंहीनें दटाविली कुतरी ॥ १२
खंडी शूलहि दुर्गा, ज्यासि झुगारी अराति[10] चामर तो, ।
न वधी स्वयें तया, कीं सांपडतो मृगवरा[11] तिच्या[11], मरतो. ॥ १३
तों तो चढला अरिच्या हस्तिशिरीं सिंह उडुनि वेगानें, ।
ज्या[12] उदयनगाग्रगशशिसदृशाच्या[12] सर्व उडु[13] निवे गानें[12]. ॥ १४
असुरांची काळमुखीं, घाया भय परमनीं[14], चमू ढकली ।
जो हरि[15], करी तयाशीं तो चामर परम नीच मूढ कली. ॥ १५

---

१. मध्यान्हींचा सूर्य. २. नक्षत्रांचा समुदाय. ३. वालासारखा हलका. या अर्धाचा अन्वय–ज्यांत तरुण रवि लोपे, त्या तेजीं वाल उडुनिकर काय? भावार्थ–ज्या देवीच्या तेजांत मध्यान्हींचाही सूर्य लोपून जातो, त्यांत वालासारख्या हलक्या नक्षत्रसमूहाचा पाड काय? तो सहजच लोपून जाईल. **काव्यार्थापत्ति अलंकार.** ४. अपवित्र मद्रदेशवासीयाला. कर्णानें मद्रकांच्या देशाचें असें वर्णन केलेलें आढळतें:–मिथ्या भाषण, मित्रद्रोह, व्यभिचार, वैर आमरण । इत्यादि दोष पुष्कळ मद्रीं; झालें तुझ्या गुणें स्मरण. ॥ ३८ ॥ जे जे ब्रह्मद्वेषी, त्यांसि पराभव परोपरी घडती; । तैसेचि मद्रकांसीं संगत करितांचि नारकीं पडती. ॥ ३९ ॥ (मोरोपंती कर्णपर्व, अ० २७). "म्लेंच्छ मनुष्यांचा मळ, त्या म्लेंच्छांचा मळ स्वयें तेली; । त्या तेल्यांचा मळ ते, ज्यांची पुंप्रकृति संक्षया गेली; ॥ ३९ ॥ त्याचाहि राजयाचक मळ, त्याचा मद्र; मद्रकांचाही । मळ हो तुज." हें म्हणतां, लागलिया राक्षसास बहु दाही. ॥ ४० ॥ (कर्णपर्व, अ० २९). ५. महिषाचा सेनापति. ६. देवांस पीडा देणारा. ७. मदोन्मत्त हत्तीवर बसलेला. ८. नीच. ९. या अर्धांत **उत्प्रेक्षालंकार** आहे. १०. शत्रु. ११. देवीच्या सिंहास. १२. उदयपर्वताच्या शिखरावर गमन करणाऱ्या चंद्रासारख्या ज्या सिंहाच्या [कीर्तींच्या] गाण्यानें. १३. नक्षत्र. चंद्र हा नक्षत्रांचा राजा होय. तेव्हां चंद्रासारख्या भासणाऱ्या सिंहाची कीर्ति त्यांना आवडणें योग्यच आहे. १४. शत्रूच्या मनांत. अन्वय–जो हरि परमनीं भय घाया, असुरांची चमू काळमुखीं ढकली. १५. सिंह.

मेळविती सुभट यशें, करुनि तनुत्याग[1], ज्या वरुनि महितें[2], ।
भुजयुद्ध करित दोघे तें आले त्या गजावरुनि महितें[3] ॥ १६
हरि[4] शिरला द्रुत[5], कंदुक महिवरुनि उडुनि जसा नगीं शिरतो, ।
पुनरपि पडोनि, उडवी तत्काळचि त्या सुरारिचें[6] शिर तो. ॥ १७
वधिला वृक्षशिळांहीं **दु**र्गेनें तो **उ**दग्र समरांत, ।
जेणें तेज मिरविलें होतें हो ! तें असह्य अमरांत[7]. ॥ १८
मथिला **क**राळहि रणीं व्यापारूनि[8] स्वदंतमुष्टितळें[9]; ।
केलें सुयश, करावें जीवां द्यायासि जेविं तुष्टि, तळें. ॥ १९
कोपोनि उद्धतातें चूर्ण करी **ई**श्वरी गदापातें[10], ।
तें कुतुक देखत्यांचें बा! एकहि न लवलें तदा पातें[11]. ॥ २०
तैसेंचि भिंडिपाळें[12] रणरंगीं **बा**ष्कळासि ती निवटी, ।
जीची स्मृति न उरों दे दुःखासि पुढें, तमा जसी दिवटी. ॥ २१
चूर्ण करी बाणांहीं **ता**म्रासि, तसेंच **अं**धकालाही, ।
पक्षीश्वरदृष्टिपुढें[13] केवळ होतोचि अंध काळाही[14]. ॥ २२
**उ**ग्रास्य, **उ**ग्रवीर्य, त्रिदशांचा[15] रिपु **म**हाहनुहि तिसरा, ।
हे मारुनि त्रिशूलें, त्यांसि म्हणे 'पूर्वकुमतिला[16] विसरा. ॥ २३
त्याहि **बि**डालाक्षाचें केलें खड्गें शिरोब्जकर्तन[17], हो ! ।
कीं हर्षें **वि**धिहरिहर**लो**कपतिसभांत गान, नर्तन, हो[18]. ॥ २४
**दु**र्धर, **दु**र्मुखहि, रणीं बाणांहीं **य**मगृहासि पाठविले, ।
ज्यांचे अपकार सदा देवांहीं, 'हाय' म्हणुनि, आठविले. ॥ २५
बळनाशें[19] **म**हिषासुर खवळे, पापाग[20] मोह त्याला जो, ।

---

१. शरीराचा त्याग. २. पूज्य. याचें विशेष्य 'यशें.' या गीतीचा अन्वय—ज्या वरुनि (ज्या भुजयुद्धाचा अंगीकार करून) [व] तनुत्याग करुनि, सुभट महितें यशें मिळविती, तें भुजयुद्ध करित दोघे त्या गजावरुनि महितें आले. ३. जमिनीवर. ४. सिंह. ५. त्वरित. ६. दैत्याचें. ७. देवांत. ८. हाणून, लगावून. ९. आपले दांत, ठोसे व हाताचे तळवे. या गीतीचा अन्वय—स्वदंतमुष्टितळें व्यापारूनि कराळहि रणीं मथिला. जेविं जीवां तुष्टि द्यावया तळें करावें, [तेविं जीवां तुष्टि द्यावया] सुयश केलें. १०. गदेच्या टोल्यानें. ११. डोळेही लवण्यास विसरले. १२. गोफणीनें. १३. गरुडाच्या नजरेपुढें. १४. काळसर्प. या गीतींत **दृष्टांतालंकार** आहे. १५. देवांचा १६. पूर्वींच्या दुष्ट बुद्धीला देवीहस्तें मरून सर्व शुद्ध झाले, हा भाव. १७. मस्तकरूपी कमलाचें **छेदन.** १८. होवो. १९. सैन्याच्या नाशानें. २०. पापाचा पर्वत.

[1]तो कां न म्हणेल, 'निपट बाळ यमाचा गमो हल्या लाजो ?' ॥ २६
तो कोप आंत बाहिर, म्हणवाया त्रिभुवना '[2]अहह !' त्याला; ।
[3]गणबळ मर्दी, तेंव्हां [4]प्रळयांचे लाजले अह [5]हेल्याला. ॥ २७
किति गण [6]तुंडाघातें वधिले महिषासुरें रणीं रागें, ।
कितिक [7]खुरक्षेपांहीं, पद्म जसें मर्दिजे [8]महानागें. ॥ २८
पुच्छें किति लोळविले, किति शृंगांहीं विदारिले क्रूरें, ।
[9]निश्वासवेगनादभ्रमणांहीं कितिक नाशिले शूरें. ॥ २९
झालें [10]प्रमथबळपतन, सर्व सविस्तर न बोलवे गा ! तें; ।
धावे [11]हरिशि वधाया, [12]पवनाच्या करुनि फोलें वेगांतें. ॥ ३०
येतां निजसिंहावरि, पाहे कोपोनि अंबिका याला, ।
'झालेंचि' म्हणे 'याच्या मित्र[13] जल [14]तृणाग्रलंबि [15]कायाला.' ॥ ३१
तें महिष करी चेष्टित, करितो, सोडूनि सोय, रेडा जें; ।
सुर म्हणति, 'शेवटींचे सुखवाया गृध्र सोयरे [16]डांजें.' ॥ ३२
शृंगांहीं गिरि उडवी, वेग[17]भ्रमणेंचि भूमिला फाडी, ।
उसळोनि जलधि [18]बुडवी, तो पुच्छें त्यासि जेधवां ताडी. ॥ ३३
त्याच्या [19]शृंगाघातें बहु झाले खंड खंड, [20]घनं [21]झडले, ।

---

१. अन्वय–'यमाचा हल्या [माझ्या समोर] निपट (सर्वस्वीं, साफ) बाळ (=पोर, कमजोर, क्षुद्र) गमो [व] लाजो' [असें] तो कां न म्हणेल ? **प्रतीपालंकार.** २. हाय ! हाय ! ३. देवीच्या गणांचें सैन्य. ४. विश्वाच्या क्षयाचे दिवस. ५. महिषासुराला. **प्रतीपालंकार.** ६. मुस्कटाच्या आघातानें, मुसंडीनें. ७. लाथांनीं. ८. मोठ्या हत्तीनें. ९. सुस्काराचा वेग, रेंकणें व फिरणें यांनीं. १०. गणांच्या सैन्याचा नाश. पाठभेदः–प्रथम. ११. देवीच्या सिंहाला. १२. वायूच्या भरारीला मागें टाकून, वायुगतीपेक्षां अधिक वेगानें. **प्रतीपालंकार.** १३. सखा. १४. गवताच्या अग्रभागीं राहणारें. १५. शरीराला. या गीतीचा अन्वय–[हा महिषासुर] निज सिंहावरि येतां, अंबिका याला कोपोनि पाहे, [व] म्हणे, 'याच्या कायाला तृणाग्रलंबि जल मित्र झालेंचि.' भावार्थः–महिषासुर आपले सिंहावर चालून येत आहे असें पाहून अंबिका म्हणाली, 'गवताच्या अग्रभागावर राहणाऱ्या पाण्याप्रमाणें याचें शरीर पतन पावलेंच म्हणून समजावें.' **निदर्शनालंकार.** १६. पीडा दे. या पीडक कृत्यानें महिषाचा अंत होऊन, त्याचें मांस गिधाडांना मेजवानी होणार.–हा या अर्धाचा भाव. १७. आवेशानें फिरण्यानें. १८. याचें कर्म 'जग' हें अध्याहृत आहे. १९. शिंगांच्या ताडणानें. २०. घट्ट. २१. झिजले, बारीक झाले.

श्वासें उडोनि गगनीं गेले तृणसे, पुन्हा अचळ[1] पडले. ॥ ३४
यापरि खळ[2] मायांच्या[3] फुगला होता मनीं लुलाय[4] शतें[3], ।
किति वर्णावें ? कथितों जगदंबेचें नृपा! तुला यश तें. ॥ ३५
कोप करी, आंगावरि येतां पाहोनि चंडिका यातें, ।
कांपवि बांधुनि पाशें, प्रबळाही जेविं थंडि कायातें. ॥ ३६
तत्काळ, बद्ध होतां, असुरांचा भूप रूप तें सोडी, ।
हरि[5] होय तोंचि खड्गें त्या शत्रुशिरास ती सती तोडी. ॥ ३७
तों खड्गचर्मधर[6] तो होय पुरुष परम दक्ष[7] मायावी, ।
त्यासि शरांहीं मारी, नच हरितां परमद[8] क्षमा यावी. ॥ ३८
मग होय महागज तो, गर्जे, ओढी हरीस धरुनि करें[9], ।
कर तोडिला कृपाणें[10], जैसा रंभा[11]भिधानतरु, निकरें[12]. ॥ ३९
पुनरपि हितीं[13] गमे त्या दुर्मतिच्या[14] चाकराशि कासरता[15]. ।
दुसरा मागें, येतां अमरत्वाचा[16] करा[17] शिक्का[18], सरता ? ॥ ४०
त्रैलोक्य तसेंचि पुन्हा तो महिष क्षोभवून भीनोंच[19], ।
बहुधा म्हणे शिवा सुरमुनिस[20], 'कलह लोभवू, नभीं नाच.' ॥ ४१
कोपोनि जगन्माता, पान करी, अरुणलोचना[21] मग ती ।
हांसे पुनःपुन्हा, परभर[22] वारुनि, हर्षवावया जगती. ॥ ४२

---

१. न हालणोर. या गीतीचा सान्वयार्थ–त्याच्या शृंगाघातें (=महिषासुराच्या शिंगांच्या ताडनानें) बहु [पर्वत] खंड खंड झाले (=पुष्कळ पर्वतांचे तुकडे तुकडे झाले), घन झडले ( घट्ट व ठणक होते, ते झिजले), श्वासें उडोनि तृणसे गगनीं गेले(=श्वासानें उडून गवतासारखे आकाशांत गेले,)व पुन्हा अचळ पडले (=पुन्हा पृथ्वीवर चलनरहित पडले.) **अत्युक्तिअलंकार.** २.'बळमायांच्या' असा अन्य पाठ. ३. शेंकडो मायांच्या योगानें. ४. महिषासुर. ५. सिंह. ६. ढाल तरवार धारण करणारा. ७. चतुर. ८. शत्रूचा गर्व. यांत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. ९. सोंडेनें. १०. तरवारीनें. ११. केळ नांवाचा वृक्ष. १२. आवेशानें. १३. हितकारक. १४. दुष्ट बुद्धीच्या दासाला, दुष्ट बुद्धीनें वागणारास; महिषासुरास. १५. महिषरूपत्व. १६. अमरपणाचा. १७. हातास. १८. शिक्का, मुद्रा. या अर्धाचा अन्वय–[देवीहस्तें मरणें म्हणजे अमरत्व लाभणेंच होय. तेव्हां अशाप्रकारें] अमरत्वाचा शिका करा येतां (=अमरपणा आपणास मिळण्याचा योग आला असतां), दुसरा (महिषासुराशिवाय दुसरा कोणी असता, तर तो) मागें सरता (=परावृत्त झाला असता) [काय] ? १९. भ्याला नाहींच. २०. नारदास. या अर्धाचा अन्वय–शिवा बहुधा सुरमुनिस म्हणे, नभीं नाच, कलह [तुला] लोभवू. या अर्धांत **उत्प्रेक्षालंकार** आहे. २१. जिचे नेत्र आरक्त आहेत अशी. २२. शत्रुरूपी भार.

[१]बळवीर्यमदोद्धत तो असुरहि गर्जोनि शैल शृंगांनीं ।
उडवी तिजवरि, वरिलें जीचें पदपद्म साधुभृंगांनीं. ॥ ४३
परमेश्वरीहि सोडुनि [२]खरतरशरनिकर बहु तिंहीं, [३]तूर्ण ।
[४]द्वेषिप्रेषितपर्वत सर्व [५]तदुत्साहसह करी चूर्ण. ॥ ४४
कविसुरगंधर्व जिच्या [६]पदभक्तिप्राप्तपदनरा गाती, ।
[७]अस्पष्टाक्षर बोले [८]पानमदोद्धूतवदनरागा ती. ॥ ४५
"पीतें [९]मधु, तों मूढा ! गर्ज क्षणभरि, धरूनियां गर्वा; ।
म्यां तुज वधितां, येथें गर्जतिल [१०]क्षिप्रं देवता सर्वा." ॥ ४६
वदुनि असें, उडुनि चढे पृष्ठावरि, जरिहि तो महिष झाडी; ।
पादें आक्रमण करुनि, कंठी शूलेंकरूनि ती ताडी. ॥ ४७
झाली [११]त्रिभुवनसुखदा ते अति अद्भुत करूनि कर्म असी; ।
तों [१२]निजवदनापासुनि असुर निघाला, धरूनि [१३]चर्म, [१४]असी. ॥ ४८
[१५]अर्धविनिर्गत होतां, केला तो [१६]आद्यशक्तिनें रुद्ध, ।
[१७]शुद्धयशोर्थ तसाही श्रीदुर्गेशीं करी महायुद्ध. ॥ ४९
तेव्हां [१८]दिव्यकृपाणें मस्तकखंडन करूनि, [१९]असुरहित ।
तो महिष पाडला श्रीदेवीनें, जो सदैव [२०]असुरहित. ॥ ५०
ज्या ध्याया सुकविमनीं [२१]निर्दयपत्यंतकोपमा यावी, ।
वधिला देवीनें यापरि तो अत्यंतकोप मायावी. ॥ ५१
महिषवधें खळबळलें, वातें बहु जेविं तोय खळबळतें, ।
'हा! हा!' म्हणुनि [२२]पलायनपरचि [२३]निहतशेष होय [२४]खळबळ तें. ॥ ५२

---

१. बळ, शौर्य व गर्व यांनीं माजलेला. २. अधिक तीक्ष्ण असा बाणांचा समुदाय. ३. लवकर. ४. शत्रूनें फेंकलेला पर्वत. ५. शत्रूच्या आवेशासह. **सहोक्तिनामक अलंकार.** या गीतींत अनुप्रास, यमक व कठोर वर्ण यांची अगदीं गर्दी आहे व ती अर्थरसांस सर्वांशीं पोषक आहे. ६. चरणभक्तीनें मोक्षपद मिळालें आहे ज्यास अशा मनुष्यास. ७. अर्धवट शब्द. ८. मद्यप्राशनानें जिच्या तोंडाची लाली वाढली आहे अशी. ९. मद्य. १०. लवकर. ११. त्रिभुवनास सुख देणारी. १२. आपल्या महिषाकृति तोंडांतून. १३. ढाल. १४. तरवार. १५. अर्धा बाहेर आलेला. १६. शिवेनें. १७. पवित्र यशाकरितां. १८. उत्तम खड्गानें. १९. प्राणरहित. २०. दैत्यांचा हितकर्ता किंवा अ+सुरहित=देवांना कल्याणकारक नाहीं असा, देवशत्रु. २१. निर्दयांचा स्वामी जो यम त्याची उपमा. २२. पळण्याविषयीं तत्परच २३. मारून राहिलेलें. २४. दुष्ट महिषासुराचें सैन्य. या गीतीचा अन्वय—जेविं वातें तोय बहु खळबळतें, [तेविं] तें निहतशेष खळबळ महिषवधें खळबळलें [व] हा ! हा ! म्हणुनि पलायनपरचि होय.

सुरगण सकळ सबळखळमहिषवधें[1] जाहले परम हर्षी, ।
स्तविती जगदंबेतें नारदसनकादि जे पर[2] महर्षी. ॥ ५३
जे नटति[3] अप्सरोगण[4], ते मोरचि, गान तो अनघ[5] टहो[6], ।
निववी यशोमृतातें[7] वर्षुनि जी, ती शिवा घनघटा[8] हो! ॥ ५४

---

### तृतीय चरित्र.

## अध्याय पहिला.

श्रीविद्याबळमत्त[9] प्रभु[10] शुंभनिशुंभ जाहले होते, ।
शक्रादिलोकपाळांकरवींच[11] पदासि[12] लाहले[13] हो! ते. ॥ १
काळातेंहि न भीती जे, ते भीतील दैत्य कां पवितें[14]? ।
तद्बळ[15] सुरांसि कांपवि, जेविं दरिद्रासि शैत्य कांपवितें. ॥ २
तीतें शक्रादिसुर स्तविती, जाउनि तदा हिमनगातें[16], ।
जीच्या वात्सल्यातें सर्व सुकविंचें सदाहि मन गातें. ॥ ३
सुरजन करीत होता केवळ दीनां जनांसम स्तवन, ।
तद्रचितस्तवनादें[17] नादमयचि होय तें समस्त वन. ॥ ४
तों त्या स्थानीं गौरी ये गंगातोयमज्जन कराया, ।
जी त्या हिमालयातें म्हणते, 'हा[18] होय मज्जनक[19];' राया! ॥ ५
जी म्हणते, 'निजदासाहुनि[20] सुरभीचा[21] न वत्स[22] भासुर[23] हो.' ।
ती त्यांसि पुसे, 'करिती कोणाचा स्तव भवत्सभा[24]? सुर हो! ॥ ६
तों तच्छरीरकोशापासुनि[25] सहसा निघे शिवा, मग ती, ।
'स्तवुनि मज,' म्हणे 'केलें शुंभनिशुंभादिशत्रुनीं अगती[26].' ॥ ७

---

१. सैन्यासह दुष्ट महिषासुराच्या नाशानें. २. मोठे. ३. नाचती. ४. अप्सरांचे समूह. ५. शुद्ध. ६. मोरांचा शब्द. ७. कीर्तिरूप अमृतास. ८. मेघसमूह. या गीतींत **परंपरितरूपक** आहे. ९. संपत्ति, विद्या व बळ यांनीं माजलेले. १०. राजे. ११. इंद्रादिक अष्ट लोकपाळांकडून. १२. उच्च स्थानास. १३. पावले. १४. वज्राला. या अर्धांत **काव्यार्थापत्ति अलंकार** आहे. १५. त्या शुंभनिशुंभांचें सैन्य. १६. हिमालय पर्वतातें. १७. त्या देवांनीं केलेल्या स्तुतीच्या नादानें. पूर्वार्धांत **विषमालंकार** आहे. १८. हिमालय. अन्यपाठ–'हो.' १९. माझा बाप. २०. आपल्या भक्ताहून. २१. कामधेनूचा. २२. वासरूं, बालक. २३. तेजस्वी, **व्यतिरेकालंकार**. २४. तुमची सभा. २५. तिच्या देहापासून. २६. गतिहीन, निरुपाय.

झाली शरीरकोशापासुनि यास्तवचि **कौशिकी** नामें, ।
तद्दर्शनींच आलीं, जीं न्हतीं, तीं सुरव्रजीं[1] धामें[2]. ॥ ८
निघतांचि **शिवा**, झाली कृष्णा[3], जी तप्तकांचनच्छवि[4], ती; ।
**गौरीस** 'कालिका' हें ठेवुनि अभिधान[5] यास्तव[6] स्तविती. ॥ ९
होती हिमाचलीं[7] श्रीजगदंबा परमसुंदरी तीतें, ।
खळ **चंडमुंड** देखति, जे वश सुंदोपसुंदरीतीतें[8]. ॥ १०
ते दुष्ट भृत्य[9] तेथुनि जाऊनि, कुशीलमद्यकुंभातें[10] ।
स्वस्वामीतें भेटुनि, ऐसें प्रार्थूनि वदति **शुंभातें**. ॥ ११
"सुमनोहराकृति[11], महाराजा ! आम्हीं विलोकिली महिला[12], ।
शोभविती निरुपम[13]निजदेहद्युतिनें हिमाद्रिच्या महिला[14]. ॥ १२
उत्तम रूप तसें तों कोणीं कोठें न देखिलें होतें, ।
जाणों[15], न करें, **विधिनें** चतुरें चित्तेंचि रेखिलें हो ! तें. ॥ १३
ती कोण स्त्री ? प्रभुनें शीघ्र निपुण[16], शोध करुनि, जाणावी, ।
देखावी स्वामीनें, ध्यावी, निजमंदिरासि आणावी. ॥ १४
देवा! देहद्युतिनें[17] ती युवति दिशा दहाहि शोभविते, ।
जसि चंद्रिका[18] चकोरा, तसि, जो प्रेक्षक, तयासि लोभविते. ॥ १५
**रत्नें**, मणि, गज, वाजी, जे जे उत्तम पदार्थ लोकांत[19], ।
ते ते सर्वहि सांप्रत शोभति **शुंभा**! तुझ्याचि ओकांत[20]. ॥ १६
**ऐरावत** गजरत्न[21], द्रुमरत्नहि[22] **पारिजात**[23], हयरत्न[24] ।
**उच्चैःश्रवाहि**[25], **शक्रापासुनि** त्वां आणिला, करुनि यत्न. ॥ १७
जें अत्यद्भुत, दिव्य, **ब्रह्म्याचें**, हंसयुक्त, अजि ! राया ! ।
तुझिया विमानरत्नहि सेवितसे सर्वकाळ अजिरीं[26] या. ॥ १८

---

१. देवसमुदायांत. २. तेजें. ३. काळी. अन्यपाठ—कृष्णाजिनविघ्न कांचनच्छविती. ४. तापलेल्या सोन्यासारखी जिची कांति अशी. ५. नांव. ६. पाठभेद—यास्तवें. ७. हिमालयपर्वतावर. ८. सुंद व उपसुंद या राक्षसांच्या रीतीला. (मोरोपंती आदिपर्व अ० ३७, गीति ७–२५ पहा.) ९. सेवक. १०. दुष्ट स्वभावरूप मद्याच्या कुंभास (सांठ्यास). ११. मन हरण करून घेण्यासारखी आहे आकृति जिची. १२. स्त्री. १३. अतुल अशा आपल्या देहाच्या कांतीनें. १४. भूमीला. १५. या अर्धांत **उत्प्रेक्षालंकार** आहे. याचा अन्वय—हो ! जाणों तें (=रूप) चतुरें विधिनें करें न [रेखिलें, तर] चित्तेंचि रेखिलें. १६. कुशल. याचें विशेष्य 'प्रभुनें.' १७. शरीराच्या कांतीनें. १८. चांदणें. १९. तिन्ही लोकांत. २०. गृहांत. २१. उत्तम हत्ती. २२. वृक्षश्रेष्ठहि. २३. कल्पवृक्ष. २४. उत्तम घोडा. २५. नामविशेष घोडा. २६. अंगणास.

निधिमुख्य महापद्महि धनदापासूनि आणिला आहे; ।
तुजला दिली समुद्रें माला अम्लानपंकजा बा ! हे. ॥ १९
वारुण कनकस्रावी छत्र तुझ्या मंदिरीं असे स्वामी ! ।
पूर्वी प्रजापतीचा जो रथवर, तोहि या असे धामीं. ॥ २०
त्वां मृत्युशक्ति हरिली, जीचें उत्क्रांतिदा असे नाम, ।
कोणा अर्थाविषयीं सफळ न झाला प्रभो ! तुझा काम ? ॥ २१
पाश सलिलराजाचा तव अनुजाच्या परिग्रहीं, धन्या ! ।
ज्या ज्या समुद्रजाता, त्या त्या सद्रत्नजातिही अन्या, ॥ २२
तैशींच अग्निशौचें दहनेंही तुज दिलीं प्रभो ! वस्त्रें, ।
यापरि सकळें रत्नें, त्वां प्रभुनें स्पष्ट जोडिलीं शस्त्रें. ॥ २३
मग रत्नभुग्वरें त्वां ऐसें स्त्रीरत्न कां न जोडावें ? ।
या लाभाकरितां तों कुशलें सर्वस्व तुच्छ सोडावें." ॥ २४
खळभृत्यकथित कुमत श्रवण करुनि, दुष्टमतिसुराकुंभ ।
न करुनि विचार कांहीं निज दूतातें असें म्हणे शुंभ. ॥ २५
"सुग्रीवा ! शीघ्र करीं; जेणें वश होय रत्नभूता, तें," ।
सांगे मदांध जैसा वेताळ सुधासियत्न भूतातें. ॥ २६
'कासार असे समुचित, तो तव संगम सुरापगे ! लाहो,' ।
ऐसें म्हणावया त्या परम शिवेप्रति सुराप गेला हो ! ॥ २७
दूत म्हणे, "देवि ! जसा जलनिधिपानें प्रसिद्ध कुंभज या ।
त्रैलोक्यांत, तसाचि प्रख्यात असे करूनि शुंभ जया. ॥ २८

---

१. नवनिधींत मुख्य निधि महापद्म. (मागें, प्रथमचरित अ० १ गी० १४ वरील टीप पहा.) २. कुबेरापासून. ३. सदोदित विकसित असणाऱ्या कमलांची. ४. वरुणाचें. ५. सोनें उत्पन्न करणारें. ६. घरीं. ७. यमाचें अस्त्र. ८. उन्नति–उदय व भराभराट–देणारी. ९. पदार्थाविषयीं. १०. इच्छा. ११. वरुणाचा. १२. लहान भावाच्या. १३. संग्रहीं. १४. [समुद्रमंथनसमयीं] समुद्रापासून उत्पन्न झालेल्या. १५. चांगल्या रत्नांचे प्रकार. २२ व २३ या गीतींचें युग्म आहे. १६. अग्नीनें शुद्ध केलेलीं. १७. अग्नीनें. १८. रत्नांच्या भोक्त्यांत श्रेष्ठ जो तूं त्या त्वां. १९. उत्तम स्त्री. २०. इतर सर्व प्रकारची आपली मालमत्ता कवडीमोल समजून फेंकून द्यावी, खर्ची घालावी. २१. दुष्ट सेवकानें सांगितलेलें. २२. पापबुद्धिरूपी दारूचा घडा (असा शुंभ). मागें गीति ११ पहा. २३. रत्न झालेली, सुंदर. २४. तें युक्तिप्रयोजन, तो उपाय. २५. अमृत मिळविण्याचा यत्न. अन्यपाठ–सुधादियत्न. २६. तळें. २७. गंगे ! २८. मद्यपी. २९. समुद्रप्राशनानें.

जो [1]अहताज्ञ सुरांत, स्वजना बहु देतसे [2]मह [3]हंतारी, ।
असुरां प्रताप ज्याचा व्यसनीं, म्हणउनि [4]पैरा 'अहह!', तारी. ॥ २९
दैत्येश्वर, परमेश्वर, माझ्या वदनेंकरूनि आपण तो, ।
श्रवण करावें त्वां तें, देवि! [5]त्वदनुग्रहार्थ जें म्हणतो, ॥ ३०
'त्रैलोक्य सकळ माझें, मजला झाले समस्त सुर वश, तें ।
यश ऐकिलें जगें, जें विश्रुत [6]गंधर्वराजसुरवशतें. ॥ ३१
इंद्रादिदेवता मी, सेवितसें सर्वयज्ञभागांतें, ।
माझा प्रताप दुःसह [7]अहितांतें, गरुड जेविं नागांतें. ॥ ३२
लोकत्रयांत रत्नें जीं जीं ऐरावतादि गजरत्नें ।
होतीं ज्यांचीं, त्यांहीं आणुनि मज तीं समर्पिलीं यत्नें. ॥ ३३
[8]क्षीरधिमथनोद्भव जो नामें उच्चैःश्रवा यशें सजला, ।
[9]हरिवाहन, [10]हरिरत्न, [11]प्रणतसुरांहीं समर्पिला मजला. ॥ ३४
जीं रत्नें देवांचीं, गंधर्वांचीं, तशींच नागांचीं, ।
तीं झालीं प्राप्त मला, व्हावींच फळें जशीं स्वयागांचीं. ॥ ३५
स्त्रीरत्न मानितों [12]तुजे, लोकीं मी रत्नमात्र सेवितसें, ।
ये मज कडेचि, आलें [13]रत्नांतर [14]निजैश्वर्यशोर्थ देवि! तसें. ॥ ३६
स्त्रीरत्न म्हणुनि भज तूं मज करित्या शत्रुहानि शुंभातें, ।
कीं [15]गुरुपराक्रमा या [16]मत्तुल्या [17]मदनुजा निशुंभातें. ॥ ३७
तूं [18]मत्परिग्रहास्तव परमैश्वर्यासि पात्र होशील. ।
व्हायासि मत्परिग्रह, तुजवरिच तुझें प्रसन्न हो [19]शील'." ॥ ३८
[20]दुर्जनदूतोक्त असें ऐके, ऐकों नये कधीं, परि तें, ।

---

१. ज्याची आज्ञा अबाधित आहे असा. २. आनंद. ३. ज्यानें शत्रू मारिले आहेत असा. ४. शत्रूस. २९,३० गीतींचें युग्म आहे. ५. तुझ्यावर कृपा करण्याकरितां. या गीतीचा अन्वय— देवि! दैत्येश्वर, परमेश्वर, तो आपण माझ्या वदनेंकरूनि त्वदनुग्रहार्थ जें म्हणतो, तें त्वां श्रवण करावें. ६. गंधर्वराजाच्या शेंकडो सुस्वर संगीतांनीं. ७. शत्रूंस. ८. क्षीरसमुद्राच्या मंथनापासून ज्याची उत्पत्ति आहे असा. ९. इंद्राचें वाहन. १०. उत्तम घोडा. ११. नम्र देवांनीं. १२. प्रथमार्धांतील पहिल्या व दुसऱ्या चरणांत कार्यकारणभाव असल्यामुळें **काव्यलिंगालकार.** १३. दुसरीं रत्नें. १४. आपल्या स्वतःलाच मोठेपणा मिळावा म्हणून. १५. जो मोठा पराक्रमी त्यास. याचें विशेष्य 'निशुंभातें.' १६. माझ्यासारख्या. १७. माझ्या धाकट्या भावास. १८. माझी स्त्री झाल्यामुळें. १९. स्वभाव. **चेतनगुणोक्तिनामक** अलंकार आहे. २०. दुष्टाच्या दूताचें भाषण.

गंभीर अंतरीं स्मित करुनि, भगवती स्वयें वदे अरितें. ॥ ३९
"दूता! किमपि[1] न मिथ्या, तूं वदलासि स्ववृत्तिहित[2] साच, ।
त्रैलोक्याचा अधिपति शुंभ जसा, तो निशुंभहि तसाच. ॥ ४०
'तरि कां 'अवश्य' न म्हणशि?' ऐसें वदशील, सांगतें, परिस, ।
सोडूं नये प्रतिज्ञा, धर्म नसे सत्यभाषणापरिस[3]. ॥ ४१
अल्पमतित्वें आपण हा पण दूता! मनांत म्यां पहिला ।
केला आहे; 'अनृता भ्यावें, तितुकें भिऊं नये अहिला[4]. ॥ ४२
'जो मज जिंकील रणीं, मम गर्वातें करील जो दूर, ।
तो मज समबळ[5] माझा भर्ता होइल, जनांत जो शूर.' ॥ ४३
ऐसा मत्पण, यास्तव करुनि रणीं गर्वहानि, शुंभानें, ।
किंवा शीघ्र धरावा, जिंकुनि मज, पाणि[6] हा निशुंभानें." ॥ ४४
दूत म्हणे, "गर्विष्ठे! न वद असें मजपुढें, कसें वदसी? ।
शुंभ निशुंभ सुदुर्जय[7], कंपद[8] पविपाणिलाहि[9] कीं तदसी[10]. ॥ ४५
त्रिजगीं कोण पुरुष तो? शुंभनिशुंभांसमोर राहेल, ।
पाहेल घूक[11] रविला काय? शश[12] हरिप्रहार[13] साहेल? ॥ ४६
अन्यां दैत्यांहिपुढें सर्व सुरांचेहि कांपती काय[14], ।
मग शुंभादिसमक्ष, स्त्री जी, न धरील कांप ती काय[15]? ॥ ४७
जाशील एकली स्त्री तूं कैसी त्यासमोर उत्साहें? ।
स्पष्ट तुझें तुज देइल जोडुनि अविचार[16] शील[17] कुत्सा[18] हें. ॥ ४८
अभिमान मनीं धरिला, तो द्याया दुःखरौरवा[19] जागे[20], ।
देवि! न होउनि केशाकर्षणनिर्धूतगौरवा[21] जा, गे! ॥" ४९
देवी दूतासि म्हणे, 'वदलासि जसें, तसेंचि हें आहे, ।

---

१. कांहींही, मुळींच. २. आपल्या धंद्यास हितकर. ३. खरें बोलण्यापेक्षां. **अर्थांतरन्यासालंकार.** हें अर्ध सुभाषित आहे. ४. सर्पाला. **व्यतिरेकालंकार.** हा भाग **सुभाषित** आहे. ५. माझ्या सारखा बळवान्. ६. पाणि धरणें=विवाह करणें. ७. जिंकण्यास फार कठीण. ८. भीति देणारे. ९. इंद्रालाही. १०. त्यांचें खड्ग. ११. घुबड. १२. ससा. १३. सिंहाचा तडाका. या गीतींत **दृष्टांतालंकार** आहे. उत्तरार्ध **सुभाषित** आहे. १४. देह. १५. या गीतींत **काव्यार्थापत्ति** अलंकार आहे. १६. अविचारी. १७. स्वभाव. १८. निंदा. या अर्धाचा अन्वय–हें तुझें अविचार शील तुज स्पष्ट कुत्सा जोडुनि देईल. १९. दुःखरूप नरकास. २०. जागत आहे. २१. केश ओढण्यानें गौरव गेलें आहे जिचें अशी.

**शुंभ**, तसाचि **निशुंभ** प्रभु, पणही, न स्व[1]लंघना साहे. ॥ ५०
काय करूं मी? केली न विचार करुनि असि प्रतिज्ञा, त्या ।
जा सांग, असें कृ[2]तपणरक्षार्थ धरुनि असि[3]प्रति, ज्ञात्या! ॥ ५१
भ्यावें स्वपणापूर्वी म्यां, आतां भिउनि काय गा! होतें? ।
माझा निरोप सर्वहि सांग तया, योग्य जें करो तो तें.' ॥ ५२

---

## अध्याय दुसरा.

प्रकुपित दूत सविस्तर **शुंभासि** **शिवोक्त** सर्व आयकवी, ।
विघ्नित[4]कामखळाचा वर्णील क्रोधवेग काय कवी? ॥ १
त्या[5] दूतोक्तश्रवणें कोपें अत्यंत तापला खळ, गा! ।
व्यसनांत आपणाला पाडी मद, जेविं आपला खळगा. ॥ २
ध्यावें फुटकें तुंबी[6]फळ **गंगा**[7]लंघनार्थ बाहूंनीं[8], ।
हें कार्य तसें सांगे, मूढा असुराधिपास[9] बाहूनी[10]. ॥ ३
'हे **धूम्र**लोचना! त्वां पानें, मानेंहि, नित्य जी तुष्टा, ।
स्वचमू घेउनि सत्वर जावें, जेथें असेल ती दुष्टा. ॥ ४
केशांतें धरुनि बळें, आकर्षुनि, करुनि विव्हळा, वीरें ।
आणावी, जाणावी आज्ञा निःसंशया तुवां धीरें. ॥ ५
तीतें रक्षाया तरि तेथें कोणी उठेल जो दक्ष, ।
मारावाचि, असो पर तो सुर, **गंधर्व**राज कीं यक्ष.' ॥ ६
साठ सहस्र असुरबळ घेउनि लंघावयासि तो मळधी[11] ।
पावे श्री**दुर्गे**तें, वेळेतें[12] खवळला जसा जळधी[13]. ॥ ७
जी व्यसन आश्रितांस न बाधों दे, जेविं घन[14]घटा ऊन, ।
त्या **भग**वतीस तो खळ बळमत्त असें वदे दटाऊन, ॥ ८

---

१. आपल्या अवज्ञेस. २. केलेल्या प्रतिज्ञेच्या रक्षणाकरितां. ३. तरवारीस. या गीतीचा अन्वय–मीं विचार न करुनि असि प्रतिज्ञा केली [तेव्हां आतां] काय करूं? ज्ञात्या! जा, [आणि मी] कृतपणरक्षार्थ असिप्रति धरुनि असें (=आहें), [असें] त्यां सांग. ४. विघ्न आलें आहे इच्छेला ज्याच्या अशा दुष्टाचा. ५. या गीतींत **अर्थान्तरन्यास** अलंकार आहे. उत्तरार्ध **सुभाषित** आहे. ६. भोंपळ्याचें फळ. ७. गंगा तरून जाण्याकरितां. ८. हातांनीं. ९. असुरनायकास. १०. बोलावून. **उपमालंकार.** ११. दुष्टबुद्धि. १२. मर्यादेला. १३. समुद्र. **उपमालंकार**. १४. मेघसमूह.

"**शुंभनिशुंभा**पाशीं चाल, तिळहि हित नसे दुरभिमानीं, ।
त्या प्रभुच्या आज्ञेतें सर्वस्वहितावहा[1] सुरभि[2] मानीं. ॥ ९
प्रभुची आज्ञा मोडिशि, आवडली तुज नवीच कां चाल ? ।
प्रभुवाग् अवशांसि[3] म्हणे, 'नरकीं पाशीं पडोनि कांचाल.'[4] ॥ १०
तूं नीतिनें जरि न त्या मत्स्वामिसमीप[5], धरुनि मद, येशी, ।
केशीं कवळुनि, ओढुनि, नेइन, कीं कुजन[6] पात्र न दयेशी." ॥ ११
जगदंबा त्यासि म्हणे, 'दैत्येंद्रें धाडिलासि या काजा; ।
तूंचि वळी बळवेष्टित जरि नेसिल, यत्न काय तरि माजा ? ॥ १२
नेसिल वळेंचि मज, कीं तूं बळवान्, ज्ञातधर्मनय[7], शस्त्री[8], ।
कलह करुनि पुरुपाशीं तेजें साधी न शर्म[9], न यश, स्त्री.' ॥ १३
तो समजे **देवी**नें रचिल्या विपुला निजोपहासासी[10], ।
तीवरि धांवे व्याघ्रीवरि ओतुं[11]तसा सकोप हा सांसी[12]. ॥ १४
हुंकारेंचि तयातें सहसा **पर**मेश्वरी करी भसित[13], ।
प्रकटी यश दरहिमकरदुग्धाब्धितरंग**हर**ह**री**भसित[14]. ॥ १५
क्रोधें तेहि खवळले, गर्वे कोठेंहि जे न परें[15] मातीं[16], ।
परें[17] माती करि त्यांची तत्काळचि सहमृगेंद्र **पर**मा ती. ॥ १६
त्या **धूम्र**लोचनाचा, तत्सैन्याचाहि, नाश कळला हो ! ।
**शुंभ** म्हणे, 'ती दुष्टा या कर्माचें यथार्थ फळ लाहो.' ॥ १७
आज्ञा करी **शिवे**वरि जाया तो **शुंभ** दैत्यपुंडातें, ।
जेणें निवेदिली ती त्या **चं**डातें, तयाहि **मुं**डातें. ॥ १८
"रे ! **चंडमुंड** ! हो ! जा सत्वर घेऊनि विपुलसैन्यातें, ।

---

१. सर्व प्रकारें हित करणाऱ्या [आज्ञेतें]. २. कामधेनु. ३. बंडखोरांस. ४. अर्धाचा अन्वयः— प्रभुवाग् (प्रभुवाणी) अवशांसि म्हणे, 'नरकीं पडोनि पाशीं (यमपाशांनीं किंवा दुःखांच्या वेढ्यांनीं) कांचाल (करकचून जखडले जाल). **अर्थांतरन्यासालंकार.** अन्यपाठ—प्रभुवाग्वंशासि म्हणे नय कीं पाशीं पडोनि कांचाल. ५. माझा स्वामी शुंभ त्याजवळ. ६. दुष्ट. **अर्थांतरन्यासालंकार.** ७. धर्म व नीति माहीत आहे ज्यास असा. ८. शस्त्रधारणकर्ता. या अर्धांत **समुच्चयालंकार** आहे. ९. सुख. **अर्थांतरन्यासालंकार.** उत्तरार्ध **सुभाषित** आहे. १०. आपल्या थट्टेला. ११. बोक्यासारखा. १२. तरवारीसह. १३. भस्म. १४. दर+हिमकर+दुग्धाब्धितरंग+हर+हरीभ+सित=शंख, चंद्र, क्षीरसमुद्राच्या लाटा, महादेव आणि इंद्राचा ऐरावत यांसारखा शुभ्र. याचें विशेष्य 'यश.' हरीभ=हरि+इभ=इंद्र+हत्ती. १५. शत्रु. १६. मावती. १७. परंतु. पूर्वार्ध व उत्तरार्ध यांस जोडणारें **दामयमक** आहे.

आणा, खाणा तन्मदगद[1]; द्या, धिक्कार करुनि, दैन्यातें. ॥ १९
यानंतर अंबेतें ओढूनि बळें धरूनियां वेणी, ।
किंवा बांधुनि आणा; वृकचि तुह्मी असुरवीर[2], ती एणी[3]. ॥ २०
अथवा गांठुनि समरीं असुरांहीं शस्त्रशतगणें अल्पा, ।
सिंह वधूनि, करावी ती सर्वांहीं झटोनि हतकल्पा[4]. ॥ २१
मग[5] करुनि कठिन निजमन, बंधन युवतीस बळकट करा हो! ।
तुमचें असावध, स्त्री ती धरिल्याही, न पळ कटक[6] राहो. ॥ २२
कार्यकरा[7] भृत्यांवरि पूर्ण प्रभुचा प्रसाद, हें जाणा, ।
साधु[8] असाधु[9] करा, परि बहु सत्वर मत्समीप ती आणा." ॥ २३

---

## अध्याय तिसरा.

ते चंडमुंड तेथुनि गेले घेऊनि कटक[10] चतुरंग[11], ।
ज्याचे, रजें मळविती दिगिभकटाहि[12], न स्वभटकच[13], तुरंग[14]. ॥ १
'जें प्रिय, वाहुनि चरणीं फळ, जळ, दळ, एक सुमहि[15], मागा तें;' ।
ऐसें जी माय म्हणे, जीचा कविवृंद[16] सुमहिमा गातें; ॥ २
तीतें तुहिननगाच्या[17] कांचनशृंगीं[18] सलील[19] वसलीतें ।
ते खळ देखति, सिंहीं कांहींसें हास्य करित बसलीतें. ॥ ३
पाहुनि सिद्ध धराया झाले दुर्गेसि बहुत पामर[20] ते, ।
नच[21] शकते, जरि शतदा, नियमें साधूनि बहु तपा, मरते. ॥ ४
कोपे त्यांवरि देवी, तें[22] जें शरदिंदुकान्तिचें[23] सदन ।

---

१. तिचा गर्वरूप रोग. २. दैत्ययोद्धे. ३. हरिणी. **रूपकालंकार.** ४. मेल्यासारखी. ५. अन्यपाठ–मग करूनि बहु कठीन निजमन बंधन तीस बळकट करा हो. ६. सैन्य. ७. कार्य करणाऱ्या. ८. चांगलें. ९. वाईट. १०. सैन्य. ११. चार प्रकारचें. १२. दिग्गजांचीं गंडस्थळेंसुद्धां. १३. आपल्या योद्ध्यांचे केश. १४. घोडे. उत्तरार्धाचा सार्थान्वय.—ज्याचे तुरंग (=ज्या सैन्याचे घोडे) रजें स्वभटकच न मळविती (=धुळीनें आपल्या योद्ध्यांचे केसच मळवीत नव्हते), [तर] दिगिभकटहि मळविती (=दिग्गजांचीं गंडस्थळेंही मळवीत होते.) **असंबंधातिशयोक्ति.** १५. पुष्पसुद्धां. पूर्वार्धाचा अन्वय–फळ, जळ, दळ [किंवा] एक सुमहि [माझ्या] चरणीं वाहुनि, जें प्रिय [असेल], तें मागा. १६. कविसमुदाय. २।३ गीतींचें युग्म आहे. १७. हिमालय पर्वताच्या. १८. सुवर्णाच्या शिखरावर. १९. सहज. २०. नीच. २१. या अर्धाचा अन्वय–जरि [ते] नियमें बहु तपा साधुनि शतदा मरते, [तरी तीस धराया] नच शकते. **अतिशयोक्ति अलंकार.** २२. पाठभेद:–(१) तें जें; (२) तों जें. २३. शरदृतूंतील चंद्राच्या तेजाचें.

झालें कज्जलवर्ण क्रोधें तत्काल तें तिचें वदन. ॥ ५
झालें ललाट तीचें सहसा क्रोधेंकरूनि जें [1]कुटिल, ।
तेथुनि **काली** प्रकटे, वाटे **का**ळादिकांसि ती [2]कुटिल. ॥ ६
ती [3]खड्गपाशहस्ता अत्युग्रा त्या [4]सुरारिकटकांत ।
शिरली, सशांत जैशी व्याघ्री, [5]श्येनीहि जेविं [6]चटकांत. ॥ ७
वीरासह [7]कवळ जसा हय, रथहि तसाचि, ती [8]करी सगळा, ।
जीचा, न चाविला जो, त्याहि सुखें वाट दे [9]करीस गळा. ॥ ८
तीच्या [10]दशनांसि कठिण [11]परशस्त्रांचे न रासि पापडसे; ।
तद्देहा अस्त्र, जसें न [12]ब्रह्मज्ञा नरासि पाप डसे. ॥ ९
सर्वत्र पाविजेला क्षणमात्रें नाश [13]**चं**डसेनांहीं, ।
करिती [14]परांसि चरणहि **का**लीचे **का**ळदंडसे नाहीं. ॥ १०
जे प्रबळां असुरांतें **का**लीचे चूर्ण करिति दंत, कसे ।
ते न म्हणावे **चं**डें, **मुं**डें, अत्युग्र मूर्त [15]**अं**तकसे? ॥ ११
ज्यातें अवलंबुनि ज्या निजशत्रुबळासि न [16]हरि खपवी, तें ।
खपवूनि **का**ळिका त्या देईल न लाज, न [17]हरिख, [18]पवीतें? ॥ १२
**चं**डाच्या शस्त्रांचा, न करि तिचें, [19]गरळकटु [20]निकर, कांहीं, ।
[21]**मुं**डायुधवृष्टिहि, [22]नगें भग्न न केलाचि झटुनि [23]करें कांहीं. ॥ १३
**मुं**डें सहस्रशः, क्षय त्या **का**लीचा करावया, वक्रें, ।

---

१. वांकडें. २. तुडवील. या अर्धांत **उत्प्रेक्षालंकार.** ३. तरवार व पाश जिच्या हातांत आहे अशी. ४. दैत्यांच्या सैन्यांत. ५. ससाण्याची स्त्री. ६. चिमण्यांत. ७. भक्षी. ८. या अर्धाचा अन्वयः–ती वीरासह (स्वारासकट) जसा हय, तसाच वीरासह सगळा रथहि कवळ करी (गट्ट करी, गिळी). ९. हत्तीस. या अर्धाचा अन्वय–जो न चाविला, त्याहि करीस जीचा गळा सुखें वाट दे. याचा भावार्थ–जी सगळाच्यासगळा हत्ती न चावतां सहज गिळून टाकी. १०. दांतांला. ११. शत्रूंच्या शस्त्रांचे. १२. ब्रह्म जाणणारास. १३. चंडाच्या सैन्यांनीं. १४. शत्रूंस. या अर्धाचा अन्वय–काळदंडसे कालीचे चरणहि परांसि नाहीं करिती. १५. यमासारखे. १६. इंद्र. १७. आनंद. १८. वज्राला. या गीतीचा अन्वय–हरि (इंद्र) ज्यातें (ज्या वज्राला) अवलंबुनि ज्या निजशत्रुबळासि न खपवी, तें (शत्रुबळ) खपवूनि कालिका त्या पवीतें (वज्राला) लाज न देईल [काय]? [व] हरिख [ही] न देईल [काय]? आपल्याला जें करतां आलें नाहीं, तें देवीनें केलें, म्हणून वज्राला लाज वाटणें परंतु शत्रुनाशानें आनंद वाटणें अगदीं साहजिक आहे. **व्यतिरेकालंकार.** १९. विषासारखा. कडू. २०. समूह. या अर्धाचा अन्वय–चंडाच्या शस्त्रांचा गरळकडु निकर तिचें कांहीं न करि. २१. मुंड दैत्याच्या शस्त्रांचा वर्षावही. २२. पर्वत. २३. गारांनीं. **दृष्टांतालंकार** आहे.

शक्रें ज्यां जोडावे [1]कर, ऐशीं सोडिलीं महाचक्रें. ॥ १४
सुबहु दि[2]वाकरबिंबें जैशीं मेघोदरीं तशीं शिरलीं, ।
कालीमुखांत चक्रें, जेविं [3]अपक्कतें [4]महाशनीं जिरलीं. ॥ १५
चक्रें गिळोनि काळी, त्रि[5]भुवनभयकारका [6]महास्यातें ।
पसरुनि, करी, धरुनियां [7]सुररिपुवधसारकाम, हास्यातें. ॥ १६
जेणें हरिलीं होतीं [8]अमरनरांचीं किरीटमुं[9]डासीं, ।
काळी खवळुनि, कवळुनि कटक, भिडे सुरजयार्थ मुंडासीं. ॥ १७
काळीनें धरिला जो प्राशाथा [10]परंतमासि [11]असितरणी, ।
प्रसवे [12]धवळयशा, जरि आपण वर्णेंकरूनि [13]असित, रणीं. ॥ १८
धांवे वेगें, परमक्षुधिता [14]धृष्टाखुवरि जसी [15]व्याली; ।
त्या पुंडा मुंडाचें मस्तक खंडी [16]महासिनें काली. ॥ १९
त्या चंडमस्तकातें खंडी, त्याच्या [17]कचांसि कवळून; ।
खवळून रणीं सुखवी विश्वास, यशें अशेष धवळून. ॥ २०
त्याचें [18]हतशेष बळ न टिकलें कालीपुढें भयें पळ, तें ।
सर्व पळालें, जैसें तिमिर दि[19]नकरप्रभोदयें पळतें. ॥ २१
जें चंडमुं[20]डमस्तकयुग, काली दे [21]तिलों [22]उपायन तें, ।
केले [23]पुरुषार्थांचे [23]सफळ जि[24]च्या सर्वेही उपाय नतें. ॥ २२
काली म्हणे, 'महापशु दिधले म्यां चंडमुंड तुज आधीं, ।

---

१. कर जोडणें=हात जोडणें, वर्चस्व कबूल करणें. या गीतीचा अन्वय– वक्रें मुंडें त्या कालीचा क्षय करावया ज्यां (चक्रांना) शक्रें कर जोडावे ऐशीं महाचक्रें सहस्रशः सोडिलीं. २. सूर्यांचीं बिंबें. ३. अपथ्यें. ४. अति खाणाराचे ठायीं. ५. त्रिभुवनास भय देणाऱ्या. याचें विशेष्य महास्यातें. ६. मोठ्या तोंडाला. ७. दैत्यवधाविषयींची श्रेष्ठ इच्छा. ८. देव व मनुष्यांचीं. ९. पागोटीं. या अर्धांत अमरांचा संबंध 'किरीटा'कडे व नरांचा संबंध 'मुंडासीं' याकडे असल्यामुळें **यथासंख्यालंकार** आहे. १०. शत्रुरूपी अंधारास. ११. खड्गरूपी सूर्य. या अर्धांत **परंपरितरूपक** आहे. १२. शुभ्र कीर्तीला. १३. काळी. या अर्धाचा अन्वय– जरी आपण वर्णेंकरूनि असित [होती, तरी] रणीं धवल यशा प्रसवे. उत्तरार्धांत कारणाशीं असदृश कार्य झालें असें वर्णिल्यामुळें **विभावनालंकार** आहे. १४. दांडग्या उंदिरावर. १५. सर्पीण. १६. मोठ्या खड्गानें. १७. केशांस. १८. मारून राहिलेलें. १९. सूर्यतेजाच्या उदयानें. २०. चंडमुंडांच्या शिरांची जोडी. २१. देवीला, शिवेला. २२. भेट. २३. धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचे. या अर्धाचा अन्वय–जिच्या नतें पुरुषार्थांचे सर्वेही उपाय सफळ केले. २४. पाठभेद:–सफळचि ज्या.

शुंभनिशुंभ शिवे! तूं वधुनि [1]रणमखीं यश स्वयें [2]सांधीं.' ॥ २
देवी म्हणे, "मजकडे तूं घेउनि चंडमुंड, आलीस, ।
यास्तव तुज 'चामुंडा' हें दिधलें ख्यात नाम [3]आलीस." ॥ २

---

## अध्याय चवथा.

शुंभ क्रोधें खवळे, श्रवण करुनि [4]चंडमुंडवधवार्ता; ।
आज्ञापी सैन्यातें तो, व्हाया स्वस्त्रियाहि [5]अधवार्ता. ॥
जे कंबुधौम्रकालकदौर्हृदमौर्यादि, सर्व ते योध ।
घेउनि शुंभ निघाला, गेला देवीसमीप सक्रोध. ॥
देवी पाहे आलें अतिभीषण दैत्यसैन्य जें तूर्ण, ।
[6]स्वधनुर्गुणनादांहीं करि [7]भूगगनावकाश ती पूर्ण. ॥
सिंहहि बहुतचि गर्जे, कालीही गर्जना करी मोटी, ।
त्या नादांतें परिसुनि, असुरांच्या त्या वधीत ती कोटी. ॥
तैं विधिहरिहरवासवदेहापासुनि निघोनि तद्रूपा, ।
शक्ति शिवाप्रति आल्या, [8]देवहितपराहितार्थ ज्या भूपा! ॥
त्या शक्तींसह येउनि [9]ईशानप्रभु असें शिवेशि वदे, ।
'मत्प्रेमें शीघ्र असुर मारुनि, विश्वासि तूं शिवे! [10]शिवं दे.' ॥
तों त्या देवी[11]देहांपासूनि निघोनि, चंडिका शक्ती ।
पावे परमभयंकरमूर्ति [12]शिवाशतनिनादिनी [13]व्यक्ती. ॥
[14]वोल्या [15]उन्मूलाया [16]सर्वामरसाधुरिपुचमूकदली ।
प्रकटुनि, ईशानातें मग ती [17]अपराजिता असें वदली. ॥
"भगवंता! दूतत्व स्वीकारुनि या क्षणींच तूं [18]आंगें, ।
सत्कीर्तिस्तव जा त्या शुंभनिशुंभाकडे, असें सांगें. ॥

---

१. युद्धरूपी यज्ञांत. २. मिळीव. ३. सखीस. ४. चंडमुंडांच्या नाशाचा वृत्तांत. ५. वि
व दुःखी. ६. आपल्या धनुष्याच्या दोरीच्या टणत्कारानें. ७. पृथ्वी व आकाश यांमधील पोव
८. देवांचें कल्याण व शत्रूंचें अकल्याण करण्यासाठीं. ९. शिव. १०. कल्याण. ११. शिवे
शरीरापासून. १२. शेंकडों कोल्हीं जिच्या जवळ ओरडताहेत अशी. १३. आकृति. १४. वाव
१५. उपटून टाकण्याकरितां. अन्यपाठ—उन्मूलन या. १६. सर्व देव व साधु यांचे शत्रु
दैत्य यांची सेना हीच केळ. १७. देवी. १८. स्वतां.

'त्रैलोक्यातें पावो शक्र, जयाचें तयासि ओ[1]पावें, ।
सेवोत अमर हवितें, धर्म तुम्हांतें म्हणोनि 'ओ' पावे. ॥ १०
जरि आपण वांचावें, ऐसें इच्छित असाल, आजि तरी ।
पाताळाशि तुम्ही जा, सा[2]मतरी हि[3]तकरी, न [4]आजितरी. ॥ ११
बळगर्वें र[5]णकामचि, तरि म्यां केला असे पुढें कर, या; ।
माझ्या देवोत शिवा तुमच्या मांसेंकरूनि ढेंकर या.''' ॥ १२
कथुनि असें, पाठविला दूतपणें शिव, म्हणोनि ती देवी ।
शिवदूती, भक्त सदा या सन्नामा सुधाधिका सेवी. ॥ १३
कथिला त्या देवीचा तैसाचि निरोप तो तयां श[6]र्वें, ।
गर्वें मान्य न केला दुष्टांहीं, ज्यांत मंगळें सर्वें. ॥ १४
शिव झाला दूत, वृथा मरति, म्हणुनि बहु दयाळु कळवळला, ।
परि त्याच्या हितबोधें दोघांतुनि एकही न खळ वळला. ॥ १५
शुंभ शिवेवरि गेला स्वभट पुढें करुनि सर्वेही, राजा! ।
वंदीलचि कर जोडुनि, सांडुनि काठिन्यगर्व, हीरा ज्या. ॥ १६
विविधायुधवृष्टि असुर सर्वहि का[7]त्यायनीवरि करीती, ।
न [8]तशा मेघांच्या, त्या प्रळयींच्या साजती बरिक रीती. ॥ १७
देवीचे दि[9]नकरकरखरतर शर प[10]रविमुक्तशस्त्रांतें ।
भस्म करिति तत्काळ [11]ज्वाळ जसे धौ[12]तसूक्ष्मवस्त्रांतें. ॥ १८
मारी ती ब्र[13]ह्माणी स्व[14]कमंडलुवारिचे स[15]टाके शें[16], ।
परिभविली न परें, जशि क[17]रिच्या सु[17]दृढेंहि [18]हरिसटा केशें[17]. ॥ १९
माहेश्वरी त्रिशूलें, चक्रें दैत्यांसि वैष्णवी मारी, ।
तैशीच शक्तिनें ती देवी शिखि[19]वाहनाहि कौ[20]मारी. ॥ २०
निजचक्रतुंडदंष्ट्रा यांहीं मारी परांसि वाराही, ।

---

१. अन्यपाठः—ओपा हो. २. तहरूपी नौका. अन्यपाठः—साम करीं. ३. हित करणारी. ४. युद्धरूपी नौका. ५. युद्धाची इच्छाच. ६. शिवानें. ७. देवीवर. ८. अन्यपाठ—न तशा वा ...त्या. ९. सूर्यकिरणांहून अधिक तीव्र. १०. शत्रूंनीं सोडलेल्या शस्त्रांस. 'अर'ची आवृत्ति ...यामुळें यमक. ११. ज्वाला. १२. धुतलेल्या पातळ वस्त्रांस. १३. ब्रह्मदेवाची शक्ति. १४. आपल्या कमंडलूंतील पाण्याचे. १५. तडाके. १६. शेंकडों. १७. हत्तीच्या रांकट व ठासर ...नें. १८. सिंहाची आयाळ. १९. मोर जिचें वाहन आहे अशी. २०. कार्तिकस्वामीची शक्ति.

तैशीच **ना**रसिंही, बहु भी जीच्या नखांसि [१]वाराही. ॥ २१
[२]चंडाट्टहास करुनि, क्षितिवरि पाडुनि, अनेक **शि**वदूती ।
भक्षी, [३]परभर हरि जी, तिस ‘साधु’ न भू मनें कशि वदू ती? ॥ २२
यापरि [४]मातृगणातें प्रकुपित पाहोनि, पावलें दैन्य, ।
त्रासें पलायन करी **शुं**भाचें [५]निहतशेष जें सैन्य. ॥ २३
तेव्हां होय महासुर परम कुपित **र**क्तबीज बा! राया! ।
धांवे मातृगणातें, अत्यद्भुत युद्ध करुनि, माराया. ॥ २४
घाली तो **ऐं**द्रीशीं गांठि, करुनियां त्वरा, [६]गदापाणी, ।
त्या [७]क्षोभद होय [८]कुलिश, जैसें [९]आमज्वरा गदा पाणी. ॥ २५
[१०]क्षतरक्तबीजदेहापासुनि जितुकाहि रक्तबिंदु निघे, ।
त्याचा होय महासुर, जो [११]किमपि उणेपणें न निंदुनि घे. ॥ २६
[१२]तत्तुल्यांचा व्हाया रक्ताचा मायबाप थेंब गळे, ।
[१३]कीं चालती बकाच्या बक, बगळ्याच्याहि बा! पथें बगळे. ॥ २७
ऐसे [१४]शतशः [१५]क्षतजप्रभव पुरुष **र**क्तबीजसम, राजा! ।
सांगों काय करिति त्या मातृगणाशीं [१६]असीम समरा ज्या? ॥ २८
**ऐं**द्रीनें [१७]क्षत केलें शिर, हाणुनि वज्र पुनरपि, तयाचें; ।
[१८]तद्रक्तज पुरुष वरिति [१९]तच्छील, जसेंचि सुनर पितयाचें. ॥ २९
त्या **शो**णितबीजातें निजचक्रेंकरुनि **वै**ष्णवी ताडी, ।
**ऐं**द्री, **कौ**मारीही, शूलें **मा**हेश्वरी उरीं फाडी. ॥ ३०
त्या **श**क्तींतें ताडी तो **शो**णितबीजही [२०]गदाघातें, ।

---

१. वायुही. २. भयंकर क्रोधानें हंसणें. ३. शत्रुरूपी भार. ४. मातृकासमुदायास. ५. मरून शिल्लक राहिलेलें. या गीतीचा अन्वय–यापरि मातृगणातें प्रकुपित पाहुनि दैन्य पावलें (=पावलेलें) शुंभाचें जें निहतशेष सैन्य [तें] त्रासें पलायन करी. ६. गदा आहे हातांत ज्याच्या. ७. क्षोभविणारें. ८. वज्र. ९. अपचनापासून होणाऱ्या तापास. गद=रोग. ही **वैद्यकसंबंधीं उपमा** आहे. १०. क्षतें पडलेल्या रक्तबीज राक्षसाच्या शरीरापासून. ११. थोडाहि. १२. त्याच्या सारख्यांचा. या अर्थाचा अन्वय–तत्तुल्यांचा (रक्तबीजाच्याच तोलाच्या दुसऱ्या रक्तबीजांचा) मायबाप व्हाया रक्ताचा थेंब गळे. १३. बगळ्यापासून ज्याची उत्पत्ति, तो बगळ्यांप्रमाणेंच वागणार, त्या न्यायानें रक्तबीजाच्या रक्तापासून जो राक्षस जन्मे, तो रक्तबीजाचेंच अनुकरण करी, हा भावार्थ. बक व बगळे हे दोन्ही एकाच जातीचे पक्षी असून, त्यांत सामान्यतः कांहीं फरक मानीत नाहींत. १४. शेंकडों. १५. रक्तापासून आहे उत्पत्ति ज्यांची. १६. अमर्याद युद्धास. १७. व्रणयुक्त. १८. त्याच्या रक्तापासून जन्मलेले. १९. रक्तबीजाचा स्वभाव. २०. गदेच्या आघातानें.

बहु मानवले सर्वहि सुर त्याच्या त्या [1]महागदाघातें. ॥ ३१
शक्तींनीं क्षत करितां, सर्वांगीं उसळले [2]क्षतजबिंदु, ।
बहु कोटि पुरुष झाले, [3]सिंधुतरंगीं जसे [4]तरणि [5]इंदु. ॥ ३२
ते [6]रक्तोद्भव पुरुष व्यापुनि करिती [7]भयार्त विश्वास, ।
निश्वास उष्ण सोडिति देव, [8]जयाचा नयेचि [9]विश्वास. ॥ ३३
भ्याले [10]निर्जर पाहुनि, **का**लीतें **चं**डिका स्वयें सांगे, ।
'**चा**मुंडे! मुख पसरीं, तूं खाद्य स्वादु सांडिशी कां? गे! ॥ ३४
माझ्या शस्त्राघातें अरिरक्ताचा उडेल जो बिंदु, ।
तो तव मुखीं पडावा, [11]गुरुपर्वी जेंवि **राहुच्या इंदु**. ॥ ३५
जे रक्तबिंदुपासुनि होतिल उत्पन्न पुरुष, तव तुंडीं, ।
ते नच उरतिल, पडले [12]शलभ जसे [13]दीप्तवन्हिच्या कुंडीं. ॥ ३६
पी रक्तातें घटघट, [14]गटगट ते गीळि, जेविं अंजीर, ।
नव यश गाइल कविकुळ [15]अवलंबुनि [15]चरण, जेविं मंजीर[16]. ॥ ३७
या युक्तिनेंचि होइल समरीं हा रक्तबीज [17]नीरक्त, ।
सर्वहि तुझिया [18]सामर [19]चामरकर भक्त [20]बीजनीं [21]रक्त.' ॥ ३८
**काली** म्हणे, '**शिवे**! तुज किति हा [22]लघुकाय? न [23]परे **मेरु** [23]चला, ।
विश्वास निदेशें[24] तुझा अमृताहुनि काय न **परमे**! रुचला. ॥ ३९
त्या **शो**णितबीजातें निजशूलें **चं**डिका नृपा! हाणी, ।

---

१. महारोगासारखें जें अघ (पाप, पाप कृत्य, शक्तींवर गदा उचलणें) त्याला. त्या राक्षसानें दिलेला टोला इतका कुशलतेचा होता कीं, देवसुद्धां क्षणभर त्याचें खलत्व विसरून, त्याच्या शौर्याची प्रशंसा करूं लागले. २. रक्तबिंदु. ३. समुद्राच्या लाटांत. ४. सूर्य. ५. चंद्र. ६. रक्तापासून आहे जन्म ज्यांचा. ७. भयानें पीडित. ८. विजयाचा. ९. भरंवसा. १०. देव. ११. पौर्णिमेस. १२. टोळ. १३. पेटलेल्या अग्नीच्या. १४. पाठभेदः—कटकट. १५. येथें 'चरण अवलंबिणें' या प्रयोगावर **श्लेष** आहे. १६. पादभूषण, पैंजण. १७. रक्तरहित. १८. देवांसह. १९. चंवऱ्या ज्यांच्या हातांत आहेत असे. २०. वीजनीं, वारा घालण्याविषयीं. २१. अनुरक्त, प्रेमानें गढलेले. २२. लहान देहाचा. २३. या अर्धाचा सार्थान्वय—काली म्हणे, शिवे! तुज मेरु चला पर न [=काली म्हणाली, हे शिवे! तुला मेरुपर्वत चलवस्तूपलीकडील (म्हणजे अचल) नाहीं]; [मग] हा लघुकाय किती? (=मग ह्या अल्प शरीराच्या रक्तबीजाची गोष्ट काय? तो तूं सहज हालवून सोडशील). **अर्थापत्ति**नामक अलंकार. २४. आज्ञा. या अर्धांत **व्यतिरेकालंकार** आहे.

वाहे तद्देहांतुनि रक्त, जसें टोंचितां [1]घटा पाणी. ॥ ४०
जिकडे शोणित वाहे, तिकडे पसरूनि ती वदन देवी ।
काली [2]करालवदना त्या [3]शोणितबीजशोणिता सेवी. ॥ ४१
[4]वदनीं होती, त्यां ते भावी बहु सुरस, [5]मानवे, चावे; ।
[6]शतकोटितद्रदांनीं [7]पर [8]वृत्रासुरसमान वेचावे. ॥ ४२
[9]रक्तज कुतर्कसे ती विद्याशी ते नवे नवे दमुनी, ।
शुंभनिशुंभहि [10]मानी, तिस केवळ मानवे न वेद मुनी. ॥ ४३
शोणितबीज गदेनें ताडी, परि चंडिकेसि अल्पाही ।
पीडा न उग्रहि गदाघात करी, जेविं [11]हरिस [12]तल्पाही. ॥ ४४
देवी शूलें, वज्रें, खड्गें हाणी तसेंचि [13]ऋष्टीनें; ।
दृष्टीनेंहि हत करी अरितें खीळूनि बाणवृष्टीनें. ॥ ४५
काळी तद्रक्ताचे, [14]जाया [15]तद्रचित पाप, थेंब [16]हुतें ।
[17]निजमुखकुंडीं करि, जरि मळला होताहि [18]कापथें बहुत. ॥ ४६
[19]केलीं [20]नीरक्तं असा अति दारुण रक्तबीज तो खचला, ।
सुर, मुनि म्हणति, 'नमुनि, यश वर्णुनि, देवूं शिवेस [21]तोखें चला. ॥
तो मातृगण प्रमुदित झाला विजयेंकरूनि, मग नाचे, ।
जयजयकारें भरिती सुर, मुनि [22]उद्देश सर्व [22]गगनाचे. ॥ ४८

---

१. कुंभास. 'गदा' असा पाठभेद. २. भयंकर आहे मुख जीचें. ३. रक्तबीज राक्षसाच्या रक्तास. ४. देवीच्या तोंडांत रक्तबीजाच्या रक्तापासून उत्पन्न होणारे नवे रक्तबीज. ५. संतुष्ट होई, खूष झाली. ६. वज्रासारख्या तिच्या दांतांनीं. ७. शत्रू. ८. वृत्रासुरासारखे. वज्र हें इंद्राचें आयुध. त्या आयुधानें वृत्राचा वध झाला होता, या गोष्टीवर येथें लक्ष्य आहे. ९. रक्तापासून जन्मलेले दैत्य. १०. अभिमानी. उत्तरार्धाचा सार्थान्वय–तिस केवळ वेद, मुनी न मानवे (=तिला केवळ वेद व मुनीच मानवत नव्हते), [तर] मानी शुंभ निशुंभहि मानवे. (तर अभिमानी शुंभ व निशुंभही मान देते झाले.) ११. श्रीविष्णूस. १२. तल्प+अही=बिछानारूप शेष. १३. शस्त्रविशेषानें. १४. पाठभेदः–व्हाया. १५. त्यानें केलेलें. १६. होमिलेले. १७. आपल्या मुखरूपी कुंडांत. १८. दुर्मार्गानें. या गीतीचा अन्वय—जरि [रक्तबीज] कापथें बहुत मळला होताहि, [तरी] काळी तद्रचित पाप जाया (नाहींसें व्हावें म्हणून) तद्रक्ताचे थेंब निजमुखकुंडीं हुत करी. १९. केलेला. २०. रक्तहीन. पाठभेदः–निरक्त ऐसा. २१. संतोष. २२. आकाशाचा अवकाश. उद्देश=प्रदेश. पाठभेदः–ह्द्देश.

## अध्याय पांचवा.

**शुंभनिशुंभ** क्षोभे श्रवण करुनि **रक्तबीजनाशातें**, ।
खळबळ सर्वेहि खवळे, कीं वश होणार **काळपाशातें**. ॥ १
वाटे, **देवीस**, करुनि कलहा, खल हा **निशुंभ** करिल गट, ।
त्यामागूनि, कराया [1]दुर्गाबलहानि, **शुंभ** करि [2]लगट. ॥ २
करि **शुंभनिशुंभांशीं** ती **शक्ति** [3]पैरा सुसंगर, हितातें ।
साधुनि द्याया **शक्रा**, त्यातेंहि [3]पैरा [4]सुसंगरहितातें. ॥ ३
करिती **जगदंबेवरि** ते दारुणबाणवृष्टि [5]अहित रणीं, ।
सोडी **देवी** शर जे असुहरतापद जसेचि [6]अहितरणी. ॥ ४
छेदुनि शरजालातें, द्याया, मद हरुनि, कंप दोघांतें, ।
सर्वांगीं शर हाणी **देवी** त्या [7]असुरसंपदोघांतें. ॥ ५
**देवीच्या** सिंहशिरीं, कोपें चाऊनि अधर, [8]अरवालें ।
असुराधिपें **निशुंभें** धांवुनि, केला प्रहार [9]करवालें. ॥ ६
**देवी** स्वमनांत म्हणे, 'शीघ्रचि हा नि[10]करं वाळविल यातें, ।
[11]ने, बाणा! व्हाया मदतेजोहानि, करवाळ विलयातें.' ॥ ७
तो शक्ति पुन्हा टाकी, भ्यावें [12]समरांगणीं जिला **शक्रें**, ।
तत्काळ **भगवतीनें** केली तैशीहि ती [13]द्विधा चक्रें. ॥ ८
शूल **निशुंभ** क्षेपी, तो ये जैसा मदांध [14]तूर्ण [15]करी, ।
त्यासि, जसा सिंहीचा, **देवीचा** [16]मुष्टिपात चूर्ण करी. ॥ ९
टाकी **निशुंभ** योजुनि जें साधिल कार्य हो! गदा, तीतें ।
तत्काळचि भस्म करी निजशूलें [17]मोक्षभोगदाती ते. ॥ १०

---

१. देवीच्या सैन्याचा नाश. २. लगट करणें=भिडणें. ३. मोठी. ४. साधुसंगहीनास. असुरांचा देवीहस्तें वध होऊन, त्यांना मुक्ति मिळणार, म्हणजे त्यांचें हितच होणार. ५. शत्रू. ६. सर्प व सूर्य. या अर्थांत असुहर (प्राणघातक) व तापद यांचा क्रमानें अहि व तरणी यांशीं संबंध असल्यामुळें **यथासंख्यालंकार** झाला आहे. ७. आसुरसंपत्तीच्या ओघांस. या गीतीचा अन्वय–देवी [त्यांच्या] शरजालातें छेदुनि, मद हरुनि, त्या असुरसंपदोघांतें दोघांतें कंप द्याया सर्वांगीं शर हाणी. आसुरी संपत्तीचें वर्णन भगवद्गीतेंत असें केलें आहे–दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च । अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ १६।४. ८. हलक्यानें. याचें विशेष्य 'निशुंभें.' ९. तरवारीनें. १०. युद्ध. ११. पाठभेदः–ने वाणें व्हाया यत्तेजोहानि इ०. १२. युद्धभूमीवर. १३. दुखंड. १४. त्वरित. १५. हत्ती. १६. मुठीचा तडाका. १७. मुक्तिपद देणारी देवी. 'क्षोभभोगदातीतें' असा अन्यपाठ.

न विचारी [1]जड कीं, 'जय साधिल **देवी**रणांत परशु कसा?' ।
केला भग्न **शिवेनें**, [2]दिव्यशुकीनें क्षणांत [3]परशुकसा. ॥ ११
**दुर्गेनें** तो मूर्च्छित करितांचि, करुनि पराभव, **निशुंभ**, ।
युद्ध करी आपणही जायासि मरुनि [4]परा भवनिं **शुंभ**. ॥ १२
ज्याचे [5]दिव्यायुधधर विश्वांत ख्यात आठ भुज गानीं, ।
ज्यांसि [6]दिली आकारें, क्रौर्यैंही, स्पष्ट पाठ [7]भुजगांनीं, ॥ १३
दिव्यरथावरि बैसुनि [8]सर्वासुरराज **शुंभ** आला जो, ।
त्या पाहुनि [9]शंख **शिवा** वाजवि, त्या कां न चंद्रमा लाजो? ॥ १४
[10]चापगुणध्वनिहि करुनि, बहु [11]आद्या [11]शक्ति कांपवी जगती, ।
[12]सर्वासुरतेजोवधकर घंटानादही करी मग ती. ॥ १५
[13]हरिनेंहि नाद केले, [14]परभटनादासि जे [15]अनादरिते, ।
ज्यांहीं मदपूर्ण महागज झाले तत्क्षणीं [16]अनाद [17]रिते. ॥ १६
**काली** उडोनि गगनीं स्वकरतळांनीं महीतळा ताडी, ।
त्या नादें पहिले जे शंखादिनिनाद ते उणे पाडी. ॥ १७
[18]ती **शिव**दूतीहि करी भीषण अत्युच्च हास, [19]सुरथा! रे! ।
तेव्हां केले असुरत्रासें सोडूनि सर्व सुर थारे. ॥ १८
अतिशयितक्रोधातें त्या समयीं **शुंभ** दैत्य तो पावे, ।
चित्तीं म्हणे, '**शिवेचे** घ्यावे कीं, स्वांसु तीस ओपावे.' ॥ १९

---

१. मंदबुद्धीचा निशुंभ. २. स्वर्गींच्या पोपटिणीनें. ३. दुसऱ्या लोकींच्या पोपटासारखा, साध्या पोपटाप्रमाणें. ४. श्रेष्ठ–मोक्षाच्या–घरीं. या अर्धाचा अन्वय–शुंभ आपणही मरुनि परा भवनिं जायासि युद्ध करी. ५. उत्तम शस्त्रें धरणारे. याचें विशेष्य भुज. ६. पाठ देणें=श्रेष्ठत्व कबूल करून स्पर्धेपासून–चढाओढीपासून–परावृत्त होणें. ७. सर्पांनीं. **प्रतीप.** १३।१४ गीतींचें युग्म आहे. ८. सर्व दैत्यांचा राजा. ९. शंखाला. या अर्धांत **प्रतीपालंकार** आहे. १०. धनुष्याच्या दोरीचा नादही. ११. शिवा. १२. सर्व दैत्यांच्या तेजाचा नाश करणारा. १३. सिंहानें. १४. शत्रूच्या योद्ध्यांच्या गर्जनेस. १५. तुच्छ करणारे, धिक्कारणारे. १६. ध्वनि-रहित, स्तब्ध, चूप. १७. शक्तिहीन, दुर्बळ, गर्भगळित. १८. अन्वयः–रे सुरथा! ती शिवदूतीहि भीषण अत्युच्च हास करी, तेव्हां असुरत्रासें सोडूनि (असुरभयानें मोकळे करून,) सर्व सुर थारे (स्थिर, स्वस्थ) केले. गीतीचा पाठभेदः–ती शिवदूतीहि करी जी पण अत्युच्च साश्वसुर थोर। तेव्हां केले असुरत्रासें सोडून सर्व सुर थोर. ॥ १९. हीं देवीचरित्रें मेधाऋषीनें चैत्रकुलोत्पन्न सुरथ राजाला सांगितलीं आहेत. (मागें प्रथमचरित, अध्याय १ ला पहा.) २०. आपले प्राण.

त्यासि म्हणे जगदंबा, '[1]असुरापसदा! रहा, रहा, नीचा! ।
दिधला तुला वराया हस्तांत उदार हार [2]हानीच्या? ॥ २०
तेव्हां 'जय जय' ऐसें म्हणती गगनस्थ अमर परमेला, ।
'हाहि मरो शीघ्र, जसा तो तुजशीं करुनि समर [3]पैर मेला.' ॥ २१
शुंभ [4]ज्वालामालाकुलवदना शक्ति भीषणा धाडी, ।
करुनि [5]निरास [6]महोल्काघातें, परमेश्वरी तिला पाडी. ॥ २२
राजा! तेव्हां व्यापी शुंभाचा सिंहनाद विश्वास, ।
तेचि न भ्याले, बहु दृढ ज्यांसि [7]महाशक्तिपादविश्वास. ॥ २३
निर्घातनिर्स्वनानें शुंभाचा सिंहनाद लोपविला, ।
जो पेंविला हुंकारें भंगंद, तो दैत्यराज कोपविला. ॥ २४
शुंभाच्या बाणांतें निजबाणांच्या शिवा [11]महानिकरें ।
[12]हानिकरें, तीच्याही छेदी असुरेंद्र शत्रु हा निकरें. ॥ २५
मग जगदंबा मूर्च्छित पाडी शूलें तयासि विंधून, ।
देवीप्रताप गमला तिळहि न [13]घटजोन, [14]तोहि [15]सिंधून. ॥ २६
तों तो निशुंभ सुररिपु उठला सोडुनि असावधानपण, ।
करिता इतर शिवेच्या, प्रत्यय येतां असा, वधा न [16]पण. ॥ २७
देवीतें, काळीतें, हरितें, शर, व्हावयासि यश, हाणी; ।
[17]संपन्मदांधमति [18]निजपरिणामनिरीक्षणींच न शहाणी. ॥ २८
होउनि अयुतभुज असुर, झांकी देवीस अयुतचक्रांहीं, ।
भ्यावें ज्यांसि [19]यमवरुणयक्षपवातार्कवन्हिशक्रांहीं. ॥ २९
सुरमति सहसा मोहीं, चक्रसमूहीं जशीच ती, लोपे; ।

---

१. राक्षसांत नीचा. २. या अर्धाचा अन्वय–तुला वराया उदार हानीच्या हस्तांत हार दिधला. यांत **समासोक्त्यलंकार** आहे. ३. शत्रु महिष. ४. ज्वाळांच्या पंक्तीनें व्याप्त आहे तोंड जीचें अशी. ५. निवारण. ६. मोठ्या उल्केच्या तडाक्यानें. ७. महाशक्ति देवीच्या पायांच्या ठेकाणीं भाव. ८. विजेच्या ध्वनीनें. ९. वज्राला. १०. फोडणारा, तोडणारा. ११. मोठ्या समुदायानें. १२. हानि करणाऱ्यानें–याचें विशेष्य महानिकरें. पूर्वार्ध व उत्तरार्ध यांत **द्वामयमक** आहे. १३. अगस्तीहून उणा. १४. शंभुही. १५. समुद्राहून उणा. **परंपरितरूपक.** १६. प्रतिज्ञा. या अर्धाचा अन्वय–असा प्रत्यय येतां इतर शिवेच्या वधा पण न करिता. १७. संपत्तीच्या गर्वानें अंध झालेल्याची बुद्धि. १८. आपल्या परिणामाकडे पहाण्याविषयीं मात्र. पाठभेदः–'निरीक्षणीं न च, या गीतींत **अर्थांतरन्यासालंकार** आहे. उत्तरार्ध **सुभाषित** आहे. १९. यम, वरुण, कुबेर, वायु, सूर्य, अग्नि व इंद्र यांनीं.

तेव्हां बहुतचि समरीं दुर्गा [1]दुर्गार्तिनाशिनी कोपे. ॥ ३०
छेदी त्या चक्रातें स्वशरांहीं, त्याहि बाणजाळांतें; ।
देवांतें स्वोत्कर्षें हृष्ट करी, तप्त दैत्यपाळांतें. ॥ ३१
कुपित निशुंभ, शिवेचें चूर्ण करायासि उर, गदा हातें ।
पडताळुनि, धांवे तो, जैसा [2]धृतवैर [3]उरग [4]दाहातें. ॥ ३२
समरांत निशुंभा जी, होउनि [5]तदरातियम, गदा पावे, ।
तीतें खड्गें खडुनि, देवीनें कोण न मग दापावे? ॥ ३३
[6]तरि मूढ शूळ घेउनि धावे, कीं जीस काळ घेरी, ती ।
मति नुमजे; बाळाची प्राज्ञहि, होऊनि बाळ, घे रीती. ॥ ३४
दुर्गा मनीं म्हणे, 'मम शूलचि या शत्रुचें उर विदारू, ।
कीं हा [7]अरातिजीवन, दृढहि न [8]दहनहि जसा उरवि [9]दारू. ॥ ३५
शूल धरुनि शुंभहृदय शूलेंचि विदारितां अगा! राया! ।
पुरुष निघे त्या [10]भग्ना हृदया सोडुनि, जसा [11]अगारा, या. ॥ ३६
[12]भग्ननिशुंभहृदुद्गत, सुमहाबळ, पुरुष [13]युद्धदृढनिष्ठ, ।
श्रीमज्जगदंबेतें बाहिर निघतांचि तो म्हणे '[14]तिष्ठ'. ॥ ३७
तों हांसुनि मस्तक [15]हरि देवी, न करूनि एक पळ उशिर, ।
[16]दुर्गासिपुढुनि अरि [17]जरि, [18]अहिपुढुनिहि [19]बाळभेक पळउ शिर. ॥ ३८
ऐसा जगदंबेनें सुरशत्रु निशुंभ, हरुनि मद, वधिला ।
जो मत्त म्हणत होता, 'कोण करिल शस्त्र धरुनि [20]मदवधिला'. ॥ ३९

---

१. कठीण दुःखें नष्ट करणारी. अन्यपाट—तेव्हां समरीं वहुतचि देवी दुर्गार्तिनाशिनी कोपे. २. ज्यानें द्वेष (डूक) धरिला आहे असा. ३. सर्प. ४. संतापार्थ, संताप देण्यासाठीं. ५. त्याच्या शत्रूचा मृत्यु (=संहाराचें साधन). अन्वय—जी गदा, समरांत तदरातियम होउनि, निशुंभा पावे, तीतें खड्गें खंडुनि (तोडून छिन्न विच्छिन्न केल्यावर), मग देवीनें कोण (कोणते शत्रू) न दापावे (दडपून टाकावे)? ती सर्व शत्रूंना ठेंचणार, हा भाव. ६. या गीतीचा अन्वय—तरी मूढ शूळ घेउनि धावे, कीं जीस (मतीस) काळ घेरी (वेढितो, पिछाडतो, पकडतो), ती [निशुंभाची] मति नुमजे; प्राज्ञहि बाळ (मूढ) होऊनि बाळाची रीती घे. **अर्थांतरन्यासालंकार.** ७. शत्रूचें प्राणधारण. ८. अग्नि. ९. कणखर लांकूड. १०. चुरलेल्या. ११. घरास. १२. चुरलेल्या निशुंभाच्या वक्षःस्थळापासून निघालेला. १३. युद्धावरच ज्याचा बळकट विश्वास आहे असा. १४. उभी रहा. १५. हरण करी. १६. देवीच्या तरवारीपुढून. १७. पाठभेदः—तरि. १८. सर्पांपुढून. १९. लहान बेडूक. २०. माझ्या मृत्यूला.

जें सैन्य **निशुंभा**चें सुरदुःसह बहुत मातलें होतें, ।
**कालीनें काळमुखीं**, बाळमुखीं तेविं, घातलें हो! तें. ॥ ४०
कांहीं **शिव**दूतीनें, कांहीं सिंहें रणांत लोळविलें, ।
कांहीं त्या मातृगणें स्वर्गाप्रति गौरवूनि बोळविलें. ॥ ४१

---

## अध्याय सहावा.

ज्याच्या दृष्टिपुढें सुरसेना समरांत परम [1]दभ्रा, त्या ।
**शुंभ** विलोकी [2]निहता [3]प्राणसमध्वस्तपरमदभ्राला. ॥ १
त्याहि विलोकी ध्वस्ता [4]विध्वस्ताशेषसुरसभा सेना, ।
[5]ज्यांच्या नव नव सुयशाहूनि मना अमृत सुरस भासेना. ॥ २
बंधुवधें, सैन्यवधें, **शुंभ** क्षोभें [6]लयाग्निशीं तोले, ।
त्या **दे**वीस कडकडुनि [7]जड कडु निपटचि रणीं असें बोले; ॥ ३
‘[8]साहंकारे! दुष्टे! **दुर्गे**! शौर्यें धरूं नको गर्व, ।
अन्यांचें बळ आश्रय करुनि, करिशि युद्ध हें वृथा सर्व’. ॥ ४
श्री**दुर्गा** त्यासि म्हणे, ‘रे! दुष्टा! ऐक [9]साधुधीरहिता, ।
मी एकलीच आहें या विश्वामाजि [10]साधुधीरहिता. ॥ ५
ज्या [11]**ब्र**ह्माणीप्रमुखा माझ्याचि विभूति, जाण पापा! हें; ।
मजमाजि समस्ताही ह्या करितात प्रवेश हा, पाहें.’ ॥ ६
हें म्हणतां **ब्र**ह्माणीप्रमुखा त्या देवता स्वगेहांत, ।
सर्वा प्रवेशल्या त्या **दु**र्गेच्या तत्क्षणींच देहांत. ॥ ७
देवींच्या [12]वृंदातें [13]निजरूपीं, जेविं भूमि [14]कुंभातें, ।
नेउनि विलयासि, म्हणे [15]सर्वाद्या [16]सर्वमूर्ति **शुंभा**तें. ॥ ८
‘होतीं प्रगट त्रिजगीं [17]साधुहित, करुनि [18]असाधुवध, माजीं ।
म्यां आवरिलीं रूपें तीं, सुबहुमतें [19]**श्रु**तींस अधमा! जीं. ॥ ९

---

१. तुच्छा. २. मेलेल्या. ३. प्राणांसारखा प्रिय व शत्रूंचा गर्व हरण केला आहे ज्यानें अशा भावाला. ४. नष्ट केल्या होत्या सर्व देवसभा ज्यांनीं अशा. ५. या अर्धांत **व्यतिरेकालंकार** आहे. ६. प्रलयाग्नीशीं. ७. अज्ञ. ८. गर्विष्ठे. ९. चांगल्या बुद्धीनें हीना. १०. संतांची व शूरांची हितकर्ती. ११. ब्रह्माणी ज्यांत मुख्य आहे अशा मातृका. १२. समुदायातें. १३. आपल्या रूपाचे ठायीं. पाठभेदः—निरूपिजे. १४. घटातें. १५. सर्वांचें मूळ. १६. ‘सर्वभूति’ असा पाठभेद. १७. संतांना हितकर. १८. दुष्टांचा नाश. १९. वेदांस.

त्या पाहुनि, ‘नच लवणें[1] स्वव्रत[2] म्हणतां न कां मुसळ लाजो? ॥ २८
विकट[3] निकट ये, हाणुनि मुष्टि, विदारूनि वक्ष[4], माराया; ।
तेव्हां सदयाहि करी जगदंबा लेश न क्षमा, राया! ॥ २९
शुंभातें जयमूलें[6] शूलें हृदयांत चंडिका ताडी, ।
शत्रुशतशमनशीला[7] लीलालेशेंचि[8] भूतळीं पाडी. ॥ ३०
झाला असतां तो खळ सुरमदनगभिन्[9] नवं[10] क्षमं रणातें, ।
पावे, शूलाघातें[11] होतां मग भिन्न वक्ष, मरणातें. ॥ ३१
पडतां, तेणें सकळा भू सद्वीपा ससागरा सनगा[12] ।
कांपविली, एक न त्या देवीचें मात्र कांपलें मन गा. ॥ ३२
मग लागल्या कराया[13] राया! मार्गेंचि यान[14] सागरगा[15]; ।
तो जेविं तापमोहप्रद[16], होय न तेविं मानसा गर; गा! ॥ ३३
विश्व प्रसन्न झालें, होय जसें भास्करोदयीं कमल; ।
उत्पातमेघ[17] शमले[18], सर्व व्योम प्रकाशलें अमल[19]. ॥ ३४
झाले प्रहर्षनिर्भरमानस[20] सुर, जे महाधिनें[21] गलित; ।
गंधर्वांहीं केलें गान शिवासद्यशोमृतें[22] ललित[23]. ॥ ३५
वाजविलीं बहु वाद्यें सुपटु[24] शतसहस्र[24] वादकांहीं[24] हो! ।
तद्रवहृत[25] कर्णाला[25], नच रुचला[26] इतर वाद[27] कांहीं हो! ॥ ३६

---

१. नम्र होणें. २. आपलें ब्रीद. उत्तरार्धाचा अन्वय–[ अशा रीतीनें पुन्हा वर उसळलेल्या व न लवणाऱ्या ] त्या (शुंभाला) पाहुनि, ‘नच लवणें [हें माझें] स्वव्रत’ [असें] म्हणतां मुसळ कां न लाजो? आपल्यापेक्षां शुंभाच्या अंगीं जास्ती ताठा आहे, हें पाहून मुसळ खजील झालेंच पाहिजे. पाठभेदः—त्या पाहुनि नच लवणें स्ववृत्त म्हणतां पुन्हा मुसळ लाजो. ॥ ३. पाठभेदः—नीच निपट त्या हाणुनि०. ४. हृदय. ५. या अर्धांत **विशेषोक्ति** आहे. ६. जय हेंच ज्याचें मूळ आहे किंवा जयाचें मूळ, त्यानें. ७. शेंकडों शत्रूंचा नाश करण्याचा आहे स्वभाव जीचा. ८. केवळ अल्प आयासानें, अगदीं सहज. या गीतींत **यमक** व **अनुप्रास** यांची गर्दी उडाली आहे. ९. देवांचा गर्वरूप पर्वत फोडणारा. १०. पुन्हा तयार, नव्यानें सज्ज. ११. शूलाच्या तडाक्यानें. या गीतीचा अन्वय–तो सुरमदनगभित् खळ रणातें नव क्षम झाला असतां, मग शूलाघातें वक्ष भिन्न होतां, मरणातें पावे. १२. पर्वतांसह. १३. प्रथमचरण व द्वितीय चरण यांस जोडणारें **दामयमक** आहे. १४. गमन. १५. नद्या. १६. दुःख व मोह देणारा. या अर्धांत **श्लेष**–मूलक **व्यतिरेक** आहे. १७. आकस्मिक प्रसंग हेच मेघ. **रूपकालंकार.** १८. शांत झाले. १९. निरभ्र. २०. अत्यानंदानें व्याप्त ज्यांचें मन असे. २१. मोठ्या काळजीनें. २२. शिवेच्या सत्कीर्तिरूप अमृतानें. २३. सुंदर. २४. निपुण अशा लक्ष वाजंत्र्यांनीं. २५. त्या वाद्यध्वनीनें आकर्षिलेल्या कानाला. अन्यपाठ–तद्रव हित कर्णाला. २६. आवडला. २७. भाषण.

[1]अतिमुदित अप्सरांचे गण तेव्हां नाचले शत ज्ञाते, ।
निज [2]भान धरूं देती नच त्यांचे नाच लेश तज्ज्ञा ते. ॥ ३७
मंद, सुगंध, सुशीतळ, वायु तदा लागले वहायास; ।
[3]सुप्रभ होय दि[4]वाकर, त्यातें पद्महि सुखें पहायास. ॥ ३८
पेटत नव्हते पूर्वीं जे अग्नि, सुखेंचि पेटले हो! ते, ।
होते खिन्न, मुदित मग होउनि बहु त्यांसि भेटले [5]होते. ॥ ३९
[6]कादंबिनी शिवेतें, [7]जे [8]शतमखमुख, तयाहि [9]लेखांतें ।
चातकमयूरऐसें, तच्चरितहि [10]अमृतवर्ष [11]लेखा तें. ॥ ४०

---

## १२. [12]आशंसाष्टक.

( [13]औपच्छंदसिकवृत्त. )

तव पादसरोरुहीं स्वचित्तभ्रमरातें रस चाखवूनि [14]गोंवूं, ।
तुज भक्त तुजे सदैव गाती, मृग आम्ही [15]गुणगीतसक्त होवूं. ॥ १
मज वाटतसे [16]सभाग्य मोठें, भगवद्भक्त तयांत म्यां जुडावें; ।
तदधीन तुज्या यशःसुधेचा [17]ऱ्हद गंभीर, तयामधें बुडावें. ॥ २
तुज वर्णिति संत [18]संगमुक्त [19]प्रकृतिप्रेमळ, [20]तद्गणीं शिरावें, ।
तुजिया गुणसागरांत [21]माजें मन हें [22]सैंधवें माधवा! विरावें. ॥ ३
गमतें [23]भगवज्जनप्रसंगें मज, टाकून [24]गृहादिलोभ, जावें; ।
[25]करुणावरुणालया! मुकुंदा! तुजला सादर सर्वदा भजावें. ॥ ४

---

१. फार आनंदित. २.देहादिस्मृति.३. चांगला तेजस्वी.४. सूर्य. ५. यज्ञकर्ते. पूर्वार्ध व उत्तरार्ध यांस जोडणारें **दामयमक** आहे. ६. मेघमाला. ७. 'जो' असा अन्य पाठ. ८. इंद्रप्रमुख. ९. देवांतें. १०. अमृताचा वर्षाव. ११. माना. येथें **रूपक** व **उपमा** यांचें मिश्रण आहे. १२. आशंसा=इच्छा, मनोरथ. या अष्टकांत कवीचे परम मनोरथ व्यक्त झाले आहेत. १३. हें वृत्त अर्धसमवृत्तांपैकीं एक आहे. याचें लक्षण:—**ससज द्विगुरू** समेतराला, समपादीं **सभरां**वरी **य** साजे । महती जगतींत पावती ते, भजती एकमनें वरीयसा जे. ॥ १४. गुंतवूं, रमवूं. १५.तुझे गुण ज्यांत वर्णिले आहेत, असें गाणें ऐकण्यांत गुंगलेले.१६. सुदैव.१७. सरोवर, डोह. १८. निःसंग, विरागी. १९. प्रेमळ स्वभावाचे, मनाचे कोमळ. २०. संतमंडळींत. २१. माझें. २२. मीठ. सिंधू (समुद्रा) पासून उत्पन्न झालेलें जें, तें 'सैंधव'. २३. हरिदासांच्या—प्रभुभक्तांच्या—सहवासानें. २४. घर, दार इत्यादिकांची आशा, मोह. २५. दयासागरा.

तुजला 'रघुनाथ! रामचंद्र! प्रभुजी!' यापरि नित्य आळवावें, ।
मन चंचळ हें, त्वदंघ्रिपद्मीं[1] जडतां, न क्षणमात्र चाळवावें[2]. ॥ ५
मन हें विषयीं उडीच घाली, विष हें जाणुनि यावरी विटावें, ।
तव कीर्ति उदार कामधेनू, तिस मी, होउनि वासरूं, चिंटावें[3]. ॥ ६
तुज[4] एक अनेकभूतभेदीं, घटतोयार्क[5] असे परी, पहावें; ।
भजकार्पित[6] मुक्तपादराज[7] तुळसीदाम[8] शिरीं सदा वहावें. ॥ ७
त्रिजगन्नयनप्रमोदहेतु[9] त्वदुदारांघ्रिसरोज[10] म्यां नमावें; ।
मधुपत्व धरूनियां रमावें; स्वसुखें[11] त्या भुवनत्रयीं न मावें[12]. ॥ ८

मु

---

## नवदानकेली[13].

( गीतिवृत्त. )

श्रीकृष्ण म्हणे, "राधे! सुकृतीं[14] द्यावें मनास खेदा न, ।
म्हण हांसुनि, 'घे, सफळा व्हाया निजकामना, सखे! दान."' ॥ १
राधा म्हणे, 'तुज शठा! गोपाळा! दानपात्रता नाहीं, ।

---

१. तुझ्या चरणकमलीं. २. चंचळ व्हावें, ढळावें. ३. आचळांतून दूध येईनासें होईपर्यंत चुफावें, मोठ्या चिकाटीनें चुंबावें, अत्यंत ओढाळपणानें प्यावें. ४. अनेक भूतभेदीं [म्यां] तुज एक पहावें=या विविध भूतमात्रांच्या ठायीं तूं एकटाच वसतोस-उपाधीनें भिन्न भासणारीं हीं भूतें वस्तुतः एकव्या तुझींच रूपें आहेत-हें मीं समजावें. ५. [निरनिराळ्या] मडक्यांतल्या पाण्यांतील [प्रतिबिंबरूपानें भिन्नत्व पावणाऱ्या, परंतु वस्तुतः बिंबरूपानें एकटाच असणाऱ्या] सूर्याप्रमाणें. ६. भक्तानें वाहिलेलें. ७. [तुझे] श्रेष्ठ पाय ज्यानें सेविले आहेत असें, [तुझ्या] श्रेष्ठ चरणास शिवलेलें. ८. तुळसीच्या पत्रांची किंवा मंजरींची माळ. ९. तिन्ही जगांच्या डोळ्यांच्या आनंदाचें कारण. १०. तुझे उदारचरणरूपी कमळ. ११. आत्मानंदानें, ब्रह्मानंदानें. १२. मावतों, राहतों. १३. काव्येतिहाससंग्रहांत या प्रकरणाचें 'राधाकृष्णसंवाद' हें नांव आढळतें. परंतु प्रकरणाच्या उपसंहारांत कवीनेंच त्याचें 'नवदानकेली' हें अभिधान दाखल केलें असल्यामुळें, आम्हीं त्याचाच आदर केला आहे. एकदा कृष्णानें राधेला देहदान देण्याविषयीं फार गळ घातली. तेव्हां राधेनें कृष्णाच्या लघळपणानें रागावल्याचा आविर्भाव आणून, त्याची मुरली एका कुंजांत फेंकून दिली. तेव्हां कृष्ण राधेला रस्त्यांत आडवून, 'माझी मुरली तरी एक स्वतः आणून दे, नाहीं तर तिच्या मोबदला कांहीं तरी माझ्या मनाजोगें दान दे,' अशा पेंचांत तिला पकडूं लागला. त्या वेळचें त्यांचें संभाषण या प्रकरणांत आहे. यांत अखेर राधा हरली आहे. १४. पुण्यकृत्यांत, चांगल्या कार्यांत.

कोठेंही नायकिलें, वेदरहित दानपात्र तानांहीं.[1]' ॥ २
श्रीकृष्ण म्हणे, 'केवळ मुग्धा[2] तूं, वेदं[3] पांचवा गे! हा.' ।
राधा म्हणे, 'अजी[4] हा पण न करुनियांच, वांचवा गेहा.[5]' ॥ ३
श्रीकृष्ण म्हणे, 'राधे! मुग्धे! गांधर्व पांचवा समज, ।
समचि सुखद सर्वहि हे, ठावे कविमतिस, पांच वास मज.'॥ ४
राधा[6] म्हणे, 'न गा, हो! स्वकरा सांवरुनि, गा नयज्ञकरा, ।
वाचाळ हो! तरि तुम्ही जाच कसे, करुनि गान, यज्ञ करा.' ॥ ५
श्रीकृष्ण म्हणे, 'राधे! न रुसे[7] हें सामगान[8] यज्ञांत, ।
गानावांचूनि सख्ये! यज्ञ नसे सामगा[9] नयज्ञांत.' ॥ ६
राधा म्हणे, 'न मागति भलतें, देति न जुने नवे दाते, ।
जे वेदज्ञ, विलंबिति, नाकीं याया, 'जुंने[10] न वेदा ते.' ॥ ७
श्रीकृष्ण म्हणे, 'सुंदरि! पुरवावी अर्थिकामना[11] कीं ते, ।
वेदीं मुख्यचि झाले, पूर्ण[12] करुनि अर्थिकाम, नाकी[13] ते. ॥ ८
राधा म्हणे, "मुखांबुज हो न श्रमि तव, सुपात्र पाहीन, ।
देईन देय रुचतां, नच मत[14] अमितवसुपा[15] त्रपाहीन[16]. ॥ ९
मागों नये पदार्थ झाल्यानें सुगुरुकृत[17] पशो[18]! भलते, ।

---

१. गाण्यांतील आलापांनीं. २. वेडी, अडाणी. ३. गायनकला हा पांचवा वेद. याला गांधर्ववेद म्हणतात. ४. 'त्यजीं' असा पाठभेद. ५. कुळाचें नांव राखा. अशा प्रकारचा पण—प्रतिज्ञा—करूं नको; कारण तो खास खोटा ठरून, तुझ्या कुळाला मात्र डाग लागेल.—हा या अर्धाचा भाव. ६. गीतीचा अन्वयः—राधा म्हणे, 'हो! न गा; स्वकरा सांवरुनि (=आवरून, आखडून), नयज्ञकरा [=नीति जाणणाऱ्या सुशील पुरुषांच्या (सत्कृति आचरणाऱ्या) करा (=हाताला)] गा (=स्तवा). वाचाळ हो! (=अरे, पानचटांनो!), तरि (=तर मग) तुम्ही जाच कसे; [आणि] गान करुनि (=गांधर्ववेदाचें पठण करून) यज्ञ करा.' ७. रुसत नाहीं, मुकें बसत नाहीं. ८. सामवेदांतील ऋचांचें गायन. सामवेदांतील ऋचा तालस्वरबद्ध पद्धतीनें म्हणावयाच्या असतात. ९. साम गाणाऱ्या (=सामवेदी) व सभ्य पद्धतीचें मर्म जाणणाऱ्या लोकांत. १०. 'चुने' (?) असा पाठभेद. ११. याचकाची मनीषा. १२. 'पूज्य' असा पाठभेद. १३. देव. 'नाकीं' असा पाठभेद. 'याचकांच्या इच्छा पूर्ण केल्यामुळेंच, देवांना तरी वेदांत महत्व मिळालें आहे.'—हा या गीत्यर्धाचा मतलब. १४. मान्य, कबूल. १५. अलोट संपत्तीच्या मालकाला. १६. निलाजरा, कोडगा. १७. थोरांसाठीं तयार केलेले, श्रेष्ठांकरितां बनविलेले. हें 'पदार्थ'शब्दाचें विशेषण. १८. हे मूर्खा, बैला! या शब्दावर एका हस्तलिखित पोथींत 'हे गोपाळा!' अशी टीप आहे. 'यशो!' असा काव्येतिहाससंग्रहाचा पाठ.

कोण म्हणेल, 'सुरांच्या[२], पात्रप्रिय[१] पुरवितां न शोभ, लते!'" ॥ १०

श्रीकृष्ण[३] म्हणे, "न म्हणति, द्यावें फल पुष्प नव, सुर तदा 'न;' ।
शुभ काय दान न वदति? हित समजुनि देच नवसुरतदान." ॥ ११

श्रीकृष्ण[४] म्हणे, 'समुचित कांचनघटदान, सुगतिगजदान, ।
विधिनिर्मितामृतांशुप्रतिनिधिदानहि[५] यथार्थ हें मान.' ॥ १२

राधा म्हणे, 'यश नसे, जें दुर्लभ वस्तु, तदभिलाखांत[६], ।
एकहि नसेल धर्मन्यायरहित पूर्णकाम लाखांत.' ॥ १३

श्रीकृष्ण म्हणे, "पात्रीं द्यावें, मानुनि घनासमान वया[७]. ।
राधे! बळेंचि म्हणती पात्रातें 'घ्या धनास,' मानव 'या'-" ॥ १४

राधा म्हणे, 'हंसें ये, हे आइकतांचि बोल कानांहीं, ।
स्वार्थपर[८], अनळस[९], असा वाटे कोठेंहि बोलका नाहीं.' ॥ १५

श्रीकृष्ण[१०] म्हणे, 'न म्हणति गुरु लघु सुरगुरुपदा, न ते लिंगा, ।

---

१. योग्य-लायक-मनुष्यांचे मनोरथ. २. हे देववल्ली! हे कल्पलते! ३. गीतीचा अन्वय:— श्रीकृष्ण म्हणे, 'नव फलपुष्प द्यावें, तदा (=तेव्हां, तसें केलें असतां) सुर 'न' (='तें आम्हांला नको') [असें] न म्हणती; [किंबहुना] काय (=कोणतें) दान शुभ (=मंगल, पुण्य देणारें) [आहे, असें] न वदती ? [=असें कोणतें दान आहे कीं जें दिलें असतां पुण्य लागतें, असें म्हणत नाहींत? कर्त्याच्या पदरांत पुण्याचें माप घालणारें प्रत्येक दान आहे, असेंच सर्व म्हणतात]. [तर मग] हित (=हितकारक, कल्याणकारी) समजुनि[मला] नव सुरतदान (=अपूर्व असें शरीरसंभोगाचें दान) देच. काव्येतिहाससंग्रहांतील या गीतीचा पाठ:—श्रीकृष्ण म्हणे न म्हणति द्यावें फलपुष्पनवसुरतदान । शुभ कायदान न वदति हित समजुनि दे च नवसुर तदा न. ॥ ४. ही गीति काव्येतिहाससंग्रहांतील प्रकरणांत आढळत नाहीं. परंतु ती आमच्या जवळील हस्तलिखित पोथींत आहे. ज्या अर्थी ११ व १२ या दोनी गीती कृष्णाच्याच असून, त्या दोहोंचा आरंभ 'श्रीकृष्ण म्हणे' या शब्दांनीं झाला आहे, त्याअर्थी या दोन गीतींच्या मध्यंतरीं एक राधेची गीति गाहाळ झाली असली पाहिजे, हें उघड आहे. ५. शास्त्रोक्त विधीनें बनविलेल्या चंद्रप्रतिमेचें दान. ११ व १२ या गीतींतील 'फल,' 'पुष्प,' 'कांचनघट,' 'सुगतिगज' व '°अमृतांशुप्रतिनिधि' ह्या शब्दांवर श्लेष ध्वनित केले असून, त्यांचा लावण्यवती राधिकेशींही संबंध लावावयाचा आहे. ६. तदभिलाषांत, त्याच्या इच्छेंत. ७. आयुष्य किंवा तारुण्य हें मेघाप्रमाणें चंचळ आहे, असें समजून. ८. आपला मतलब साधण्याविषयीं तत्पर. ९. निराळशी, उद्योगी. १०. गीतीचा अन्वयार्थ:—श्रीकृष्ण म्हणे, '[स्वार्थपर व अनळस बोलके असले, तरी] ते गुरु सुरगुरुपदा(=बृहस्पतीच्या पदवीला) लघु न म्हणति, [किंवा] गुरु लिंगा (=शिवलिंगा) लघु न म्हणति [=ते उगाच मोठ्याला लहान म्हणण्याचें खोटसाळपण करीत नाहींत]; [उदाहरणार्थ

दानीं लोभी बहु, तरि अनुचित बोले कदा न तेलिंगा.' ॥ १६
राधा म्हणे, 'घनाभा[1]! दानाचा लाभ हा निराळ्यांतें, ।
शालींशीं सरि करितां, धरितां हट, लाभहानि राळ्यांतें.' ॥ १७
श्रीकृष्ण म्हणे, 'देणें न चुके, दे दान, जनित[2]माराधे! ।
पाहें उत्तम[3]वस्तूत्पन्नमहालोभजनि तमा[3] राधे!' ॥ १८
राधा म्हणे, 'न चाले हरि! बळ, हे परवधू कनक[4]लंका, ।
सोडा मार्ग; तुम्हांसीं लाविल वदतां मला जन कलंका.' ॥ १९
श्रीकृष्ण म्हणे, 'राधे! जैसा दशवदनहतक[5] लंकेला, ।
नाहीं[6] न्हाया[6] बसला वरुनि तुला गर्व गतकलंकेला[7].' ॥ २०
राधा म्हणे, 'अघ[8] वधी त्यांस, बळें जे परांगना हरितें; ।
रामा तसें पराही[9] अन्यहृत[10] कलत्र[11] तत्त कीं[12] करितें.' ॥ २१
श्रीकृष्ण म्हणे, 'सत्यचि वदसि, म्हणुन हरिन आपली नवरी, ।
वळसिल तूंहि, क्षणभरि विरहें कोपोनि तापली[13] न वरी.' ॥ २२
राधा म्हणे, 'अगाई! चाल, सखे! कृष्णजी बरे शिकलां, ।
नवरी कोण? गळपडू गोपीभाग्यें[14] व्रजीं बरे टिकलां!' ॥ २३
श्रीकृष्ण म्हणे, 'राधे! पूस यशोदेसि; काय भय? जा, गे! ।
नव्हती म्हणत मज तुझा नवरा? सत्यांत धर्मजय जागे.' ॥ २४

---

पहा], तेलिंगा [जरी] दानीं बहु लोभी, तरि कदा [ही] अनुचित (=अयोग्य) न बोले (=बोलत नसतो). [तिव्हां मी जरी स्वार्थपर, अनलस व वडवड्या असलों, तरी असत्यवादी नाहीं.—हा कृष्णाचा मतलब.]

१. मेघकान्ते, मेघश्यामा! २. जनित+मार+आधे=उत्पादित+मदन+बाधे=उत्पन्न केली आहे मदनबाधा जिनें अशा! काव्येतिहाससंग्रहाचा पाठः—जनितमा राधे. ३. सुंदर वस्तूनें उत्पन्न झालेली [तिच्या प्राप्तीची] जी आशा—लालसा—तीच आहे जनि (=जन्मस्थान, उत्पत्तिहेतु) ज्याची अशा तमा (=अंधकाराला, उदासीनतेला, दुःखाला). या अर्धाचा काव्येतिहाससंग्रहांतील पाठः—पाहे उत्तम वस्तूत्पन्नमहालोभ जनितमाराधे. एका पोथींतील पाठः—पाहे उत्तम वस्तू सत्र महालोभ जनिं तमा राधे. ४. सोन्याची लंका, अलभ्य वस्तु. ५. दुष्ट रावण. ६. नाहींसा होण्याला, नाश पावण्यासाठीं. ७. निर्मळेला, मळहीनेला. ८. पाप. ९. दुसऱ्यालासुद्धां १०. दुसऱ्यानें पळविलेलें. ११. भार्या, पत्नी. १२. हें 'निश्चयबोधक' अव्यय आहे. १३. संतप्त झालेली [नवरी]. १४. पाठभेदः—गोपीं भाग्यें.

राधा म्हणे, 'स्व[1] अनयें विटवितसां कां बळी दिलीपें[2] गडी? ।
हिसकुनि घेत्यें तुमची हे मुरली, कांबळी, दिली पगडी.' ॥ २५

श्रीकृष्ण म्हणे, 'मुरली टाकूनि दिली[3] हिरोनि कुंजांत ।
दे हुडकुनि, न शिरेनचि एकाकी मूर्ततिमिरपुंजांत.'[4] ॥ २६

राधा म्हणे, 'पहा जा, व्हावी जरि हे मनःप्रिया मुरली; ।
कांहीं निजप्रतिष्ठा न उरेल तुम्हांमुळें, म्हणुनि झुरली.' ॥ २७

श्रीकृष्ण म्हणे, 'घ्यावी मुरलीदंडार्थ[5] एकदा[6] महि[7] म्यां, ।
मिटक्या देउनि, देणें अमृताच्या लाज एकदा[8] महिम्या.'[9] ॥ २८

राधा म्हणे, 'उगे, हो! चोर! उगे, घेतलेंत [10]बांधून, ।
कळले रसगुण, पुनरपि तेचि पहावे कशासि रांधून.' ॥ २९

श्रीकृष्ण म्हणे, "आपण देतचि होतीस सुरस दामातें,[11] ।
अमृत प्राशुनिहि,[12] म्हणत होते 'बहु धन्य' सुर सदा मातें." ॥ ३०

राधा म्हणे, "चला, हो! गेले गांवास काय मामाजी? ।
अथवा आहेचि घरीं, म्हणवी बांधूनि माय, 'मां,[13] मां,[13]' जी." ॥ ३१

श्रीकृष्ण म्हणे, "मजला बांधावें, चित्त याचि जरि कामीं, ।
तरि बांध या भुजांहीं; पाहें, राहें रुसोनि न रिकामी." ॥ ३२

राधा म्हणे, "करावा अरसाचा[14] आद्य[14] वाद काशाला? ।
उत्तर देइनचि तुम्हां, जसि देती वाद्यवादका शाला.[15]" ॥ ३३

---

१. अनीतीनें, हलकटपणानें. २. हा एक इक्ष्वाकुवंशांतील राजा होता. याची न्याय, नीति व सुशील यांविषयीं फार ख्याति होती. 'विश्वसह तनय त्याचा, त्याचा सुत जिष्णुचा दिलीप गडी। ज्या प्रभुनें अनताची हरलीच, नता जना दिली पगडी.'—मोरोपंती हरिवंश (१।८३). ३. दिलेली. ४. प्रत्यक्ष काळोखाच्या राशींत. कुंजांत लता व झुडुपें यांची विलक्षण गर्द गुंतागुंत असल्यामुळें, त्यांत निबिड अंधेर पडला होता, म्हणून त्या कुंजाला 'मूर्ततिमिरपुंज' म्हटलें आहे. ५. मुरली हरवली तर तिची भरपाई करण्यास्तव, मुरलीच्या नुकसानीबद्दल. ६. एकदम. ७. पृथ्वी. काव्येतिहाससंग्रहकारांनीं पूर्वार्धांत या ठिकाणीं 'एक दाम हि म्यां' असा पाठ घेतला आहे व 'दाम' या शब्दावर 'दोरी' अशी टीप दिली आहे. ८. एक वेळ. ९. महत्वाला, कीर्तीला. १०. एकदा फार त्रास दिल्याबद्दल कृष्णाला यशोदेनें दाव्यानें बांधून ठेविलें होतें.—या गोष्टीवर येथें कटाक्ष आहे. ११. माळेला, हाराला. १२. या अर्धांत **'विभावना'** आहे. १३. नको, नको; बांधूं नको, मारूं नको. १४. नीरस वस्तूंतील पहिला, अत्यंत नीरस, शुष्क, रिकामा, वायफळ. १५. घर. 'ज्याप्रमाणें वाद्य वाजविणाराला त्याच्याच वादनाच्या प्रतिध्वनिरूपानें घर उत्तर देतें, त्याप्रमाणेंच मीही तुला तुझ्याच शब्दांनीं उत्तर देईन; मी जशास तसेंच उत्तर देईन; तुझेच शब्द उलट तुझ्या अंगावर फेकीन.

श्रीकृष्ण म्हणे, "'उत्तर देइनचि' असें जसेंच वदलीस; ।
'दानहि देइन' म्हण; हठ कर्पूरासीं न योग्य कंदलीस." ॥ ३४
राधा म्हणे, "असें मी, जा घ्या हुडकुनि तुम्हीच ती मुरली. ।
जरि मेळवाल गेली, जी दानेच्छा, म्हणाचि, ती पुरली." ॥ ३५
श्रीकृष्ण म्हणे, "राधे! घेइन तुजपासुनीच मुरलीला. ।
मी एकलीस जाऊं नेदीं; गिंवसील कोण झुरलीला? ॥ ३६
याही तुझ्या सखीला मी ठेउनि घेईनाचि ओलीला, ।
कुल्या जातां, तृषिता तीच्या चाटूनि काय ओलीला?" ॥ ३७
राधा म्हणे, "सखीसह जाउनि, हुडकीन मीच; हें राहो. ।
नवनीताची हांडी रक्षा; दूरुनि उगेचि हेरा हो!" ॥ ३८
कृष्ण म्हणे, "व्यसन मला लावियलें शिशुपणांत नवनीतें. ।
म्हणसील, 'भक्षिलेंचि स्पष्ट.' प्रेक्षित बसेन न वनीं तें." ॥ ३९
राधा म्हणे, "करावें प्रियसखि! आतां असें कशाला? गे! ।
अजि न म्हणेन तसें मी, अनृतोक्तें डाग कीं यशा लागे." ॥ ४०
श्रीकृष्ण म्हणे, "राहो आलि तुझी, चाल मीहि शोधीन. ।
नाहीं तरि, निजमुरलीदान न मिळतां, असेंचि रोधीन." ॥ ४१
राधा म्हणे, "हठचि बहु करितां, तरि मी अशीच राहेन. ।
शून्याचि काय जगती? साहेन उगीच, वाट पाहेन." ॥ ४२

---

१. कापुराची उत्पत्ति कदली—कर्पूरकदली–पासून होते, असा कविसमय आहे. तेव्हां जीपासून आपली उत्पत्ति, त्या कदलीबरोबरच हठवादीपणा करणें, कापुराला योग्य किंवा हितावह होणार नाहीं, हें उघड आहे. **दृष्टान्त.** २. गिंवसणें=गवसणें, सांपडणें. ३. जामिनाला घेणार नाहीं, जामीन म्हणून घेत नाहीं. "राधे! तूं तर इतकी झुरली आहेस कीं तूं एकदां हातची गेलीस कीं पुन्हां सांपडण्याची आशा नको. तेव्हां तुला एकटीला मुरली शोधण्याला मी जाऊं देणार नाहीं. बरें, कदाचित् तूं म्हणशील कीं, 'मी गेलें, तरी पण माझी मैत्रीण मी मागें ओलीस ठेवितें. ती माझी जामीनदारी पत्करील.' पण मी साफ सांगतों कीं, तुझी मैत्रीण मला जामीन नको. ओली=जामीन. ४. नदी. ५. काव्येतिहाससंग्रह-पाठ—'तीचा'. ६. ओलाव्याला. **दृष्टान्त.** ७. पहा, नजर ठेवा. ८. लोण्यानें. ९. खोट्या भाषणानें. १०. सखी, मैत्रीण. ११. आडवीन. १२. निर्जन. 'आजच कांहीं जग ओसाड झालें नाहीं. जराशी वाट पाहीन, म्हणजे कोणीतरी येणारें जाणारें भेटेल व मग तुझी हड्डी चांगली नरम करीन'.–हा या गीत्यर्धाचा भाव. १३. काव्येतिहाससंग्रहांत ही गीति पुढील दोन गीतींनंतर छापिली आहे. परंतु तो क्रम वर्णनसंदर्भाशीं सुसंगत नाहीं. आम्हीं आदरलेला क्रम आमच्या जवळील हस्तलिखित पोथीप्रमाणें आहे.

आलि म्हणे, "सखि! याच्या पुरतिल न मयासुरादिजन[1] कपटा, ।
जा[2] कुंजीं, मुरली दे शोधुनि, नेऊनि याचि कनकपटा[3]." ॥ ४३

श्रीकृष्ण म्हणे, "राधे! मुरली कां त्वां तसी झुगारावी? ।
ती काय तव सपत्नी? गे! तीवरि नच रमा उगारा[4] वी[5]." ॥ ४४

वृषभानुजा[6] म्हणे, "किति मुरली? श्रीसहि गणी न हे[7] राधा[7]. ।
हेरीं, धांवुनि ध्या त्या दयिता[9]लाभोत्सवीं अहेरा, धां[10]." ॥ ४५

श्रीराधा होय पुढें, ब्रह्म घनश्यामकाय[11] मागोन[12]; ।
ऐशा सुयशावांचुनि, त्यासि इतर काम काय मागोन[13]? ॥ ४६

प्रभु सुप्रसन्न दे त्या कां श्रीपरि उर न राधिकालीला[14]? ।
गाय मयूर प्रेमें चिंतुनि हे सुरनराधिका लीला. ॥ ४७

(उपसंहार—इंद्रवज्रावृत्त)

हा ग्रंथ नामें '**नवदानकेली**[15]. 'क्रीडाविचित्रा,' न वदा, 'न केली.' ।
नाना स्वभक्तांप्रति भाव दावी. साक्षात् तदाज्ञा प्रतिभा[16] वदावी. ॥ ४८

---

१. मय हा राक्षसांचा शिल्पकार असून, आसुरी मायेंत अत्यंत तरबेज होता. परंतु राधेची मैत्रीण म्हणते, 'राधे! तुझें हें वाट पाहणें व या कृष्णाची खोड जिरविण्याची आशा धरणें, केवळ फुकट आहे. कारण हा कृष्ण महामायावी आहे. अग, मयासुरासारखे मोठमोठे गौड-बंगालीही या कृष्णाच्या पासंगाला जोखणार नाहींत, मग तुमची आमची काय कथा?' २. काव्येतिहाससंग्रहपाठ—'जो.' ३. सुवर्णवस्त्र धारण करणाऱ्याला, पीतांबरधारीला. ४. धिक्काराचा शब्द किंवा हावभाव. ५. करिते. 'उगारावी' असा पाठ घेतला असतांही चालेल. उगारणें=मारण्याला तयार होणें, अपकार करण्यास उठणें. ६. वृषभानूची मुलगी राधा. ७. **द्वामयमक.** ८. 'होरा' असा पाठभेद. ९. प्रियेच्या प्राप्तीच्या समारंभांत. १०. तृप्त व्हा, संतोष पावा. ११. मेघाप्रमाणें नीलकान्ति आहे काय (=देह) ज्याचा असा. १२. पाठीकडून. १३. याचना करून. 'अशा या मनमोहन चरित्राशिवाय, त्या परमेश्वराच्या लीलावताराजवळ दुसऱ्या गोष्टी मागण्यांत काय अर्थ आहे? अशा हरीजवळ कांहीं मागणें असेल, तर त्याचे यशाचें श्रवण व कीर्तन हेंच मागावें.'—असें कवि या गीत्यर्धांत म्हणतात. १४. त्या राधा नांवाच्या सखीला. १५. केली=क्रीडा. १६. काव्यस्फूर्ति किंवा ज्ञानस्फूर्ति. या प्रकरणाची एक प्रत आम्हांला रा० रा० वि० ल० भावे, ठाणें, यांनीं कृपा करून दिली.

## १४ स्मरणी.[1]

(सारंगवृत्त.[2])

श्री**वि**ठ्ठला! 'साधुवृंदांत दे वास,' हें मागतों बा! तुला देवदेवास. ।
यावें मुखाला सदाही तुजें नाम, चित्तीं नसो **पां**डुरंगा! दुजा काम[3]. ॥ १
श्री**ज्ञा**नदेवा! तुज्या सर्व **ओ**वीस गातों, म्हणें, 'तूंचि विश्वास होवीस;' ।
जैसी कृति, स्पष्ट तैसी तुजी उक्ति[4], देती समस्तां जडांलाहि हे मुक्ति. ॥ २
बा! **ना**मदेवा! तुजे साजिरे बोल, **वि**त्तेश[5]संपत्ति यांचें नव्हे मोल; ।
येतोचि हे[6] ऐकतां विठ्ठला डोल[7], सद्वृंद[8] होतेंचि सेवावया लोल[9]; ॥ ३
बापा **तु**कोबा! **अ**भंगीं तुज्या भक्तिवैराग्य, अन्यत्र ऐसी नसे शक्ति; ।
केली समस्तीं जनीं त्वां दया फार, दावी मलाही भवाम्भोधिचा पार[10]. ॥ ४
बा! **ए**कनाथा! दयाळूंत तूं थोर, दीना जनांचाचि भारी तुला घोर[11]; ।
त्वां अंत्यजाचें[12] कडे घेतलें पोर; तारीं, जसे कोटि, तैसाचि हा [13]**मो**र. ॥ ५
**द**त्ता! तुजी कीर्ति गाईन मी गोड; सत्ता[14] करी[14] सत्य[14], मत्ताप[15] हा [16]खोड; ।
मत्तारिषड्वर्ग[17] बा! एकदा मोड, लत्ता हरी **का**लियाची कसी [18]खोड? ॥ ६
श्री**पुं**डरीका! जगीं एक तूं धन्य, भक्तांत न त्वत्सम श्रेष्ठ बा! अन्य; ।

१. ईश्वर व साधुसंत यांचीं नांवें, चरितें, व वचनें, यांचीच जपमाळ पंतांनीं घेतली होती, हें या प्रकरणावरून उघड दिसत आहे. स्मरणी=जप करण्याची माळ. २. या वृत्ताचें लक्षण:– **तां**ची जयीं चौकडी येइ पादांत, बारा बरीं अक्षरें तेंचि **'सारंग'**। 'देवा! तुझ्या नामसंकीर्तनीं चित्त रंगो, जसा गीतनादांत सारंग. ॥ ३. इच्छा. ४. वचनें. ५. कुबेराची दौलत. ६. हे बोल. 'हें' असा पाठ आढळतो. ७. विठ्ठला डोल येतो=विठ्ठल डोलूं लागतो, विठ्ठल आनंदानें तल्लीन होतो. 'नामदेव कीर्तन करि, पुढें नाचे पांडुरंग,' या पदांतही हाच अर्थ गर्भित आहे. ८. साधुमंडळ, संतांचा मेळा. ९. लुब्ध, तत्पर. १०. परतीर, पैलथडी. ११. काळजी, चिंता, वेध. १२. मांगाचें. १३. मोरोपंत. १४. आपल्या शक्तीचें अस्तित्व सिद्ध कर, आपलें सामर्थ्य खरें करून दाखव. १५ माझें दुःख. १६. दूर कर, पुसून टाक. १७. कामक्रोधादि जे माजोरी शत्रु, त्यांची छकडी. १८. रग, रेंच, आग.

केला उभा देव तारावया अज्ञ, या त्वत्प्रतापासि गाती महायज्ञ. ॥ ७

वा! नारदा! फार दास स्वयें मुक्त केले तुवां, मान्य देवा तुजें उक्त; ।
ते नावडावे मना भोग, जे भुक्त; तारीं दयाब्धे! मला, हें तुला युक्त. ॥ ८

वा! मारुते! प्रेम रामीं तुजें फार, सीतेसि शोकाब्धिचा दाविला पार. ।
माहात्म्य, रामायणीं वर्णिलें [1]सार, ऐकोनियां, प्रार्थितो, 'दीन हा तार.'॥ ९

श्रीरामनामा! तुजा अद्भुत [2]व्याप; अम्हां अनाथांसि तूं माय, तूं बाप. ।
कर्णींहि येवोनि संहारिसी पाप, बाधों न देशी कधीं लेशही ताप. ॥ १०

श्रीसाधु हो! द्या यशोवर्णनीं धीर, हा बोलवावा दयेनें जसा [3]कीर. ।
याला म्हणा आत्मदासांत 'ये, सीर;' पावो पर क्षिप्र मोहाब्धिचें तीर. ॥ ११

वा! सद्गुरो! इष्टदात्यांत तूं शूर, राहों न [4]देतां तमातें, जसा [5]सूर; ।
गातां भवभ्रांतितें घालिसी दूर, वाहो मयूरावरी त्वद्दयापूर. ॥ १२

---

(उपसंहार—गीतिवृत्त.)

श्रीरामाचे करिती जैसे [6]अहितांसि [7]भल्ल भस्म रणीं, ।
श्लोक तसे [8]तेरा हे धरुत रसिक विष्णुवल्लभ स्मरणीं. ॥ १३

---

१. उत्तम. २. पसारा, संसार, गोतवळा. ३. राघू, पोपट. ४. 'दे तात मातें' असा पाठ आढळतो, परंतु तो चुकीचा आहे. ५. सूर्य. ६. शत्रूंस. ७. बाण. ८. वर छापिलेल्या प्रकरणांत बाराच श्लोक आहेत; परंतु या उपसंहारात्मक गीतींत 'तेरा श्लोक' हीं पदें आलीं आहेत; तेव्हां या प्रकरणांतील एक श्लोक कसा तरी गळला आहे, हें उघड दिसतें.

## १५. विठोबादादांची स्तुति.

(गीतिवृत्त.)

श्रीविठ्ठल निजनिजजनसद्गुणकीर्तनसुखार्थ अवतरला; ।
ज्याच्या सूक्तिश्रवणें जडही, गोष्पद करूनि भव, तरला; ॥ १
ज्याच्या वरप्रसादें वक्रा दासीहि जाहली सरला; ।
श्वानाचाही सूक्तिश्रवणसुखें ताप सुदृढही सरला; ॥ २
नेत्रांत, मुखांत, कृपा ज्याच्या हृदयांत सर्वदा वसली; ।
शब्दांत मधुरता श्री हरिच्या अंकीं जशी, तशी बसली; ॥ ३
प्रेमळ, रसिकशिरोमणि, दाता, मृदुहृदय, परम पटु, शांत, ।
कांत मुखश्री, ज्याच्या उपदेशें बहुत जाहले दांत. ॥ ४
सर्वहि 'दादा' म्हणती यास्तव, कीं दीनबंधु हा सांचा; ।
त्या जेविं सुदाम्याचा, केला बहुमान तेविं दासाचा. ॥ ५

---

१. विठोबादादा अनवेकर चतुर्मासे, या नांवाचे मोरोपंताच्या काळीं एक मोठे भगवद्भक्त हरिदास होते. त्यांचा व पंतांचा मोठा लोभ किंबहुना घरोबाच होता. त्यांच्या स्तुतिपर रचलेलें एक द्वादशश्लोकी काव्य 'विठ्ठलभक्तस्तुति' या मथळ्याखालीं मोरोपंती स्फुट प्रकरणाच्या पहिल्या भागांत १५७ व्या पानावर छापिलें आहे. त्याच विठोबादादांची स्तुति प्रस्तुत प्रकरणांत आहे. विठोबादादा व पंत यांचा अत्यंत निकट परिचय असून त्यांचा पत्रव्यवहारही वारंवार होत असे. जिजाबाई नांवाची दादांची एक बालविधवा बहीण होती, तिच्या संबंधेंही पंतांचा फार पूज्यभाव असून, ते दरपत्रांत तिला नमस्कार लिहीत असत. पंतांनीं तिच्यावर केलेली एक आर्या प्रसिद्ध आहे. ती ही:—भवभय जायास्तव त्या नमितों मी सर्वकाळ जीजीतें, । बहु भूतदया हृदयीं, रंकाची सर्व काळजी जीतें.॥ (विठोबादादा व पंत, यांच्या पत्रव्यवहारासंबंधें रा० ल० रा० पांगारकर यांचा २८।१।१९०२ या तारखेच्या केसरीपत्राच्या अंकांतील लेख पहावा.) २. आपण व आपले भक्त (विठ्ठल व विठ्ठलभक्त) यांचे गुण गाइल्यानें प्राप्त होणारें सुख स्वतः अनुभवावें व इतरांच्या अनुभवास आणून द्यावें म्हणून. ३. गोड भाषण ऐकून. ४. अज्ञान, अनधिकारी जन सुद्धां. ५. संसाररूपी सागर गाईच्या पावलाएवढ्या डबक्यासारखा क्षुद्र करून. ६. या गीतींत विठोबादादासंबंधींच्या आख्यायिकांचा उल्लेख आहे. ७. लक्ष्मी. ८. सुंदर. हें 'मुखश्री'चें विशेषण. ९. जितेंद्रिय, इंद्रियें आवरणारे. १०. या शब्दाचा 'भाऊ' असा अर्थ आहे. येथें निरुक्तिनामा अलंकार आहे. ११ खरा.

संत विठोबा दादा लहान थोरांत सांगतां, वाटे, ।
टाकुनि खेळ मुलांनीं यावें पायां पडावया वाटे. ॥ ६

---

## १६. श्रीमल्लारिविजय.[२]

(गीतिवृत्त.)

श्रीकंठा[३] जगदीशा देवा मार्तंड[४] भैरवा गावें, ।
ज्याचे आज्ञेंत सदा, रिपुंनीं सोडूनि वैर, वागावें. ॥ १
मणिचूंड[५]नगीं होते धर्मात्मज[६] सप्त भूसुर[७] महर्षी ।
[८]जे स्वप्नींही चित्तीं धरिती स्वर्गादिकां परम हर्षी. ॥ २
मणिमल्लनाम ज्यांचें, त्या असुरांहीं महर्षि ते सप्त, ।
आश्रमपद विध्वंसुनि, केले वैर[९]लब्धबळमदें तप्त. ॥ ३
सुकृति[१०]क्रीडागृह जें, नच पावावें कधींहि पुरें[११] पतितें[१२], ।

---

१. या गीति वाचून, आंग्लकवि गोल्डस्मिथ याच्या 'The Deserted Village' या काव्यांतील पुढील पंक्तींची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं:—

At Church with meek & unaffected grace,
His looks adorned the venerable place;
Truth from his lips prevailed with double sway,
And fools, who came to scoff, remained to pray.
The service past, around the pious man,
With steady zeal, each honest rustic ran;
E'en children followed with endearing wile,
And plucked his gown, to share the goodman's Smile;
His ready smile a parent's warmth expressed,
Their welfare pleased him, & their cares distressed.

२. ही कथा ब्रह्मांडपुराणांत क्षेत्रखंडांत वर्णिली आहे. याच प्रकरणावर नाझरेकर श्रीधरानें एक ओवीबद्ध काव्य रचिलें आहे. नाझरेकर श्रीधर व रंगनाथस्वामी निगडीकर यांचें मल्लारिमार्तंड हें कुलदैवत होतें. ३. श्री=(नील कान्ति) आहे कंठीं ज्याच्या अशा शिवाला. ४. शंकराचें नांव. ५. मणिचूड नांवाच्या पर्वतावर. ६. यमधर्माचे मुलगे. ७. ब्राह्मण. ८. अन्वयः—जे परम हर्षी स्वप्नींही स्वर्गादिकां चित्तीं धरिती, पाठभेद '···स्वर्गादिकामना हर्षी.' ९. (ब्रह्मदेवानें दिलेल्या) वराच्या योगानें अंगीं आलेल्या सामर्थ्याच्या मगरुरीनें. १०. पुण्यवान् पुरुषांचें विलासस्थान. ११. इंद्रपुर, अमरावती. १२. पाप्यानें. या गीत्यर्धांत लक्षणांवरून लक्ष्यवस्तूचा ( म्ह० स्वर्गाचा; इंद्रपुरचा) स्पष्ट बोध केला आहे, म्हणून हा **अवसरालंकार** झाला.

तेथें योगबळें[1] ते जाउनि, कथिती स्वदुःख सुरपतितें[2]. ॥ ४
**श**क्र म्हणे, "मुनि हो! म्यां व्हावें न धरुनि सहाय कां पैवितें[3] ? ।
**मणिम**ल्लतेज मजला जरि तें म्हणवुनि न 'हाय' कांपवितें." ॥ ५
मुनि म्हणती, "**सु**रपति तूं, त्रिभुवन रक्षावयासि दक्ष[4] महा, ।
अस्मद्विधिनें सांप्रत केला, सुक्षम[5] असोनि, अक्षम, हा!" ॥ ६
"[6]**वि**धिनें अजेय केले जे कुरवा, **वे**दसुरव मुनि! हो! ते ।
**प्र**भु **ह**रिच वधिल; शकते, तरि अजयी कोण सुर वमुनि होते ?" ॥ ७
**वै**कुंठीं **प्र**भुतेजें स्वमनींच्या पैंळविती[7] ऋषि तमातें[8]. ।
**वि**ष्णु म्हणे, "भेटाया आले, जैसे ह्रदा[9] तृषित, मातें. ॥ ८
तुमचें चिंतित जें, श्रुत[10] या मत्कर्णांसि आर्य! हो! तें हो; ।
तुमच्या तेजेंचि तुह्मा साधूंचें सिद्ध कार्य होतें, हो!" ॥ ९
स्तवुनि मुनी कथिती [11]जों, '**मणिम**ल्ल करावया परासु[12] चला,' ।
श्री**वि**ष्णु म्हणे, "मुनि हो! सिद्धिकर उपाय हा बरा सुचला. ॥ १०
येतों मीहि, विनिश्चित निववील, तुम्हासि अंधकाराती[13] ।
तद्दृष्टि[14] जसी **का**मा क्षण नुरविल याहि अंधकारा[15] ती. ॥ ११
सांगुनि **म**हेश्वरातें **म**ल्लरचितदुःख सर्व तापवि तें[16], ।
**प्र**भुतें विनवूं तापा नाशाया, जेविं पर्वता पैवितें[17]." ॥ १२
ऐसें **वि**ष्णु विचारुनि[18] जाय ऋषिसमेत **शं**भुशैलास, ।
दर्शन होतांचि हरी ताप जसा **शि**व तसाचि **कै**लास. ॥ १३

---

१. आपल्या अध्यात्मविद्येच्या दिव्य सामर्थ्यानें. २. इंद्राला. ३. वज्राला. ४. सावध. ५. समर्थ. या अर्धांत **विरोधाभास** आहे. ६. अन्वयार्थः–वेदसुरव मुनि हो (=वेदांचा शुभ घोष करणाऱ्या मुनींनो) जे (मणिमल्ल) विधिनें (=ब्रह्मदेवानें) [वर देवून] कुरवा अजेय केले (=दुःखोद्धाराला अजिंक्य केले, दुःखाला अप्राप्य केले) ते (मणिमल्ल) प्रभु हरिच वधिल; (जर इतर देव) शकते, तरि (=तर) कोण सुर वमुनि (=रक्त ओकून, निःशक्त होऊन) अजयी होते (=पराभूत होते)? या गीतींतील भाषण इंद्राचें आहे व मागील गीतींतील मुनींचें आहे. तेव्हां या दोन गीतींमध्यें आणखी एकादी संदर्भ दर्शविणारी गीति असावी असें वाटतें. ७. पा० भे०–'कळविती.' ८. [दुःखरूप] अंधकाराला. **समासोक्ति.** ९. सरोवराला. **उपमा.** १०. अन्वय–तें या मत्कर्णांसि श्रुत हो (=होवो). ११. पा० भे०–'जे.' १२. प्राणरहित. १३. अंधक+अराति=अंधकासुराचा शत्रु, शंकर. १४. त्याची नजर. पा० भे० 'ते दृष्टि.' १५. या तुमच्या दुःखाला. **उपमा.** १६. तापविणारें. १७. वज्राला. **वाक्योपमा.** १८. विचार करून.

प्रभुनें स्तविलें विभुला, कळवी [1]मणिमल्लदंभतापातें, ।
जाणों मदांधमूषककृत [2]बाळव्याळ दुःख [3]बापातें. ॥ १४
खलपीडितविप्रश्रम परिसुनि धरि [4]वामदेव रागातें, ।
ज्या [5]पुरहरा, शचीच्या जैसें सुर[6]धाम देवरा गातें. ॥ १५
[7]विश्वविलक्षण जैसें [8]कनककशिपुच्या वधार्थ रूप हरी, ।
मणिमल्लवधार्थ तसें तत्कालचि [9]साधुपाळ देवें धरी. ॥ १६
'मार्तंड भैरव प्रभु,' वदले सुर उग्ररूप पाहूनी, ।
स्तविते झाले प्रभुच्या [10]चरणयुगीं मस्तकासि वाहूनी. ॥ १७
[11]बहुसारमेयसेना आवडली, उधळिली [12]हरिद्रा ज्या; ।
आज्ञा करूनि आणी सबला शक्रादिकां [13]हरिद्राजां. ॥ १८
प्रभु [14]घृतमारी प्रथमचि निर्मी, क्षितिवरि जटांसि आपटुनी; ।
प्यावें त्या [15]करुनि सदा शुद्धयशोमृतघटांसि 'आं' पटुनीं. ॥ १९
गण सप्तकोटि झाले सिद्ध स्वभुजांसि सर्व थापटुनी, ।

---

१. मणिमल्लांच्या माजुरीपणानें दिलेल्या त्रासातें. २. सापाचें पिलूं. ३. आपल्या बापाला म्ह० मोठ्या सापाला. **उत्प्रेक्षा.** ४. शंकर. ५. अन्वयार्थः—जैसें सुरधाम (=स्वर्ग) शचीच्या देवरा (=उपेंद्राला, विष्णूला) गातें (=स्तवितें), (तसें) ज्या पुरहरा (=शंकराला) (गातें). मयासुरानें असुरांसाठीं स्वर्ग, अंतरिक्ष व पृथ्वी या तीन ठिकाणीं अनुक्रमें एक सोन्याचें, एक रुप्याचें व एक लोखंडाचें अशीं तीन शहरें बांधलीं. हीं शहरें शिवानें जाळून टाकिलीं, म्हणून त्यास 'पुरहर' किंवा 'त्रिपुरहर' असें म्हणतात. शची=इंद्राणी, इंद्रपत्नी. शचीचा देवर=शचीचा दीर, विष्णु. विष्णु वामनावतारीं इंद्राचा धाकटा भाऊ झाला, अशी कथा आहे. ६. पा० भे०—स्वर्ग वामना गातें. ७. विश्वांत न आढळणारें असें चमत्कारिक. ८. हिरण्यकशिपूच्या. ९. सज्जनाचें रक्षण करणारा शंकर. १०. दोन्ही पायांवर. युग=जूग, जोडी. ११. शंकराच्या मार्तंडभैरवावतारांत त्याच्या भोंवतीं चवताळलेल्या व मोठमोठ्यानें भोंकणाऱ्या कुत्र्यांची जी टोळी होती, तीस अनुलक्षून हें वर्णन आहे. "मार्तंडभैरवं रूपं बभार सहसा विभुः ॥ **क्रुध्यमानमहाराव—सारमेयसमाकुलम्** ॥ सप्तकोटिगणाकीर्णं पिशाचावलिपालकम् ॥ ३०" मल्लारिमाहात्म्यम् । अष्टमोऽध्यायः । १२. हळद. १३. दिक्पालांना. हे आठ आहेत—इंद्र, अग्नि, यम, नैर्ऋति, वरुण, वायु, कुबेर आणि ईश. १४. शंकरानें जटा आपटल्यावरोबर एक दिव्यमूर्ति महामारी उत्पन्न झाली. हिचें तेज दावानळाप्रमाणें होतें. त्यांत त्या सप्तर्षींनीं तिच्यावर घृत सिंचन केलें. म्हणून तिला घृतमारी हें नांव प्राप्त झालें, तिच्या दाढा व जिव्हा विशाल व भयजनक होत्या. तिच्या हातांत नाना तऱ्हेचीं शस्त्रें असून, तिचा आवाज फारच विक्राळ होता. १५. 'आ' करुनी=तोंड पसरून, मोठ्या उत्सुकतेनें.

**श**क्रादिक लोकपतिहि; यश मिळवावेंचि सर्वथा पटुंनीं[1] ॥ २०
**स्व**जनां देती हर्ष **प्र**भुसेनेचे परांसि[2] धाक थवे; ।
**को**णासहि[3] न सविस्तर समरोत्साह प्रकार हा कथवे. ॥ २१
**श**क्रादिदेवसेना ज्या[4] वाहन[4] शक्रदेवसमयाचें[4] ।
**हरिवि**धिहि सबल[5] आले ते ज्ञाते[6] सर्व[6] देशसमयाचे[6]. ॥ २२
**गण**पतिरवि**वि**धिशशिहरि**लो**कपसेना स्वयें निवेदून[7], ।
**गुह**[8] गुरुसि[9] नमी, ज्याचे पदनीरज चिंतुनी निवे दूनं[10]. ॥ २३
**मा**र्तंडभैरव **प्र**भु सबल वृषारूढ[11] जेधवां चाले, ।
**झाले** कंपित गिरिवर, भूमंडळ सर्व थरथरां हाले. ॥ २४
**मल्ल** म्हणे "मारा, रे! आणितसे दूत[12] मंद[13] राग मला; ।
**का**सार[14] कोणता, जो दुस्तर गंभीर[15] **मं**दरा[16] गमला." ॥ २५
**वें**घुनि[17] **म**णिचूडशिरीं **मा**हेश्वर[18] सैन्य **मल्ल** तो पाहे, ।
**बाहेर** धैर्य[19] मिरवी[19], परि दुःसहभीति अंतरीं वाहे. ॥ २६
**वीरां**तें बहु वानी, वस्त्रालंकार वाहनें अर्पी; ।
**तर्पी** मद्यरसेंही; भटदहनेंचि[20], वीरपान[20] तें सर्पी. ॥ २७

---

१. **हुशार** मनुष्यांनीं, शूरांनीं. हा गीतिपाद **सुभाषितमय** असून, या गीतींत **काव्यलिंगालंकार** आहे. २. शत्रूंना. ३. पा० भे०—'कोणालाहि सविस्तर.' ४. अन्वयः— ज्या **शक्रदेवसमयाचें** वाहन. अर्थ—ज्या शक्रदेवाच्या आज्ञा शिरसा वंद्य मानीत. ५. सैन्यासह. ६. स्थलकालांचें ज्यांस पूर्ण ज्ञान आहे असे. ७. वर्णन करून. ८. शंकराचा मुलगा **कार्तिक**स्वामी. हा देवांचा सेनापति असल्यामुळें, कोणतीं कोणतीं व किती किती सैन्यें **आलीं** होतीं हें सांगणें त्याचें कर्तव्य होतें. ९. आपला पिता जो शंकर त्याला. गुरु=**बाप**, **व**डील. १०. दुःखी. ११. बैलावर बसलेला. १२. हेर. मल्लासुराच्या ज्या हेरानें शंकराचें **हें** प्रचंड सैन्य पाहिलें, त्यानें त्याची वर्दी मल्लाला दिली व 'आपली धडगत नाहीं' असें **सांगितलें**. त्यावर मल्ल रागानें जें बोलला, तें येथें वर्णिलें आहे. १३. मूर्ख. १४. सरोवर. १५. **खोल**. १६. कुलपर्वतांपैकीं एक. समुद्रमथनाच्या वेळीं मंदराचा मंथ्याप्रमाणें उपयोग केला होता. 'वासुकिला **नेत्र** करुनि, मंदरगिरिला करूनियां मंथा, । आदरिला क्षीरधिच्या मथनाचा दैत्यसुरबळें पंथा.' ॥ **मोरोपंत**, समुद्रमंथन १।३७. तेव्हां समुद्रमंथन करणारा जो मंदर, त्यापुढें लहानशा तळ्याचा **तो** हिशोब किती? येथें अप्रस्तुताच्या वर्णनानें प्रस्तुत सुचविलें आहे, म्हणून **अप्रस्तुत-प्रशंसा** झाली. १७. उडी मारून; चढून. १८. शंकराचें. १९. धैर्य मिरवी=धैर्य दाखवी, धैर्याची **बतावणी** करी. २०. अग्नि. ते वीर जणूं काय अग्नीच होते, व वीरपान (=मद्य) हें त्यांना तुपासारखेंच झालें! कारण त्यांनीं तें स्वाहा करितांच, त्यांना विलक्षण स्फुरण चढलें. येथें **रूपक** व **उत्प्रेक्षा** यांचा संकर आहे. सर्पी=तूप.

वैसे रथीं [1]शताक्षीं मल्लासुर; मणि महागजीं चढला. ।
परम[2]दुरासद सर्वहि भट, [3]तैलकटाह बहु जसा कढला. ॥ २८
जितक्या घेउनि आला [4]गौरीच्या प्राण [5]वल्लभा सेना, ।
तदधिकसेनावेष्टित सामर्थ्यें न्यून मल्ल भासेना. ॥ २९
ब्रह्मांडातें भरिती प्रकट करुनि [6]नादसंपदे वाद्यें; ।
मल्लेंहि सुरांसि दिला, जैसा असुरांसि कंप [7]देवाद्यें. ॥ ३०
सेनासिंधु मिळाले, त्रिजगीं अप्रतिम होय तो समर. ।
परजीवन हरितीच [8]प्रखरशरें, पद्मरस जसें भ्रमर. ॥ ३१
उठले [9]कबंध बहुशत; रक्ताच्या वाहिल्या तदा [10]सरिता; ।
गेले असुर [11]सुलोका; [12]प्रभुचा दुष्टहि पडे न दास रिता[12]. ॥ ३२
मारुनि, समरीं [13]मिरवुनि, त्या मल्लाचीं बळोद्धतें कटकें, ।
सर्व स्वगण उठविले दृष्टिसुधावृष्टिनें [14]जगद्धटकें. ॥ ३३
मग गुह मारी समरीं मल्लाच्या [15]खड्गदंष्ट्रबळपातें; ।
सुर मथिति तद्बळातें, हरिणांच्या व्याघ्र जेविं कळपातें. ॥ ३४
गणपतिनें [16]उल्कामुख वधिला [16]धरिता [16]रणांगणीं [16]हरिता; ।
मग [17]कुंतलोमजीवन नंदीश्वर देव जाहला [18]हरिता. ॥ ३५
मग मणि सेनासेनापतिनाशें होय काळसा क्रुद्ध, ।
शुद्ध यशोर्थचि धांवे जगदीशासीं करावया युद्ध. ॥ ३६
[19]विंशतिभुज तो [20]पादन्यासें दे कंप महिस [21]मायावी, ।

---

१. शंभर आहेत आंस ज्याला अशा. मूलांत 'सहस्राक्ष' आहे. २. झुजण्यास कठिण, दुर्जेय. ३. तेलानें भरलेली कढई. **उपमा.** ४. गौरीचा प्राण=शंकर. **पर्यायोक्त.** ५. आवडत्या. ६. नादरूप संपत्तीला, नादाच्या वैभवाला. ७. शंकरानें. ८. (भटपक्षीं) तीक्ष्ण बाणानें, (भ्रमरपक्षीं) तीक्ष्ण नांगीनें. **उपमा.** ९. मस्तकहीन देह, धडें, रुंडें. १०. नद्या. ही **अत्युक्ति** आहे. ११. उत्तम लोकाला, मुक्तिपदाला. १२. अन्वयार्थः— प्रभुचा दुष्टहि दास (=विरोधी भक्ति करणारे असुर वगैरे) रिता (=सत्फल मिळाल्यावांचून, मुक्तिप्राप्तीशिवाय) न पडे (=मरे). १३. (स्वतः) मिरवून=आपल्या तेजाची प्रौढी प्रकट करून. १४. सृष्टिकर्त्या शंकरानें. १५. खड्गदंष्ट्र नांवाच्या सेनापतीला. १६. रणांगणीं हरिता धरिता उल्का-मुख =समरांत सिंहस्वभाव धारण करणारा उल्कामुख, युद्धांत सिंहाप्रमाणें क्रूर व शूर असा उल्कामुख नांवाचा राक्षस. पा० भे० 'धीरा रणांगणीं हरिता'. १७. राक्षसविशेष. १८. मारिता. १९. वीस हात आहेत ज्याला असा. हें मणीचें मायावी रूप होय. २०. पाऊल टाकण्यानें, चालण्यानें. २१. कपटी.

शांतिक्षमादयालव केव्हांही ज्या न अहिसमा[1] यावी. ॥ ३७

वारुनि **गणांसि**, **भगवान्** **भैरव**[2] **मणिशीं** करि स्वयेंचि रण; ।
विखरी[3] **स्मरहर** खरतर शर सरसर, अहिमकर[4] जसे किरण ॥ ३८

शरभ[5], तुरंग, महागज, सादिन[6] **मणिदैत्य** होय, पर[7] माया ।
परमा[8] या कशि मोहिल ? न मिळे छायेसि आतप[9] रमाया[10]. ॥ ३९

शस्त्रश्रेष्ठें शूलें भेदुनि [11]मणिसें दृढायु वक्षातें, ।
पाडी **भगवान्** **भैरव** **मणितें** मायाविलासदक्षातें. ॥ ४०

मस्तक चूर्ण कराया क्रोधें श्री**देव** जों चरण उचली, ।
रुचली ती [12]गति **मणिला**, शरणागति[13] तत्क्षणीं मनीं सुचली. ॥ ४१

“[14]मी पादपीठ होउनि पादतळा, वांछितों असों देहें. ।
ध्यात्यांच्या[15] हृदयांत ध्यान स्थिर चिर असें असों दे हें. ॥ ४२

मायेनें हय झालों **देवा** ! **उच्चै**:श्रवा[16]असा वाजी ।
जो हा अश्वाकार, **प्रभुच्या** पायापुढें असावा, जी !” ॥ ४३

**भगवान्** म्हणे, “दिल्हें हें अमृतहि तुज, परमभक्त तूं **मणि** कीं; ।
वत्सा ! मद्भक्ति विरस[17] नव्हे किमपि, जळ जसे [18]वसे [18]मणिकीं.” ॥ ४४

**प्रभु** **मणिभक्तिप्रेमें** प्रेषी, रक्षावयासि **मल्ल**, **हरी**. ।
**शिव**[19]कीर्ति किति स्वच्छा ! अमृतनिधि म्हणे, ‘असी न मल्लहरी[20].’ ॥ ४५

---

१. सर्पासारख्या (राक्षसाला). २. शंकर. ३. पा० भे०—वीरावरी स्मरहर इ०. ४. सूर्य. **उपमा.** येथील ‘र’ काराची परिवृत्ति प्रस्तुत रसाला सर्व प्रकारें अनुकूल आहे. येथें ‘स्मरहर’ व अहिमकर’ हीं नामें सहेतुक असल्यामुळें **परिकराङ्कुर** झाला आहे. ५. आठ पायांचा पशुविशेष. हा सिंहाहून वलिष्ठ आहे. ६. घोडेस्वार. ७. परंतु. ८. श्रेष्ठाला, शिवाला. **दामयमक.** ९. सूर्यकिरण, प्रकाश. १०. खेळण्याला. **दृष्टान्त.** ११. हिऱ्याप्रमाणें कठिण, अशा उरःस्थळाला. पा० भे० ‘मणिशीं दृढायुवक्षातें’. १२. ती चाल, तो पाऊल उचलण्याचा प्रकार. १३. प्रभूला शरण जाण्याची क्रिया. १४. अन्वयार्थ—मी (तुझ्या या) पादतळा (=तळपायाला) पादपीठ (=पाय ठेवण्याची तिवई वगैरे) होउनि, देहें असों (=देहासह राहण्यास) वांछितों. १५. ध्यान करत्यांच्या, भक्तांच्या. १६. समुद्रमंथनाच्या वेळीं जीं चौदा रत्नें निघालीं, त्यांत एक घोडा होता. त्याचें नांव उच्चैःश्रवा. १७. (भक्तिपक्षीं) आनंदरहित, सुखहीन. (जलपक्षीं) स्वादहीन, बेचव. १८. मणिकीं वसे=मडक्यांत असणारें, मडक्यांतील. **उपमा.** १९. पा० भे० —‘किति स्वच्छा शिवकीर्ती’. २०. माझी लाट. **व्यतिरेक.**

**वि**ष्णु म्हणे, "जें [1]प्रेम **प्र**ऱ्हादीं, जाणतोसि **म**ल्ला ! तें. ।
[2]तत्कुलजा ! हित कथितों, जोडी कर **[3]काळभर्ग**मल्लातें. ॥ ४६
नमुनि **शि**वासि रहा, जा **पा**ताळीं, सबल भस्म **म**णि केला, ।
भजुनि कुमतिला बुडतो, सुसमर्थहि सर्व जेंवि [4]गणिकेला." ॥ ४७
दैत्य **प्र**भुशि म्हणे, "मी मानधनिश्रेष्ठ **म**ल्ल, [5]लाटांत ।
[5]झषसा, [6]परसेनेंत क्रीडेनचि; हेंचि [7]मल्ललाटांत. ॥ ४८
'भ्याला' म्हणतिल जन, जो मानी, सोसेल काय [8]बभ्रा त्या? ।
[9]अभ्रा त्यागिल [10]बर्हीं, परि मी विसरेन पळहि न [11]भ्रात्या. ॥ ४९
[12]इच्छिति पररक्तांजलि, सिद्ध रणीं हा तदर्पणातें हो, ।
भट हर्षीं असितें दे बाळ जसा हात दर्पणातें, हो!" ॥ ५०
कल्पन[13]गादिक ज्याचा प्रणतां सर्वार्थ पादपल्लव दे, ।
त्या **वि**ष्णुला असें तो मानी, [14]फुगवूनि गल्ल, **म**ल्ल वदे ॥ ५१
[15]हांसुनि म्हणे, "तरि तुम्ही, [16]इषु मी, भू तीच वल्ल [17]भल्लभ, या." ।
बहु कोटिसैन्य घेउनि शीघ्र निघे न धरि **म**ल्ल **भ**ल्ल[18]भया. ॥ ५२
तों **घृ**तमारी मारी तुडउनि रगडुनि रणांत अहितांतें, ।
फळसम लक्षी, भक्षी शस्त्रकवचवाहनादिसहितांतें. ॥ ५३

---

१. माझें प्रेम. २. त्याच्या (=प्रल्हादाच्या) कुळांत जन्मलेल्या. ३ कालरूप जो शिव मल्ल, त्याला. ४. वेश्येला. या सबंध गीतींत **अर्थान्तरन्यास** आहे व द्वितीयार्धांत **उपमा** आहे. द्वितीयार्ध सुंदर **सुभाषित** आहे. ५.जसा (समुद्राच्या) लाटांत मासा तसा; झष=मासा. ६. शत्रु-संन्यांत. ७. माझ्या नशिबीं. ८. बोभाटा, अपकीर्ति, जनापवाद. येथें **अर्थान्तरन्यास** आहे. ९. मेघाला. १०. मोर. ११. भावाला. येथें **असंभवा**लंकार असून **व्यतिरेक** आहे. १२. अन्वयार्थः—(माझे बंधु, गोत्रज वगैरे) पररक्तांजलि (=शत्रूंच्या रक्ताच्या ओंजळी) इच्छिति, (व) हा (=मी) तदर्पणातें (=पररक्तांजलि देण्याला) रणीं सिद्ध हो (=होवो). हो ! भट (=वीर) हर्षीं (=हर्षानें) असितें (=तरवारीला) हात दे, जसा बाळ हर्षीं दर्पणातें (=आरशाला) हात दे. **उपमा.** १३. अन्वयार्थः—ज्याचा पादपल्लव (=पादरूप पल्लव, कोंवळ्या पालवीसारखा पाय) प्रणतां (=नम्रांना, भक्तांना) कल्पनगादिक (=कल्पवृक्ष वगैरे) सर्वार्थ (=सर्वप्रकारची संपत्ति) दे (=देतो). १४. गाल फुगवून, मोठ्या तोऱ्यानें. १५. अन्वयः—[तो] हांसुनि म्हणे, 'तरि तुम्ही या; मी इषु [व] [जी] भू तीच भल्लभ (=बाणासारखें) वल्ल (=आच्छादान, आस्तरण) [होय].' 'तुम्ही लढावयाला या, म्हणजे मी तुम्हास बाणाप्रमाणेंच झोंबेन व ही भूमीही तुम्हांला बाणाचेंच अंथरूण होईल.'—हा या अर्धाचा भाव. १६. बाण. १७. भल्लांप्रमाणें (=बाणांप्रमाणें) भा (=कांति, शोभा) ज्याची असें. १८. शिवाचें भय.

निजकटकक्षय करितां घृतमारी,[1] तोडि तीस तो मल्ल; ।
ती तद्बाहु च्छेदी, विकसित[2] करि सर्वदेवतागल्ल. ॥ ५४
पहिला जसा, तसाचि प्रकटे तत्काळ बाहु मल्लाचा; ।
ज्याचा स्पर्श सुदुःसह, जैसा खरगरळदिग्ध[3] भल्लाचा. ॥ ५५
भूमितलीं गगनींही मल्ल महावीर, होउनि क्रुद्ध, ।
घृतमारीशीं, नाना शस्त्रें सोडोनियां, करी युद्ध. ॥ ५६
शिरले घृतमारीच्या सर्वांगीं संगरीं प्रखर[4] रोपें, ।
तेव्हां मार्तंड प्रभु हटकी,[5] मल्लासुरीं करी कोप. ॥ ५७
उपहास[6] मल्ल करि, परि[7] रक्षी स्मरकाळ, कोप हा साचा ।
न धरीच सदय[8] हृदयीं, जेंवि जनक बाळकोपहासाचा. ॥ ५८
जलदाद्यस्त्रें[9] वारी मल्ल ज्वलनादिकें[10] महेशास्त्रें,[11] ।
भगवत्तत्व[12] समजती असुर, न वेदें, तथा न हे शास्त्रें. ॥ ५९
मग योजिलें महेशें, जें[13] मळवीनाचि पाशुपत नातें, ।
त्या अनिवार्य महास्त्रें पावे तो मल्ल आशु[14] पतनातें. ॥ ६०
पडतांचि शिरीं चरणीं,[15] वरें[16] दाउनि कोप, आक्रमी[17] रिपुला; ।
झाली प्राप्त स्पर्शें त्या भक्तिज्ञानसंपदा विपुला. ॥ ६१
मल्ल म्हणे, "मी आतां या सोडीनाचि पदराजीवा,[18] ।
याचे रज[19] मिळती बहुपुण्यें [20]कोटींत सांदरा जीवा. ॥ ६२
झालों धन्य त्रिजगीं, मज[21] पापा काय हे अहो! पाय? ।

---

१. पा० भे० 'तारी घृतमारि'. २. सर्व देवांचे गाल (हर्षानें) फुलवी. ३. तीव्र विषानें माखलेल्या बाणाचा. **उपमा.** ४. तीक्ष्ण बाण. ५. युद्धाला बोलावी. ६. अवहेलना, अपमान. ७. अन्वयार्थः—परि स्मरकाळ (=शंकर) (त्या मल्लाला) रक्षी, (व) जेंवि जनक (=बाप) बाळकोपहासाचा (=मुलानें केलेल्या थट्टेचा) कोप सदय हृदयीं न धरी (तेंवी) साचा (=चांगला) हा (शंकर) कोप न धरीच. ८. पा० भे०—दया. ९. मेघास्त्र वगैरे अस्त्रांनीं. १०. अग्न्यस्त्रादि अस्त्रें. ११. शंकराचीं अस्त्रें. १२. भगवंताचें सत्यस्वरूप व कृति असुरांना जशी या युद्धाच्या प्रकारें समजते, तशी वेदांनीं किंवा शास्त्रांनींही समजत नाहीं. १३. अन्वयः—जें पाशुपत (अस्त्र) आपलें (शंकराबरोबरील) नातें मळवीनाचि. जें अगदीं अमोघ होतें व ज्याच्या योगानें शंकराचा हेतु सिद्धीस जायाचाच—हा भाव. १४. तत्काळ, लवकर. १५. पायानें. १६. वरवर, बाह्यात्कारीं. १७. चेपी, तुडवी. १८. चरणकमलाला. १९. (१) कमलांतील पराग, (२) धूलिकण. २०. कोट्यवधी प्राण्यांत एकाद्याच भक्तिमान् जीवाला. २१. माझ्यासारख्या पाप्याला हे पाय लाभावे, हें केवढें नवल! **विभावना.**

प्रभुजी! सांपडला मज भवसिंधु तरावया महोपाय. ॥ ६३
अपराध तूंच साहसि, कदपल्यें[1] ताडि तात, उरतात ।
जरि दोष; तापमात्रें तदितर गुरु ताडितात उर, तात!" ॥ ६४
देव म्हणे, "मल्ला! वर माग, तुजवरि प्रसन्न मी झालों, ।
आलों होतों क्रोधें, परि आतां या स्तवें बहू धालों." ॥ ६५
मल्ल म्हणे, "वर देशी जरि, तरि मन्नामपूर्वकसष्ट[2] ।
त्वन्नाम असो वदनीं ध्यात्याचे, स्थिति[3] करो, हरो कष्ट. ॥ ६६
श्रीचरणाधोभागीं[4] त्वन्मूर्तीच्या असो शिर प्रेतीं[5], ।
या क्षेत्रांत वसावें; भक्ताला सर्व वांछिलें देती[6]." ॥ ६७
जी वाणी मल्ल वदे, ऐकुनि भगवान् म्हणे 'तथास्तु' तिला. ।
मार्तंडभैरवाची पावे विश्रांत ही कथा स्तुतिला. ॥ ६८
"मल्लारि नाम माझें, मैराळ असेंहि वर्णिलें आहे. ।
राहो निष्ठा येथें, ज्यां[7] भक्ति ज्ञान मुक्ति लोला हे." ॥ ६९
प्रगटे प्रभु स्वयंभूलिंगद्वयदिव्यरूप ज्या स्थानीं, ।
तें प्रेमपुर[8] सुरांनीं सन्मुनिंनीं वसविलें कृतास्थांनीं[9]. ॥ ७०
सितं[10] पक्षं मार्गशीर्षी षष्ठी[11], शततारकाहि, रविवार, ।

---

१. अन्वयार्थः–तात कदपलें (=वाईट मुलें) ताडि (=मारी), (परंतु) जरि (मुलांचा) दोष (असला तरि), (तीं) उरतात (=जिवंत राहतात, ठार केलीं जात नाहींत); तात! (हे बापा! देवा!) तदितर गुरु (=याहून निराळे भयंकर कोपिष्ठ बाप) तापमात्रें (=केवळ पश्चात्तापानें) (स्वतःचे) उर ताडितात. पा० भे०–'तापमंत्रें'. २. माझें नांव ज्याच्या पूर्वी आहे असें तुझें नांव, म्हणजे 'मल्लारि' हें नांव. ३. तें (नांव) स्थिति (=स्वस्थता, शांतता) करो (व) कष्ट हरो. ४. तुझ्या मंगल पायाच्या खालीं. 'श्री' हा शब्द केवळ आदर व मांगल्य सुचविणारा आहे. ५. प्रेतावस्थेंत. ६. याचा कर्ता 'आपल्या सारखे' हा अध्याहृत आहे. ७. ज्याला भक्ति, ज्ञान, व मुक्ति हीं प्रेमबद्ध झालीं आहेत. ८. 'तें अवतारस्थळ साचार । महाराजक्षेत्र प्रेमपुर । प्राकृतलोक म्हणति **पेंभर** । निजमाहेर संतांचें.' ॥ (श्रीधरकृत मल्लारिमाहात्म्य २।१११). मल्लारीचें पेंभर हें आदिस्थान होय. परंतु याशिवाय दुसरीं तीन स्थळेंही लोकप्रसिद्ध आहेत:–'प्रारंभीं स्थळ **पेंभरी**, तदुपरी **पालीस** आला असे, । **नळदुर्गीं** तिसरें, विशेष चवथें हें **जेजुरीचें** दिसे. ॥ ऐसीं योजुनि स्थानकें विचरतो पृथ्वींत नौखंड हो । तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारि मार्तंड हो. ॥ (निगडीकर रंगनाथकृत मार्तंडाष्टक). ९. दाखविली आहे आस्था ज्यांनीं अशांनीं. हें 'सुरांनीं' व 'मुनींनीं' याचें विशेषण. १०. शुद्ध पंधरवडा. ११. चंपाषष्ठी.

या [1]योगीं प्रेमपुरीं प्रगटे प्रभु, जो [2]नतीं सदय फार. ॥ ७१
भक्तमयूरदयाघन भगवच्चरितें [3]जगद्धितीं करितो, ।
हरितो तो हर [4]हरिहर कलिमल, निजपुण्यकीर्तिला वरितो. ॥ ७२
हा ग्रंथ पंच[5]सप्तति, 'आर्या मल्लारिविजय' या नांवें; ।
वानावें भगवद्यश, भक्तांनीं [6]भव्यभाग्य मानावें. ॥ ७३

---

## १७. आरती, अभंग व पदें.

### रामाची आरती.

ऐक वा! रामराया! । तुझ्या वंदितों पायां, ।
आवरीं आपुली हे विश्वमोहिनी माया. ॥ ध्रुवपद. ॥
मी मूढ, हीन, दीन, । सर्वसत्क्रियाहीन, ।
तूं क्षमाशील देवा! शुद्धचरित निजाधीन. ॥ १ ॥
घडो सदा साधुसंग, । नसो विषयप्रसंग, ।
सप्रेम भक्ति द्यावी; सत्ववैराग्य अभंग. ॥ २ ॥
वाटतें नित्य भावें । तुझे साधुगुण गावे, ।
मन हें आवरेना, सांग, काय म्यां करावें? ॥ ३ ॥
करितां संसारकाम, । मुखीं असो तुझें नाम, ।
दयाघना! मोर याचा पुरविसी काम. ॥ ४ ॥

### अभंग १ ला.

तूं मळों नेदिसी महानदी नातें, । 'लहान' दीनातें न म्हणसी. ॥ १ ॥
तुझ्या पुण्यजळीं जो करी मज्जन, । तयातें '[7]मज्जन' म्हणे विष्णू. ॥ २ ॥
[8]दयाकादंबिनी सर्वदा समोर । सर्व दासमोर नाचविसी. ॥ ३ ॥

### अभंग २ रा.

प्रसन्न तूं देवा! काळभैरवा! हो, । काळ स्वैर [9]वाहो, नसे भय. ॥ १ ॥
कलिकाळावरी तुझी आहे सत्ता, । दंडिसी तूं मत्ता सुरेशाही. ॥ २ ॥
शरणागत हा मयूर, हें जाण, । करीं परित्राण कृपासिंधो! ॥ ३ ॥

---

१. अशा काळीं. २. नम्रांचे ठायीं, भक्तांविषयीं. ३. विश्वाच्या कल्याणासाठीं. ४. अश्वारूढ, घोड्यानें वाहिलेला, घोड्यावर बसलेला. ५. पंचाहत्तर. आम्हांस मिळालेल्या गीति ७३ च आहेत. तेव्हां दोन गीति गहाळ जाहल्या आहेत हें उघडच होतें. या गहाळ झालेल्या गीति ६—७ च्या दरम्यानच्या असाव्यात असें वाटतें. ६. अत्यंत कल्याण करणारी दौलत, किंवा परम सुदैव. ७. माझा जन, माझा भक्त. ८. दयामेघमंडळी. ९. 'काळ वैर वाहो' असा पाठ आढळतो.

### अभंग ३ रा.

राहोनियां संतापासीं । संतापासीं भांडती. ॥ १ ॥
पावे तोष तोक थानीं, । [1]तो कथांनीं[2] पावती. ॥ २ ॥
रामतोषदासमोर । दास **मोर** नाचती. ॥ ३ ॥

---

## पदसंग्रह.

### पद १ लें.

धणी तो माझा **र**घुवर धणी । जो मुनींस दे सुखधणी[3] ॥ ध्रुवपद. ॥
मथुनि **ता**टिका, **कौ**शिकमुनिमख रक्षुनि लेंकुरपणीं, ।
**भ**र्गचाप भंगूनि, **जान**की प्रणिली दुस्तर पैणीं[4]. ॥ १ ॥
जनकाज्ञेंहुनि राज्यरमाही[5] मानुनियां ठेंगणी, ।
सपत्नीक, सानुज, विपिनातें नृपधानीसें[6] गणी. ॥ २ ॥
**खर**प्रमुख नक्तंचर[7] खरतरशरें वधुनियां रणीं, ।
शिवागृध्रबलिभुगादिकांचीं[8] घडवी जो पारणीं. ॥ ३ ॥
युवतिचोर **द**शवदन थोर जो प्रबळ सकळखळमणी ।
मथुनि पुत्रमित्रांसह, जेणें सोडविली स्वरमणी[9]. ॥ ४ ॥
ज्याची पदयुगली जनशोकद्रुम आमूलहि खणी, ।
**म**यूरासि घन, चकोरासि विधु, असि सुखदा देखणी[10]. ॥ ५ ॥

### पद २ रें.

"केलें पावन, सदया! **रा**मा! रे!। **रा**मा! रे! सुखधामा! रे! ॥ध्रु०॥
[11]पातकपर्वतपविपदपद्मा! उद्धरिलें घनश्यामा! रे! ॥ १ ॥
[12]स्वांतीं संतत चिंतित होतें पूरविलें मनकामा, रे! ॥ २ ॥
[13]मद्देहोपल संस्पृशारुण जाला पदें[14] गुणग्रामा, रे! ॥ ३ ॥
अशनीं, पानीं, शयनीं, गमनीं स्वमनीं गाइन नामा, रे! ॥ ४ ॥
प्राणविसांवा तूं, करुणाब्धे!" बोले **गौ**तमवामा[15], रे! ॥ ५ ॥

---

१. तो तोष. २. रामाला प्रसन्न करणाऱ्या संतापुढें. ३. सुखाची विपुल संपत्ति. ४. पणानें, प्रतिज्ञेनें. ५. राजलक्ष्मीसुद्धां. ६. राजधानीप्रमाणें. ७. राक्षस. ८. कोल्हीं, गिधाडें, कावळे वगैरेंचीं. ९. आपली प्रिय पत्नी. १०. सुंदर. या लहानशा पदांत सबंध रामायण मनोहर रीतीनें गुंफिलें आहे. ११. पापरूपी पर्वताला[फोडणारें] वज्र आहे चरणकमल ज्याचें अशा! १२. मनांत. १३. शिलारूप झालेला देह. १४. स्थान. १५. अहिल्या. शिलारूपांतून अहिल्येचा रामपदस्पर्शानें उद्धार झाला, तेव्हां तिनें रामाची जी स्तुति केली, ती या पदांत गुंफिली आहे.

### पद ३ रें.

धन्य, धन्य, धन्य, तुका वाणी. ॥ ध्रुवपद. ॥
अमृतरसाची क्षितिवर साची । सिंधुचि ज्याची वाणी. ॥ १ ॥
डोलवितोचि जडा अजडाही । प्रभुच्या वेणूवाणी. ॥ २ ॥
मोरास घनीं, श्रोत्यां ज्याचे । अभंगिं[1], नाहीं वाणी. ॥ ३ ॥

### पद ४ थें.

अहो ! अहो ! प्रभुजी ! पळभरि रहा. ।
उद्धरिले बहु, एकचि उरलों दीन, मजकडे पहा. ॥ ध्रु० ॥
तडतड तोडिति, करिति विकळ, खळ कामादिक वृक सहा, ।
[2]गृहगहनीं भ्रमलों तापत्रयवणवा दुःसह महा. ॥ १ ॥
पंकपतितधेनूद्धरणाला संमति देतिल दहा, ।
शरणागतविकलोद्धृतिकृति वर म्हणती महिमा महा. ॥ २ ॥
अजि ! करुणाघन ! साहेल कसा भक्त मयूर विरहा ? ।
सर्वपतितपावन हें अपुलें बिरुदहि त्यजितां, अहा ! ॥ ३ ॥

### पद ५ वें.

नाम निगमशतसार । [प्रभुचें.] ॥ ध्रुवपद. ॥
तारित आलें, तारितसे हें, । तारिलहि पुढें फार. ॥ १ ॥
यातें धरिती कंठीं प्रेमें । कवि, न मणींचा हार. ॥ २ ॥
जेंवि मयूरा जलधर, तत्ता । जीवा करितें गार. ॥ ३ ॥

### पद ६ वें.

न भुलें सुरसदना, कीं । [3]सुरसद नाकीं हेंच. ॥ ध्रु० ॥
नामरता अंधाहि न लागे । मार्गीं कांटा ठेंच. ॥ १ ॥
अमृतें मुकले, स्वहिता चुकले, । उकले नामें पेंच. ॥ २ ॥
भवभुजगाचा [4]नाममयूर- । ध्यानें उतरे रेंच. ॥ ३ ॥

### पद ७ वें.

सुख जें खरें, तें नामानें. ॥ ध्रुवपद. ॥
न बहुतुरगगजरत्नविराजित । मणिकांचनमय [5]धामानें. ॥ १ ॥

---

१. 'अभंगीं हर्षासि वाणी' असा छंदोभंगमय पाठ आढळतो. २. गृहरूपी अरण्यांत. ३. देवमंडळ. ४. ईशनामरूपी मोराच्या ध्यानानें. मोर व सर्प यांचें सहज हाडवैर सुप्रसिद्ध आहे. ५. घरानें.

वृद्धपणीं नवसांनीं झाल्या । न कुमाराच्या धामानें[1]. ॥ २ ॥
न स्वर्गींच्या गानें[2], पानें, । सुरपुष्पांच्या दामानें. ॥ ३ ॥
भक्त **म**यूर म्हणे, रसने ! हें । सत्य म्हणावें **रा**मानें. ॥ ४ ॥

**पद ८ वें.**

रसने ! न **रा**घवाच्या थोडी, यशांत गोडी. ॥ ध्रु० ॥
निंदा स्तुती जनाच्या, । वार्ता वधूधनाच्या, ।
खोट्या व्यथा मनाच्या, । कांहीं न यांत जोडी. ॥ १ ॥
साधूंचिया सदातें[3] । सुख देतसे सदा तें, ।
श्रवणीं सुधा मदातें । सोडूनि हात जोडी. ॥ २ ॥
विनवी **म**यूर भावें, । सखि ! हेंचि नित्य गावें; ।
मजला द्रवोनि पावें; । दुसरें न बंध तोडी. ॥ ३ ॥

**पद ९ वें.**

अगई ! असुख रचीतो, । असु खरची तो **नं**द. ॥ ध्रु० ॥
कोणी प्रत्याख्यान[4] न करिती, । बल्लव केवळ मंद. ॥ १ ॥
क्रूरचि मेला काढुनि नेतो । व्रजसुखवल्लीकंद. ॥ २ ॥
आम्हां **कृ**ष्ण, **म**यूरा घन, कीं । जेंवि पिका माकंद[5]. ॥ ३ ॥

**पद. १० वें.**

सदया ! **प्र**भो ! तूं हो ! पावें. ॥ ध्रुवपद. ॥
जन्मापासुनि चुकतचि आलों, । कीं जड मी, न सुझें कोपावें. ॥ १ ॥
मदधिकदीना प्रेम दिल्हें जें, । तेंचि मला सुदीना ओपावें. ॥ २ ॥
भक्त **म**यूर असें जन म्हणती । त्वद्यशें न **रा**मा ! लोपावें. ॥ ३ ॥

---

१. तेजानें. 'न कुमराच्या दामानें' असा पाठ आढळतो. २. अप्सरागंधर्वांच्या गाण्यानें व नृतानें. ३. सभेला. ४. निषेध. ५. आंबा.

# १. किरकोळ पद्यांचें परिशिष्ट.

(अ). कोल्हापुरचे तिसरे शिवाजी छत्रपति (इ. स. १७६०–१८१२) यांचे गुरु साधु पुरुष **श्रीसिद्धेश्वरमहाराज** यांचे दर्शनासाठीं मोरोपंत एकदा नरसिंहपुरास गेले. मोरोपंत व महाराज यांची पूर्वी कधींही भेट झाली नव्हती; तरी पण महाराजांनीं पंतांस पाहतांच प्रश्न केला, "मोरोपंडित आतांच आलां का?" तें ऐकतांच पंतांच्या मनाला महाराजांच्या सिद्धत्वाची साक्ष पटून, ते सद्गदितांतःकरणानें म्हणाले, "महाराज, मी अपराधी आहें, त्याचे निरसनार्थ या चरणदर्शनास आलों आहें. तर क्षमा करून बुद्धीला प्रेरणा करणार श्री समर्थ आहेत. मीं अल्पमतीनें **सन्मणिमाला** म्हणून कांहीं आर्या केल्या, त्यांत आपलें नांव घालण्याचें राहिलें. त्यास, त्या मालेमध्यें आपलें नांव व्यक्तरूपानें असावें, अशी बुद्धीस प्रेरणा श्रींनीं करावी." तेव्हां स्वामी म्हणतात, "मोरोपंडित, आम्हां मनुष्याचें नांव कशास पाहिजे." परंतु 'आज्ञा व्हावीच,' असा पंतांनीं हट्ट धरल्यावरून 'बरें आहे,' म्हणून स्वामींनीं आज्ञा दिली. तेव्हां पंतांनीं सन्मणिमालेला पूरक म्हणून पुढील आर्या रचली.—

नमिलें श्री**सिद्धे**श्वर भटजीबावांचिया [२]सुपदकमला; ।
या **सन्मणिमालेला** सांपडलें हें बरें [३]सुपदक मला. ॥

(आ). पंतांनीं **विठोबादादा** चतुर्मासे, अनवेकर, यांस जीं पत्रें धाडिलीं आहेत, त्यांतील एकांत पुढील अनुष्टुप् श्लोक आहे.—

[५]काढिली स्पष्ट मोहाच्या पाठिची सेल साधुंनीं, ।
भगवत्कीर्तिनें केली देवांची [७]सालसा [६]धुनी. ॥

---

१. या मजकुरास रा० ल० रा० पांगारकर, बी० ए०, यांच्या केसरी वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेल्या ता० २।८।१९०१ च्या पत्रव्यवहाराचा आधार आहे. २. सुंदर चरणकमलाला. ३. शोभिवंत पदक. मालेच्या मधोमध जी पुतळी, मोहोर, तकट, टांक, किंवा अशा प्रकारचा दुसरा एकादा जो नग लावतात, त्याला 'पदक' म्हणतात. ४. यास रा० पांगारकरांच्या केसरींतील एका पत्रव्यवहाराचा आधार आहे. ५. खोड जिरविली, रेंच मोडला, रग नाहींशी केली. ६. गंगानदी. ७. भगवत्कीर्तनानें सर्व लोक शुद्ध झाल्यामुळें, मलापहार करण्याचा जिचा मुख्य व्यवसाय, त्या गंगेला आतां आळसांत दिवस घालवावे लागत आहेत!

(ई). विठोबादादांची एक **'जीजी'** नांवाजी बालविधवा **बहीण होती.** तिला पंत फार मान देत असत. तिच्या संबंधें पंतांनीं एक आर्या **रचली आहे** ती अशी—

भवभय जायास्तव त्या नमितों मी सर्वकाळ **जीजीतें**; ।
बहु भूतदया हृदयीं, रंकाची सर्व काळजी जीतें ॥

(ई). काव्यसंग्रहग्रंथमालेंतील ३२ वा ग्रंथ मोरोपंतकृत **मंत्रभागवता**-पैकीं **दशमस्कंध** हा आहे. त्यांत आरंभीं मंगलाचरणाच्या गीति छापण्यांत आलेल्या नाहींत. परंतु त्या हस्तलेखी प्रतींतून आढळतात, म्हणून येथें संगृहीत करीत आहों—

**श्रीकंठ, नारदमुनि, प्राचेतस, शुक, पराशर, व्यास**, ।
नमिले भागवतोत्तम, [2]जे शर शिवले परा शर[2]व्यास. ॥ १
माता, पिता, स्वकुळगुरु, विद्यागुरु, वंदिले, सदा [3]शीतें ।
ज्याच्या निरी[3]क्षणें भ[4]वताप निवे, देति जे [5]सदाशीतें. ॥ २
[6]नुतिनतिपात्र जगीं जें नमिलें जंगम, अजंगमहि, म्यां तें. ।
द्यावी आज्ञा तेणें मज गाया [7]स्वांतरंगमहिम्यातें. ॥ ३
रुक्मिण्यादि सतींतें नमुनि, पसरुनि स्वदास मी पदर, ।
हें मागतों, 'न पावो मन जातां प्रभुपदासमीप, [8]दर'. ॥ ४
**गायत्रि! वेदमाते!** मी केवळ तो[9]कविप्र, या साचें ।
हें सुख दे, तुज नत जो, [10]पात्र न व्हे तो कवि प्रयासाचें. ॥ ५
योगींद्रा **आत्रेया**, नमिलें म्यां सिद्धनायका **कपिला**; ॥
तैसेंचि श्री**सीताराम**मनस्तोषदायका [11]कपिला. ॥ ६
मुनिकृति **नमिल्या** श्रीमद्**रामायण भारतादि**, ज्या माता ।
पाजिति जगा **अपल्या** [12]अमृत जसें **सोम** [13]दक्षजामाता. ॥ ७

---

१. यासही रा० पांगारकरांच्या पत्राचा आधार आहे. २. शरव्य=ज्या वस्तूवर शराचा नेम धरून तो सोडावयाचा असतो, त्या वस्तूला 'शरव्य' म्हणतात. 'जे परा शरव्यास शर शिवले'=जे भगवद्भक्त शत्रुरूपी शरव्याला जणूं काय बाणच लागले, ज्या भगवद्भक्तांनीं दुष्ट मनोविकारादि शत्रूंना छिन्नविच्छिन्न करून टाकिलें. ३. शीतल—मनाला सुखी व आनंदित करणाऱ्या—अशा दृष्टीनें. ४. जन्ममरणाच्या फेऱ्यापासून—संसारापासून—होणारें दुःख. ५. उत्तम आशीर्वादांना. ६. स्तुति करण्यास व नमन करण्यास योग्य. ७. त्याच्यामध्यें रहस्यरूपानें राहणाऱ्या ईश्वराच्या महिम्याला. ८. भीति. ९. ब्रह्मकुलोत्पन्न बालक. १०. कष्ट पावत नाहीं. ११. मारुतीला. १२. मोक्ष, (चंद्रपक्षीं) सुधारस. १३ दक्षाच्या सत्तावीस कन्या तारका, या सोमाला—चंद्राला—दिल्या होत्या. तेव्हां सोम हा दक्षाचा जांवई होय.

कुंतीतें, माद्रीतें, तत्पुत्रांतेंहि [1]सत्वजळधींतें, ।
नमिलें, यच्छस्त्रहतां सद्गति झाली तशांहि [2]मळधींतें. ॥ ८
दोषज्ञ, गुरु, श्रीमान्, भरतकुळाम्भोजभानु, शांतनव ।
नमिला, विदुरहि, ज्यां दे निजभक्ति [3]महाविभूतिकांत नव. ॥ ९
[4]जन्हुसुता, [5]भानुसुता, सरयू, इत्यादि [6]आपगा, त्यांचें ।
पदयुग्म वंदिलें म्यां, ज्या हरिती सर्व पाप गात्यांचें. ॥ १०
यज्ञांतें, क्षेत्रांतें, तीर्थांतें, सद्वनां, नगां, नमनें. ।
सर्व क्षमा करा, हो! वरिलें [7]तीर्थांघ्रिकीर्तिगान मनें. ॥ ११
तिलक श्रीमत्पुण्यश्लोकसभेचा, [8]उपास्य थोरांचा, ।
नमिला ग्रंथारंभीं श्रीकृष्ण, घन स्वदासमोरांचा. ॥ १२

( उ ). काव्यसंग्रहग्रंथमालेंतील 'मोरोपंती स्फुटकाव्यें भाग १ ला' (ग्रंथांक, २९ ), या ग्रंथांत २१९ व्या पृष्ठावर 'आर्याकेकावली' हें प्रकरण छापिलें आहे. त्यांत एकंदर ६१ गीति आहेत. परंतु पंतांच्या हातच्या प्रतींत या खंडकाव्यांत १७४ गीति आहेत, असें कळतें. रा० पांगारकर यांनीं 'मोरोपंती वेंचे' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्यांत आर्याकेकावलीपैकीं ५७ गीति छापिल्या आहेत व त्यांत २८ गीति काव्यसंग्रहग्रंथांत न छापिलेल्या अशा आहेत. पंतांची मूळ प्रत हातीं येती, तर आम्हीं हें सबंध प्रकरणच पुन्हां छापिलें असतें. परंतु सद्यःस्थितींत तो योग घडून येण्याचा फारसा संभव दिसत नसल्यामुळें, रा० पांगारकरांच्या पुस्तकांत आलेल्या नवीन २८ गीति येथें सादर करीत आहों.—

अपराध फार केले, परि आतां हात जोडिले, स्वामी! ।
करुनि दया तारावें; आवडि वाढो सदा तुझ्या नामीं. ॥ १
ऐसें औदार्य तुझें, प्रभुत्व, करुणाकरत्व, ऐकोनी, ।
आलों शरण, स्वामी! जोडुनियां हस्त मस्तकीं दोनी. ॥ २
पायें मज दीनाला, रामा! लोटूं नकोचि वा! दूर. ।
उद्धरिले बहु पापी; याविषयीं तूं रघूत्तमा! शूर. ॥ ३

१. धैर्यसागरांतें. २. दुर्योधनासारख्या दुष्ट पाप्यांना पांडवांच्या हातून मरण आल्यामुळें त्यांना मोक्षप्राप्ति मिळाली, इतकें पवित्रत्व पांडवांच्या ठिकाणीं होतें, हा भाव. ३. आदिमायेचा पति विष्णु किंवा विश्वस्वरूप विष्णु. ४. गंगा. ५. यमुना. ६. नद्या. ७. ज्याच्या चरणाच्या ठिकाणीं सर्व तीर्थें आहेत, अशा देवाच्या यशाचें गीत. ८. उपासनाविषय, पूजापात्र.

धांव, समर्था! सदया! भवपंकामाजिं बुडतसे गाय. ।
निकटस्था[1]! धर्मज्ञा! कौतुक अद्यापि पाहसी काय? ॥ ४
करुणाघन तूं माथां, जाळितसे मज मृगास भववणवा, ।
वृष्टि न करितां, होतों उदास; हें योग्य तूज[2] न सकणवा. ॥ ५
तूं जरि न पावसी, तरि पाचारूं संकटांत मी कवणा? ।
श्रवणारूढ करुनि हे विनती, रक्षीं मला पदप्रवणा[3]. ॥ ६
त्वद्भक्त, शुद्धकर्मा, **बि**भीषण प्राज्ञ, **राव**णें छळिला, ।
येतां शरण तुला; त्वां हृदयीं, स्वभुजीं धरून, आवळिला. ॥ ७
चरणविलोकनतत्पर वानर आतांत **राघ**वा! गणिले. ।
साधुद्वेषी जे जे, कुळ त्यांचें त्वां समूळही खणिलें. ॥ ८
तूं बाप, माय, बंधू, धणी, सुहृन्मित्र, **जान**कीजाने! ।
करुनि दया, विलयाला अतिसत्वर संकटास माज्या ने. ॥ ९
श्री**राम**ा! सुखधामा! पावननामा! स्वभक्तविश्रामा! ।
**का**मारिगीतकीर्ते[4]! करुणामूर्ते! **न**को त्यजूं आह्मां. ॥ १०
हृद्गत तुजला कळतें, हृदयस्था! **राघ**वा! जगज्जनका! ।
जन काय तत्त्व जाणे? **प्र**भो! उपेक्षा करूंचि आज **नका**. ॥ ११
सर्वां लाभांहुनि बहु लाभ असे त्वत्पदाम्बुरुहभजनीं. ।
मज नीतिज्ञा! भजतां, संकट न पडों दिजेचि अशुभ जनीं. ॥ १२
एकांतीं त्वन्नामें गायिन मधुर स्वरें स्थिर स्वान्तें[5], ।
संकट वारुनि, द्यावें हें मज वरदान **जान**कीकान्तें. ॥ १३
या संकटाबरोबर वारीं लोकेषणादि[6] अनिवार्य; ।
म्हणजे हा दास तुजा जाला लोकत्रयांत कृतकार्य. ॥ १४
अन्नाच्छादन देतें दुसरें बा! कोण, सांग, विश्वास? ।
म्हणताति **'आयुरन्न प्रयच्छति'** प्राज्ञ, तेथें[7] विश्वास. ॥ १५
त्वद्गुणकीर्तन करितां, लज्जा हे पापिणी धरू न गळा. ।
हे **ताट**कान्तका! हा परमार्थ इणेंचि बुडविला सगळा. ॥ १६

---

१. परमेश्वर सर्वांच्या अंतरंगांत वास करितो म्हणून तो 'निकटस्थ' होय. पुढें ११ व्या गीतींत **'हृदयस्थ'** शब्द याच मतलबानें योजिला आहे. २. सदय अशा तुला. ३. पायाचे ठायीं नम्र झालेल्या मला. ४. मदनशत्रु जो शंकर त्यानें गाइली आहे कीर्ति ज्याची—अशा. ५. निश्चल—शांत—अंतःकरणानें. ६. मोठेपणाची—लौकिकाची—हौस. ७. त्या बोलण्यावर.

खळ हांसतील, तेंही सोसाया सहनशीलता द्यावी. ।
लावीन मस्तक तुज्या पदीं, तुजी भक्ति आत्मविद्या वी. ॥ १७
केलें म्यां मनुजांचें आर्जव बहु, चाटुकारही[1] जालों; ।
परि तेथ पाप पाउनि, पुनरपि तुजलागें शरण मी आलों. ॥ १८
शरण तरी तुज यावें, नमन करावें तुलाचि सुज्ञानें, ।
गावे तुजेचि गुण, बा! सेवावें तुजचि माद्दगज्ञानें[2], ॥ १९
म्हणवुनि तुमचें नामचि 'राम' असें हें मुखीं सदा राहो. ।
हा ज्ञानहीन दीन, प्रसन्न होऊन, शीघ्र तारा, हो! ॥ २०
परि भावें गुण गातां, प्रसन्न होतोस तूं असें ठावें ।
जालें सज्जनसंगें; प्रेम कसें तें मनांत सांठावें? ॥ २१
संतांच्या वदनें मीं आयकिलीं बा! तुजीं जयीं चरितें, ।
त्यजुनि विषय, मन केलें, भरावया गुणसुधा, तयींच रितें. ॥ २२
चापशरधरा! धीरा! आपद्‌ग्रस्तासि मज नको विसरूं, ।
या परम संकटीं मी बा! पदर तुज्यापुढें किती पसरूं? ॥ २३
विश्व तुज्या ठायीं, तूं नामीं, तें नाम साधुच्याचि मुखीं, ।
तत्संग दे मला, मग गुंतेना मी कदापि तुच्छ सुखीं. ॥ २४
संग धरुनि विषयांचा, भंगें[3]चि मन पावलें, परी न विटे. ।
साधुसमागमभेषज साधुन देशील, तरिच मोह फिटे. ॥ २५
हें सर्व सत्य तोंवरि, जोंवरि तुज शरण पातलों नाहीं. ।
आतां थोरपणासचि आपुलिया मात्र राघवा! पाहीं. ॥ २६
संत भगवंत साचे, परि भगवंतापरीस हे थोर. ।
हे आंगें अंधाची यष्टी होतात, थोर बहु थोर! ॥ २७
ऐसे भगवत्तत्पर सदयहृदय संत पंतें[4] भेटावे; ।
ते सच्छिक्षादाते[5] मुमुक्षुबुद्धीसि होति नेटावे. ॥ २८

---

१. खुषमस्कऱ्या. २. माझ्या सारख्या ज्ञानहीनानें. ३. हिरमोड. ४. पंडित, शिक्षक, अध्यापक. ५. उत्तम शिक्षण देणारे.

# २. पाठभेद, शुद्धाशुद्ध इत्यादींचें परिशिष्ट.

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| १ | ३ | 'यादवादि यमकल्प' ऐवजीं 'यादवादियमकल्प' (=यादवादिकांना यमासारखा असा) पाहिजे. |
| २ | ५ | 'वारिधि तशी'=पूर येऊन समुद्राप्रमाणें फुगलेली (यमुना). हा अर्थ अधिक चांगला. |
| ,, | ८ | 'यश गा! ते' पेक्षां 'यश गाते' (=यश गाणारे) हा पाठ अधिक चांगला. |
| ४ | १८ | 'बळ' ऐवजीं 'बळ' (=बळराम) पाहिजे. |
| ६ | ३६ | 'अगसा'=पर्वतासारखा. हत्तीला 'झाडा'पेक्षां पर्वताची उपमा अधिक शोभते. |
| १० | ५९ | 'वळते ज्या' ऐवजीं 'बळ ते ज्या' असा योग्य पाठ. अन्वय.–ज्या (रुक्मीला), वाइटहि असुनि, ते कलिंगादि खळ बल देती, (तो) रुक्मी नय मोडी, भय त्यजि, [आणि जेविं] शलभ दवा, तेविं बळतेजा (बळरामाच्या पराक्रमाला) होय. |
| ११ | ६३ | उत्तरार्ध=अन्वय.–वासुदेव, त्या (पौंड्रकाला) न वधुनि, सुकवि मानवते (संतुष्ट) करितां काय? (करूं शकला असता काय?). |
| १९ | १५ | '°हर दत्त' ऐवजीं '°हरदत्त' पाहिजे. |
| २० | २७ | 'जीविहिता' ऐवजीं 'जी विहिता' हें पाठांतर. विहिता=योग्या. |
| २२ | १२ | 'हे स्वस्था हो' हें सर्व सखींचें म्हणणें आहे. |
| २७ | ६२ | 'कुवलयाश्ववृत्त' ऐवजीं 'कुवलयाश्व वृत्त' पाहिजे. |
| ५४ | १ | 'श्रीमान' ऐवजीं 'श्रीमान्' पाहिजे. |
| ,, | २ | 'साम्राट्' ऐवजीं 'सम्राट्' पाहिजे. |
| ,, | ३ | 'मा भैः प्रख्यात' ऐवजीं 'मा भैषीः ख्यात' हा योग्य पाठ. |
| ५६ | २७ | 'न मही त्वां कदापि जोडावी' ऐवजीं 'न मदाज्ञा कदापि मोडावी' असें पाठांतर. |
| ५८ | ३९ | 'कसा' ऐवजीं 'कसी' असें पाठांतर. |
| ५९ | ६ | 'नव्हे' ऐवजीं 'नव्हें' पाहिजे. |
| ६२ | ४० | 'ससत्व' ऐवजीं 'सुसत्व' असें पाठांतर. |
| ६३ | ४४ | 'येउनि घेवो' ऐवजीं 'येवूं घेवूं' असें पाठांतर. |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| ६४ | ५८ | उत्तरार्धावरील खुद्द पंतांची टीप—'जे जन प्रभु, तेही खरे दीन दास होती.' |
| ६५ | ६५ | '°चद्रे' ऐवजीं '°चंद्रे' पाहिजे. |
| ६६ | ७९ | 'विखी मनहि नृपाचे' ऐवजीं 'विखी मनीं नृपातें' असें पाठांतर. |
| ६७ | १ | 'नेती' ऐवजीं 'येती' असें पाठांतर. |
| ६८ | ३ | पूर्वार्ध–पाठांतर.—'झाला कंथापितृवनधूमभसितधारणें मलिन काय.' |
| ,, | ८ | 'तेथुनि' ऐवजीं 'येथुनि' असें पाठांतर. |
| ७० | २९ | 'स्वप्न म्हणावा' ऐवजीं 'स्वप्न म्हणावें' असें पाठांतर. |
| ७२ | ४४ | 'बा' ऐवजीं 'त्वां' असा अन्य पाठ. |
| ,, | ५० | गीताचा अन्य पाठ.—भूप म्हणे, 'हा वत्सा! निविव श्रुति, मंजु मात वद, शेला। मळिव पदरजें, ये, उर न उलो पाहोनि या तव दशेला. ॥ |
| ७३ | ५५ | 'सधनाच्या' ऐवजीं 'सदयांच्या' असा अन्य पाठ. |
| ,, | ५६ | 'हेती' या शब्दावर 'अग्निशिखा' अशी खुद्द पंतांची टीप आहे. |
| ,, | ६३ | पूर्वार्ध, पाठांतर—राया! स्वप्न असे कीं सत्य? कसें मानितोसि? सांग मला. |
| ७४ | ७१ | 'हरि! हरि! हरि! दयिते!' ऐवजीं 'हरि! हरि! आयि! दयिते!' असें पाठांतर. |
| ७५ | ७३ | 'जीवनविरहचि' ऐवजीं '°विरहहि' असें पाठांतर. |
| ,, | ७४ | 'क्षमा करावी' ऐवजीं 'क्षमा करावें' असा अन्य पाठ. |
| ,, | ७९ | 'जो—तो' ऐवजीं 'जों—तों' असें पाठांतर. |
| ७६ | ३ | उत्तरार्ध—'गुरु' ऐवजीं 'उरु' असा अन्य पाठ. |
| ७७ | ७ | 'स्वर्गासि वहायाला' ऐवजीं 'स्वर्गासि बहायाला' असा अन्य पाठ. |
| ,, | ९ | 'तशि' बद्दल 'हा' असें पाठांतर. |
| ,, | १४ | 'सर्वहि हरि' बद्दल 'सर्व हरी' असा अन्य पाठ. |
| ७८ | १७ | '°धर भूषण°' ऐवजीं '°वरभूषण°' असें पाठांतर. |
| ,, | २५ | 'महाग' ऐवजीं 'महाघ' असें पाठांतर. |
| ७९ | २८ | 'श्रमी' ऐवजीं 'श्रमीं' असा अन्य पाठ. |
| ,, | ३५ | 'मज' ऐवजीं मम' असा अन्य पाठ. |
| ८१ | २ | 'आइ' ऐवजीं 'आइ!' (=माते भूमी!) असें पाहिजे. |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| ८२ | १२ | 'मत्पुत्रभूमि' ऐवजीं 'मत्पुत्ररत्न' असें पाठांतर. |
| ८३ | २१ | 'असेंचि' ऐवजीं 'अशेष' असा योग्य पाठ. |
| ८४ | २३ | उत्तरार्ध, योग्य पाठ.—यश सारिकाचि, पावे, पंजरबद्धाहि काय हो चिमणी ? ॥ |
| ,, | ३०-३१ | या गीतींचा कांहीं ठिकाणीं उलट अनुक्रम आहे. |
| ,, | ३२ | पाठांतर—श्रीरामसुत मयूरें हे लिहुनि सुकृत कथा यथाबुद्धी, । पुण्यश्लोका वाहिलि, पाहिलि बहु याचि पूजनें शुद्धी. ॥ |
| १०४ | १० | उत्तरार्ध-योग्यपाठ.—बा ! मर्त्येशा ! शोभे स्त्रीनें श्रीनेंतसेंचि तें धाम. । |